# इंद्रधनुष्य

— लेखक —

ना. सी. फडके

— प्रकाशक —

महाराष्ट्र ग्रंथ भांडार, मुंबई ४

किंमत दोन रुपये

# १

" थांब, मी बापूंना सांगतें, कीं ताई मला कध्धीं फोनोग्राफ वाजवूं देत नाहीं." असं अर्धवट रागानं अन् अर्धवट रडत रडत म्हणून आठ वर्षांची माली खोलीबाहेर पडली तेव्हां वासंती फक्त हसली; आणि तिनं फोनोग्राफच्या पेटीचं झांकण बंद करतां करतां म्हटलं, "हं सांग–सांग, बापू माझं काय करणार आहेत? तुला दहादां सांगितलं मी पत्र लिहितें आहे, मला त्रास देऊं नको, तरी तुझा फोनोग्राफ कांहीं केल्या थांबेना!"

परंतु वासंतीचं सगळं बोलणं ऐकायला माली खोलींत राह्यलीच नव्हती ती पाय आपटीत "बापू, अहो बापू" अशा हाका मारीत आणि रडण्याचा आवाज हलके हलके वाढवीत दिवाणखान्याकडे निघून गेली होती.

वासंती परत आपल्या टेबलाजवळ येऊन बसली, अन् पुढें पत्र लिहूं लागली.

"......मी आतां लवकरच मुंबईस येणार म्हणून तूं वाट पाहत असशील हें खरं, परंतु मला तुझी निराशा करणं भाग आहे, पुन्हा तिकडे यावं असं माझ्या मनाला अगदीं वाटत नाहीं. माझं मन मुंबईला कां विटावं याची तुला थोडीशी कल्पना आहे. गेल्या दोन वर्षांत माझी विशेष मैत्रीण अशी तूंच होतीस, अन् ज्या गोष्टी माझ्या वडिलांनाहि अजून मी सांगितलेल्या नाहींत अन् बहुधा कधीं सांगणार नाहीं त्या तुला थोड्या फार माहीत आहेत. त्या गोष्टींचा मी कांहीं माझ्या आयुष्यावर परिणाम होऊं देणार नाहीं. पण निराशा विसरायला थोडा तरी काळ जावा लागतो; आणखी मुंबईस परत न येतां दुसरीकडे कुठं तरी मी गेलें तर ती मला लवकर विसरतां येईल. पुण्याच्या एखाद्या कॉलेजांत जावं असं मी मनाशीं ठरविलं आहे. अजून याबद्दल बापूंना विचारायचं आहे. त्यांना काय सांगावं, कसं सांगावं अशा अनिश्चयांत मी इतके दिवस घालविले. पण आज जूनची सतरा तारीख. आतां त्यांना विचारण्याचें काम किती लांबणीवर टाकणार मी? ते मला नको म्हणणार नाहींत. त्यांचं माझ्यावर फार प्रेम आहे. पण तरी त्यांची भीति वाटते ——"

तितक्यांत "ताई, ताई" अशा बापूसाहेबांच्या हाका वासंतीला ऐकूं आल्या, अन् त्यापाठोपाठ मालीची स्वारी दारांत येऊन मोठ्या ऐटीनं म्हणाली, "ताई, तुला बापूंनीं बोलावलंय."

पुन्हा बापूसाहेबांच्या हाका ऐकूं आल्या म्हणून वासंतीनं तें अपुरं पत्र पॅडमध्यें घालून ठेवलं, अन् ती आपल्या जागेवरून उठली.

माली म्हणाली, "बापू फार रागावलेत तुझ्यावर."

वासंती हसून म्हणाली, "अगबाई, खरंच का? मला फार भीति वाटते हो बापूंची."

"माझा फोनोग्राफ बंद करतेस नाहीं काय? आतां बसतोय् बघ मार तुला."

तिच्या तोंडावर अगदीं लढाई जिंकल्यासारखा आनंद दिसत होता. वासंती खालीं वाकली आणि तिनं चटकन् तिचा मुका घेतला. मालीला तें मोठं चमत्कारिक वाटलं. दोन शत्रु एकमेकांचं असं चुंबन घेतात? पण त्या चुंबनामुळें ताईविषयींचा तिचा राग मात्र चटकन् कमी झाला; अन् तिच्या मनांत असंही आलं, कीं ताईच्या मागोमाग दिवाणखान्याकडे जावं आणि बापूंना सांगावं, "मला ताई आवडते. तिला रागं भरूं नका."

वासंती दिवाणखान्यांत गेली तेव्हां बापूसाहेब तिला म्हणाले, "आज जूनची सतरा तारीख ना ग? तूं मुंबईस केव्हां जाणार? मी विचारतों याचं कारण असं, कीं कडपगांवचे कुलकर्णी आत्तांच येऊन गेले. ते म्हणतात, चार दिवस शिकारीला या. तुला जायला चार-पांच दिवस अवकाश असेल तर मी जाऊन येईन. नसेल तर तूं गेल्यावर मग जाईन. म्हणून म्हटलं तुला विचारावं आणि ठरवावं. त्यासाठीं तुला हाक मारली. केव्हां जाणार तूं?"

चटकन् उत्तर देण्याऐवजीं उजव्या हातच्या कोपऱ्यांत भिंतीवर नाना फडणिसांची एक जुनी तसबीर होती तिच्याकडे पाहत वासंती स्तब्ध राहिली.

बापूसाहेबांनीं पुन्हा विचारलं, "अं? केव्हां जाणार?"

वासंतीनं मनाचा हिय्या करून म्हटलं, "मी मुंबईस जाणार नाहीं."

आतां यावर आपले वडील कोणकोणते प्रश्न करतील व आपण त्यांची कशीं कशीं उत्तरं दिलीं पाहिजेत याचा मनाशीं अदमास घेण्यासाठीं वास-

तिनं चटकन् आपल्या वडिलांकडे पाहिलं. वयोमानामुळें किंचित् गढूळ भासूं लागलेल्या, परंतु जवानींतल्या तेजाची अजूनही साक्ष देणाऱ्या त्यांच्या मोठमोठ्या घाऱ्या तीक्ष्ण डोळ्यांत तिचं उत्तर ऐकतांच आश्चर्य दिसूं लागलं. त्यांनीं आपल्याकडे कांहींसा तीव्र कटाक्ष टाकला असं वासंतीला वाटलं पण तितक्यांत किंचित् हसल्यासारखं करून ते विचारूं लागले,

" मुंबईस परत जायचं नाहीं तुला? म्हणजे काय? कॉलेजचा अभ्यास सोडून तर द्यायचा नाहीं ना? परवां आपले थोरात मास्तर आले होते तेव्हां तर, बी. ए.साठीं ऐच्छिक विषय कोणता घ्यावा याबद्दल त्यांच्याशीं मारे जोरजोरानं चर्चा केलीस. अन् मुंबईस जायचं नाहीं असं आज सांगतेस हें काय?"

" बी. ए.ला बसणारच आहे मी. मीं कधीं नाहीं म्हटलं."

" मग मुंबईस जायचं नाहीं म्हणतेस याचा अर्थ काय?"

" पुण्यास जावं म्हणतें."

" पुण्यास? शी:! आहे काय त्या पुण्यांत?"

" कां? तिथेंही चांगलीं कॉलेजं आहेत."

" पण मुंबईला कां जायचं नाहीं? मावशीच्या घरीं तुझ्या व्यवस्थेंत कांहीं कमी पडतं का?"

" छे, तसं कांहीं नाहीं."

" मुंबईचे प्रोफेसर वाईट आहेत काय?"

" छे, प्रोफेसर काय, सगळीकडे सारखेच."

" मग पुण्यास जायचा हा बेत कशासाठीं? मुंबईला खर्च फार येतो असं तुला वाटतं का?"

" नाहीं बाई."

असं एकीकडे म्हणतांना मनांतलं खरं कारण लपवून वडिलांना काय सांगावं तें वासंतीला सुचेना. तिला हें माहीत होतं कीं, आपल्या मनांतली अगदीं खरी खरी गोष्ट जरी त्यांना सांगितली तरी ते आपल्यावर रागावणार नाहींत. तिचे वडील जरी जुन्या पद्धतीचे, थोडंसंच शिक्षण झालेले, आणि शेती–सावकारीच्या उद्योगांत आयुष्य घालविणारे छोटेसे जमीनदार होते, तरी त्यांचं मन कांहीं अगदींच आकुंचित नव्हतं. तिच्याशीं पुष्कळ मोकळेपणानं ते वागत अन् त्यांच्याशीं मोकळेपणानं वागावंसं तिला वाटावं

अशी सहानुभूति ते सदा दाखवीत, त्यांनीं तिला समजूं लागल्यापासून स्वातंत्र्य दिलं होतं, आणि त्या स्वातंत्र्याचा ती कसा उपयोग करते यावर त्यांची जरी दुरून नजर असली तरी त्या नजरेची जरब तिला कधीं भासू दिली नव्हती. परंतु चमत्कार असा कीं, इतकं असूनही आपण पुण्याच्या कॉलेजांत जाण्याचा बेत कां करीत आहोंत त्याचं खरं कारण सरळ सांगावं असा धीर वासंतीला होईना, अन् त्यांच्या सान्निध्यांत एखादी खोटी सबबही तिला चटकन् आठवेना. बापूसाहेब पुढें म्हणाले,

"मुंबईची हवा तुला मानवते ना ? ती मानवत नसेल तर प्रश्न निराळा."

तें ऐकतांच वासंतीच्या मनांत आलं, वा ! जें आपल्याला सुचत नव्हतं, तेंच आयतं बापूंनीं सुचवलं कीं ! ती चटकन् म्हणाली,

"मानवत नाहीं असंच नाहीं कांहीं. पण—"

बापूसाहेबांनीं तिच्याकडे निरखून पाहिलं. ती जात्याच मोठ्या हाडा-पेराची नव्हतीच. ती आपल्या आईच्या वळणावर गेली होती. तिच्या शरीराचा बांधा कांहींसा कृश व नाजुक होता. गालांच्या ठेवणीमुळें, रेखीव अवयवांमुळें अन् टपोऱ्या डोळ्यांच्या योगानं ती निकोप प्रकृतीची वाटे इतकंच. मात्र ती आजपर्यंत कधीं मोठ्या दुखण्यानं आजारी पडलेली त्यांना आठवत नव्हती ; अन् आपल्या स्नेह्यांसोबत्यांशीं बोलतांना ते नेहमीं अभिमानानं सांगत, "आमची वासंती पाहा. पिंड कसा सुदृढ आहे तिचा." मात्र गेल्या उन्हाळ्याच्या आरंभीं परीक्षा संपवून जेव्हां ती मुंबईहून परत आली, तेव्हां त्यांना ती पुष्कळच फिकट झाल्यासारखी दिसली होती. त्यांनीं मनाशीं विचार केला होता, तिनं अभ्यास फार केला असेल, आतां इथें खेड्यावर दोनतीन महिने राहिली कीं सुधारेल तिची प्रकृति. त्याप्रमाणें वासंतीच्या प्रकृतींत थोडासा फरक पडलाही होता. पण तो थोडासाच ; आणि त्यामुळें बापूसाहेबांना वारंवार वाटलं होतं, हिची प्रकृति पहिल्या-सारखी कां होत नाहीं ? ती मनांतल्या मनांत कशानं तरी कष्टी असावी अशीही शंका त्यांना मधेंच एखादे वेळीं येई ; पण ती हसतां-खेळतांना त्यांच्या दृष्टीला पडली किंवा आपल्या धाकट्या बहिणीला मांडीवर घेऊन गमतीच्या गोष्टी सांगतांना दिसली, कीं त्यांना वाटे, छे ! आपली शंका उगीचच !

त्यामुळें आतां जेव्हां तिच्या प्रकृतीबद्दलचा प्रश्न निघाला व तिनं घुट-मळत उत्तर दिलं, तेव्हां त्यांनीं तिच्याकडे अगदीं लक्षपूर्वक पाहिलं. खरंच तिचीं मनगटं पूर्वीपेक्षां बारीक दिसत होतीं, आणि तिच्या नखांची पूर्वींची लालीही कमी झाली होती. ते चटकन् म्हणाले,

"मुंबईची हवा तुला मानवत नसेल तर मी कधीच आग्रह करणार नाही. पुण्यास राह्यचं असेल तर माझी कांहीं हरकत नाहीं. कुठलं कॉलेज बरं वाटतं तुला ? "

वासंतीनं कॉलेजचं नांव सांगितलं.

ते म्हणाले, " वा ! त्या कॉलेजचे प्रिन्सिपल तर माझे स्नेही आहेत. मी त्यांना उद्यांच पत्र लिहितों, 'माझी मुलगी तुझ्या कॉलेजात धाडतों आहे, तिची नीट व्यवस्था लावून दे म्हणून.' मुलींसाठीं राह्यची सोय आहे का तिथें ?"

" आहे म्हणतात. "

" ठीक आहे. मग मी इतक्यात जात नाही कडपगांवला. तूं गेल्यावर मग वाटलं तर जाईन."

वासंती आपल्या खोलीत परत गेली, तेव्हां आपण आनंदांत आहोंत कीं दुःखांत आहोंत हें तिला नीटसं कळेना. पुण्यास जाण्याच्या विचाराला तिच्या वडिलांची संमति अकल्पितपणें मिळाल्यामुळें वास्तविक तिला आनंद व्हायला हवा होता. पण तसा तो तिला झाला नाहीं. उलट तिच्या मनात आलं, पुण्यास आपण जाणार हें खरं, पण तिथें तरी आपल्या आयुष्याला कोणतं वळण लागणार आहे कुणास ठाऊक ? एक तर पुण्याला एकदोन दिवसांपुरती अशी जरी ती कधीं कधीं गेली होती तरी तें शहर तिला बरंचसं परकी होतं. तिथें कुणी तिच्या मैत्रिणी नव्हत्या. ज्या कॉलेजांत ती जाणार होती त्याची तर तिला कांहींच माहिती नव्हती. अगदीं अनोळखी ठिकाणीं जाऊन राहण्याची कल्पना मनुष्याच्या मनांत नेहमींच एक सूक्ष्म हुरहुर उत्पन्न करीत असते. आणि वासंती तर पुण्यास जाणार होती ती आपल्या आयुष्यांतल्या कांहीं गोष्टी विसरण्यासाठीं. त्यामुळें मुंबईला न जातां पुण्याला जाण्याचा विचार आतां जेव्हां पक्का ठरला, तेव्हां पूर्ण आल्हाद वाटण्याऐवजीं तिचं मन अस्वस्थतेनं जडच झालं.

मधांशी अपुरं ठेवलेलं पत्र तिनं कसं तरी पुरं केलं आणि पाकीट बंद केल्यावर तिनं विचार केला आपणच फिरायला जातां जातां तें पोस्टांत टाकावं.

तिची फिरायला जाण्याची जागा ठरलेली होती. गांवाच्या दक्षिण भागाकडील लहानशा तळ्यावरून पुढें जाऊन शंकराच्या देवळाला वळसा घालून शेतजमिनींतून सुमारें अर्धा मैल गेल्यावर ती डाव्या हातच्या टेकडीवर चढून जाई, आणि तिच्या माथ्यावरच्या वृक्षाखालीं ती बसत असे. त्या जागेवरून गांवांतलीं घरं लहान लहान आकृतींसारखीं दिसत, माणसांचे आवाज अगदीं अस्पष्ट होऊन ऐकूं येत, डाव्या बाजूला विस्तीर्ण माळरान पसरलेलं दिसे, दूर मोटारींच्या रहदारीचा रस्ता चढउतार करीत गेलेला दृष्टीस पडे, आणि अखेर डोंगरांच्या निळसर-काळसर रांगा तटबंदीसारख्या उभ्या राहिल्याशा वाटत. या एकंदर दृश्याकडे पाहण्यांत वासंतीच्या आयुष्यांतल्या किती तरी घटका गेलेल्या असतील. तो देखावा दृष्टीस पडला कीं, आपल्या गांवाविषयींच्या व आसपासच्या प्रदेशाविषयींच्य प्रेमाचा उमाळा तिच्या मनांत एकदम येई, व ती पुष्कळदां मनाशीं म्हणे, अभ्यासक्रम संपला कीं या माझ्या आवडत्या जन्मभूमींतच मी कायमची येऊन राहीन अन् सुखी होईन.

वासंती तळ्याच्या काठानं जाऊं लागली तेव्हां त्याच्या ओसरलेल्या गलिच्छ पाण्यांत वरती आकाशांत जमलेल्या ढगांचीं प्रतिबिंबं दिसलीं. तीं तिला पाहावींशीं वाटलीं. तितक्यांत वाऱ्याचा एक मोठा झोत येऊन गेला अन् त्याच्या मागोमाग मोठमोठे टपोरे थेंबही पडूं लागले. तिच्या मनांत एकदां आलं, पुढं न जातां परतावं कीं काय. पण तिनं वर दृष्टि टाकली तों ढग जमले होते, पण त्यांतून सूर्य चांगला तळपत होता. जोराच्या वृष्टीचीं चिन्हं मुळींच दिसत नव्हतीं. एखादं झाड वाऱ्यानं हालून त्यावरचीं फुलं तुरळक तुरळक गळावीं त्याप्रमाणें मेघांतून मोठमोठे थेंब ठिबकत होते. तळ्यांतल्या पाण्यावर त्या थेंबांचं नृत्य मोठं मजेदार दिसत होतं. उजव्या बाजूला शेतजमिनींत पडणारे थेंब लगेच शोषले जाऊन फारा दिवसांची तहान भागल्याप्रमाणें धरित्री उष्ण निःश्वास सोडीत होती, त्यांचा उग्र सुगंध दरवळत होता. मधेंच एखादा मोठा थेंब वासंतीच्या मस्तकावर टप्दिशीं वाजे, मधेंच दुसरा थेंब तिच्या स्कंधावर पडे. जलसिंचनाची ही क्रीडा सुखाची वाटल्यामुळें वासंती तशीच पुढें चालत गेली. तुरळक

जलबिंदूंना धारेचं स्वरूप आलं तेव्हां शंकराच्या देवळाच्या भिंतीआड ती कांहीं वेळ उभी राहिली. मोठी सर आली. देवळाच्या आवारांतल्या झाडांचीं वाळलेलीं पिवळीं पानं सळसळ करीत खालीं आलीं अन् वाऱ्याबरोबर उडत इकडेतिकडे फिरलीं. पण चारपांच मिनिटांतच पावसाची ती सर एखाद्या मोठ्या हालत्या स्तंभाप्रमाणें सरकत सरकत उजव्या अंगाला वळली; आणि पार गांवापलीकडे गेली. मग वासंती पुन्हां चालूं लागली, त्या वेळीं तिच्या पायांतल्या चपलांना ओल्या मातीचे थर चिकटूं लागले. टेकडीच्या माथ्यावरच्या झाडाखालीं पोंचल्यावर तिनं एका मोठ्या दगडाला घासून ती माती काढून टाकली अन् ती दुसऱ्या एका मोठ्या दगडावर बसली. तिनं पाहिलं तों पावसाचा तो उभा झोत आतां अगदीं दूर डोंगरांच्या पायथ्याशीं पोंचला होता. पश्चिमेकडे सूर्याच्या आसपास लहानसासुद्धां मेघखंड उरला नव्हता. अन् पूर्वेकडे—

तें पाहतांच वासंती एकदम चमकली.

इंद्रधनुष्याचा केवढा तरी विस्तीर्ण पट्टा आकाशाच्या या कडेपासून त्या कडेपर्यंत हलके हलके उमटूं लागला होता. प्रथम एका रंगाची कड, नंतर दुसऱ्या, नंतर तिसऱ्या, अशा रुंद रंगीत रेघा अधिकाधिक स्पष्ट होत होत्या. अखेर ती विस्तीर्ण बहुरंगी कमान अंतराळांत मोठ्या डौलानं उभी राहिली, अन् जणूं ती हवेंत हलकेच हेलकावत आहे असा भास वासंतीला झाला.

परंतु ती दिव्य शोभा पाहिल्यावर आपल्या हृदयांतल्या खोल तारा छेडल्या जात आहेत असं वाटून तिचा डावा हात न कळत वक्षःस्थलापाशीं गेला, अन् तिनं क्षणभर डोळे झाकून घेतले.

तिला आठवण झाली.

तो म्हणाला होता, "या इंद्रधनुष्याकडे पाहिलं कीं जगांतल्या साऱ्या दुःखांची अन् संकटांची आठवण नाहींशी होते, त्यांचं महत्त्व वाटेनासं होतं. मानवी जीवितांत जें सौंदर्य आहे तें सारं उफाळून आपल्यापुढें उभं राहिल्यासारखं वाटतं, अन् प्रेमासाठीं जगण्यांत अन् झगडण्यांत मौज आहे असा प्रत्यय येतो—"

ती म्हणाली होती,

"तो प्रत्यय यायला तुमचं नुसतं बोलणं ऐकलं तरी तें पुरेसं आहे."

आणि तितक्यांत वेगानं प्रकट झालेले इंद्रधनुष्याचे विविध रंग हलके हलके पुसट होत जाऊन अखेर पार विरून गेले होते.

कां कोण जाणे, ती गोष्ट एखाद्या अपशकुनासारखी तिला वाटली होती.

ती आठवण तिला नकोशी वाटली. तिनं डोळे उघडले, अन् घाईनं समोर पाहिलं. तेवढ्यांत इंद्रधनुष्याची ती प्रचंड कमान अधिकच स्पष्ट झाली होती. तिच्या मनाला फार बरं वाटलं, आणि मग काहीं वेळानं पूर्वक्षितिजा-वरच्या एखाद्या देवतेनं ओढल्याप्रमाणें ती कमान मागं मागं सरकूं लागली तरी तिला विषाद वाटला नाही. उलट सृष्टीच्या त्या अवाढव्य चमत्काराकडे ती अगदीं निरखून पाहत राहिली. सूर्यास्त पाहतांना रविबिंबाचा अखेरचा बारीक लाल बिंदु क्षितिजाखालीं बुडतांना दिसावा म्हणून ती पुष्कळदा अगदी दृष्टि राखून बसत असे. त्याप्रमाणें झपाझप दूरदूर सरकणारं, अन् सरकतां सरकतां अस्पष्ट होत जाणार तें इंद्रधनुष्य अखेर ज्या क्षणी अदृश्य होईल त्या क्षणी आपली नजर त्यावर असली पाहिजे असं तिनं मनाशीं ठरविलं होतं——

पण तितक्यांत बाजूच्या उतरणीवर इतका वेळ चरत असलेल्या मेंढ्या एकदम उधळून पळाल्याची तिला चाहूल आली. अन् त्यापाठोपाठ कुत्र्याच्या भुंकण्याचा आवाज तिच्या कानीं आला. मेंढ्या राखणाऱ्या पोरांनीं आरोळ्या ठोकल्या अन् आपापल्या हातातल्या काठ्या उगारून धावपळ करून आजू-बाजूला राहिलेल्या मेंढ्या कळपांत घातल्या. कुत्र्याच्या भुंकण्याचा आवाज जवळ आल्यासारखा वाटला. वासंतीनं वळून पाहिलं तो एक भला मोठा कुत्रा मोठमोठ्या उड्या टाकीत धावत येत होता, अन् त्याच्यामागून पळणारा मनुष्य "पाशा, पाशा!" अशा हाका मारीत होता. इतका धिप्पाड कुत्रा वासंतीच्या पाहण्यांत पूर्वी कधीं आला नव्हता. ती पाहतच राहिली.

पल्लेदार झेपा घेत तो कुत्रा तिच्या अगदीं पुढून गेला. नंतर लगेच त्यानं आपल्या मालकाची आज्ञा ऐकायचं ठरविलं, अन् मेंढ्यांच्या कळपाकडे जाण्याऐवजीं तो क्षणभर जागच्या जागीं थबकून उभा राहिला, अन् एक मोठं रिंगण घालून अन् जोरजोरानं भुंकून परत फिरला. कुत्र्याची अन् धन्याची भेट झाली ती वासंतीच्या अगदीं समोर.

त्या तरुण मनुष्यानं हातांतला चाबूक उंच उगारला तेव्हां वासंतीला वाटलं आतां त्याचा फटका कुत्र्याला बसणार. पण तसं झालं नाहीं. आपली

झुपकेदार शेपटी हालवीत कुत्रा अगदीं जवळ सरकला व त्यानं मालकाकडे अशा कांही दृष्टीनं पाहिलं, कीं जणू त्याला म्हणायचं होतं, "चुकलों, क्षमा करा." मालक हसला, अन् "पाशा" असं म्हणून त्यानं त्याची पाठ थोपटली. त्याच क्षणीं त्या तरुण पुरुषाची दृष्टि वासंतीकडे गेली. जणू कांहीं तरी अनपेक्षित गोष्ट दृष्टीस पडल्याप्रमाणें तो चमकला; पण लगेच आपण दचकल्यासारखं दाखविणं बरं नव्हे असं वाटून की काय, तो तिच्यावरची नजर दूर न करतां किंचित् हसला.

वासंती म्हणाली, "कुत्रा फार आज्ञाधारक दिसतो."

तिला उत्तर देण्याऐवजी तो तरुण पुरुष आपल्या कुत्र्याकडे वळून म्हणाला.

"ऐकलंस पाशा ?"

धन्याचा तो प्रश्न ऐकताच पाशानं आपले दोन्ही कान टवकारून उभे केले. इतका वेळ दौड केल्यामुळं लागलेली जोराची धाप आवरून जीभ आत घेऊन तोंड मिटून एकदां धन्याकडे आणि एकदा वासंतीकडे असं त्यानं आळीपाळीनं पाहिलं, आणि मग मान उंच करून हवेंत भुंकल्यासारखं तो मोठ्यांदा भुंकला.

वासंतीला हसू आवरेना.

तो तरुण म्हणाला, "ही त्याची आभार मानण्याची रीत आहे बरं का."

"असं ?" वासंतीनं आपल्या हसण्याला मग पुरती वाट दिली.

तो तरुण तिच्याकडे पाहतच राहिला. जणू इतकं मधुर हास्य तो जन्मांत प्रथमच ऐकत होता.

पाशाच्या मनांत काय आलं कुणास ठाऊक, त्यानं आसपासची जमीन हुंगली, एके ठिकाणचं गवत तोंडानं थोडंसं कुरतडल्यासारखं केलं, मागच्या पायांनीं जमीन जोरानं घासून माती उडविली, अन् मग स्वतःभोंवतींच एकदोन प्रदक्षिणा करून त्यानं बैठक मारली.

तो तरुण हसला व म्हणाला, "वा, पाशा, इथें कांहीं वेळ बसायचा तुझा विचार आहे वाटतं ? आपल्याला अजून तीन मैल जायचं आहे. ऊठ !"

आतां जमिनीसरपट असलेली पाशाची भली मोठी शेपटी हालली, आणि 'अं हं. मी नाहीं उठणार' असा दृष्टीचा आविर्भाव करून तो एकदोनदा शिंकरला. त्याला कसला तरी मनस्वी आनंद झाला होता.

"असं माळरानांत दौडायला सापडलं, कीं पाशाची स्वारी मोठी खूष असते. घरीं चैन पडत नाहीं त्याला."

"घरीं म्हणजे—?" वासंतीनं हलकेच प्रश्न केला.

"म्हणजे पुण्याला. तिथें पाशाला बरोबर घेऊन दौड करायची हौस मला कशी भागवतां येणार? मी दिवसभर आपल्या कामांत असतों."

वासंतीच्या मनांत आलं, कसलं काम म्हणून विचारावं. पण तिला धीर झाला नाहीं. आणि शिवाय तो लगेच पुढें म्हणाला,

"मग महिन्या दीड महिन्यानं दोन दिवसांची सवड काढतों अन् पाशाला घेऊन इकडे येतों. त्या पलीकडच्या भोकरगांवचे पाटील आमची दोघांची मोठी उत्तम बरदास्त ठेवतात. तुम्हांला माहीतच असतील जानबा पाटील?"

"हो, आमच्या बापूकडे येतात ते कधीं कधीं."

"असं होय? म्हणजे बापूसाहेबांच्या आपण –"

त्यानं पुढचा शब्द उच्चारला नाहीं पण तो ओळखून वासंतीनं मान हलविली, अन् किंचित् हास्य केलं.

तो तरुण म्हणाला, "जानबांच्या तोंडून मी तुमच्या वडिलांचं नांव ऐकलं आहे. अन् मला वाटतं तुमचंहि ऐकलं आहे. वासंती ना?"

तिनं हसून त्याच्याकडे पाहिलं.

त्यानं खिशांतून सिगरेटची डबी काढली. एक सिगरेट ओठांत धरून डबी परत ठेवली आणि काडयाची पेटी हवी म्हणून तो खिसे चाचपूं लागला. पण एकाही खिशांत ती त्याला मिळेना. त्याच्या रुंद कपाळावर आठ्या दिसल्या आणि त्यांकडे पाहतांना वासंतीच्या लक्षांत आलं, कीं त्याच्या भुंवया दाट होत्या आणि डोळ्यांची नजर तीक्ष्ण व शोधक होती.

तोंडांतली सिगरेट काढून घेत तो म्हणाला, "Bad luck मला तर सिगरेट ओढायची विलक्षण तल्लफ झाली आहे. पाशा, Do you have matches?"

पाशाच्या कानाची हालचाल झाली, व मान वाकडी करून तो धन्याकडे पाहूं लागला. जणूं त्याला म्हणायचं होतं. "माझ्याजवळ कुठली काडयाची पेटी?"

तो तरुण हसला व म्हणाला, " पाशा आतां ऊठ. गांवांत परत गेल्याशिवाय मला सिगरेट ओढायला मिळायची नाहीं. चल."

पाशानं मग अधिक हट्ट केला नाहीं. तो उठला; इतकंच नव्हे तर एक उडी मारून त्यानं दोन चार झेपा घेतल्या, व मान मुरडून धन्याकडे पाहिलं.

पण त्या वेळीं त्याच्या धन्याची दृष्टि त्याच्याकडे नव्हती. वासंतीकडे पाहून हसत कांहीं न बोलतां त्याचा धनी तिचा निरोप घेत होता.

थोडयाच वेळांत धनी व कुत्रा दोघेही दूर अंतरावर गेलेले वासंतीला दिसले. त्या दोन आकृतींकडे कांहीं वेळ पाहत राहून वासंतीनं आपली दृष्टि फिरविली, व तिच्या पायापाशीं पांच-सहा पिवळ्या रानफुलांचा झुपका होता तो तिनं उगीचच्या उगीचच खुडून फेकून दिला. तिच्या मनांत आलं, " पाशा! किती चमत्कारिक नांव! "

---

## २

दारावरच्या घंटेचं बटन दाबून वासंती वाट पाहत उभी राहिली, तिनं आजूबाजूला पाहिलं तों बंगल्याच्या आवारांत फुलझाडांच्या कुंड्या किंवा वेली नव्हत्या, प्रिन्सिपलसाहेबांना झाडांफुलांचा षोक नसावा, दारापाशीं नांवाची पाटी होती तीसुद्धां ओबडधोबड लाकडाची; अन् पावसापाण्यानं पुसट झालेल्या अक्षरांची होती, अंगणाच्या उजव्या बाजूस दोन लिंबाच्या झाडांना दोऱ्या बांधल्या होत्या त्यांवर सदरे, धोतरें वाळत होतीं. मुंबईच्या कॉलेजांतल्या साहेबी थाटांत राहणाऱ्या प्रिन्सिपलहून अगदीं निराळ्या तऱ्हेची व्यक्ति आपल्याला दिसणार हें वासंतीनं ओळखलं, 'पुण्यांत? शी:! पुण्यांत काय आहे?' हे तिच्या वडिलांचे शब्द तिला आठवले, पण तिच्या मनांत लगेच आलं, छे असं कसं? पुणं म्हणजे तर महाराष्ट्राची बौद्धिक राजधानी आहे, विद्वानांचं हें माहेरघर आहे; इथं थाटमाट अगर झोकनोक नसेल पण विद्या अन् व्यासंग हीं खचित आहेत..

आपण पुण्याला आलों हें चुकलं तर नाहीं अशी सूक्ष्म शंका वासंतीच्या मनांत अजून रेंगाळत होती, व ती घालविण्यासारखे विचार ती मनांत आणीत होती. तिनं मागें वळून दृष्टि टाकली तों उजव्या बाजूला कॉलेजची भव्य सुंदर इमारत तिला दिसली, अन् समोर केवढं तरी विस्तृत क्रीडांगण तिच्या नजरेस पडलं. एकदोन पाऊस होऊन गेल्यामुळें मैदानावर जागोजाग तृणांकुरांचा हिरवा रंग उमटूं लागला होता, मैदानाच्या कडेला झाडांची रांग लागली होती, अन् पलीकडे पर्वतीची टेकडी मकाळच्या उन्हांत तळपत होती. रम्य नव्हतं काय तें स्थान? तिचे इथले दिवस सुखांत जाणार याबद्दल तिनं उगीच काय म्हणून संशय धरावा? ती पुण्याला आली हेंच ठीक झालं.

तितक्यांत तिच्या लक्षांत आलं, अरे, आपण बटन दाबल्याला पुष्कळ वेळ झाला कीं! तिनं पुन्हा बटन दाबलं तरी आतून उत्तर येईना. आणखी एकदां तिनं बटनावर बोट ठेवलं. अन् मग तिच्या लक्षांत आलं, कीं आंत घंटा वाजल्याचा आवाज होतच नव्हता. बटन मोडलं असलं पाहिजे. मग तिनं दारावर मुठीनं आघात केले, अन् बाहेरचा आडवा बोलटहि खडखडावला.

"कोण आहे?" असा घोगरा गंभीर आवाज तिला ऐकू आला. खडावा वाजल्या, दार उघडलं गेलं अन् तिच्यापुढं एक उंचनिंच बांध्याचे, मोठ-मोठ्या मिशांचे गृहस्थ उभे असलेले तिला दिसले.

हेच प्रिन्सिपल असतील? वासंती किंचित् घोटाळली. पण तितक्यात त्या गृहस्थांनीं जेव्हां 'कोण पाहिजे?' म्हणून विचारलं तेव्हा तिच्या तोंडून शब्द निघाले, "प्रिन्सिपल--"

"मीच" असं म्हणतांना दुसरा एखादा मनुष्य हसला असता असं वासंतीला वाटलं. पण दारांतल्या त्या भव्य गृहस्थांची चर्या गंभीरच होती. बंगल्यापुढच्या अंगणांत फुलझाडं किंवा वेली नव्हत्या, अन् दारावरच्या पाटीची निगा राखली गेली नव्हती तें बरोबर आहे असं वासंतीला वाटलं.

ती म्हणाली, "बापूसाहेब पटवर्धनांची--"

तिचं वाक्य पुरं होण्यापूर्वींच प्रिन्सिपल म्हणाले, "असं होय? या ना, आंत या. बापूचं पत्र कालच आलं मला."

त्यांच्या भव्य आकृतीमुळें आणि चेहऱ्यावरच्या गांभीर्यामुळें वासंतीच्या मनांत जो बावरलेपणा उत्पन्न झाला होता तो त्यांच्या या बोलण्यानं पुष्क-

ळच कमी झाला. खडावांचा आवाज करीत ते पुढें झाले व ती त्यांच्या मागोमाग आंतल्या खोलींत गेली.

ते आपल्या खुर्चीवर बसत म्हणाले, "अस्सं, तुम्ही आमच्या कॉलेजांत येणार तर ? बसा ना खुर्चीवर."

वासंती बसली. किती जाडजूड राठ लाकडाची पॉलिश उडालेली खुर्ची होती ती ! एकंदरीत या घरांत पॉलिशकडे लक्ष नव्हतंच. भिंतीवर एकहि चित्र नव्हतं. दोनतीन लठ्ठ, ठोकळेबाज खुर्च्या त्या आपल्या मनानं राहिल्या तिथें राहू दिल्या होत्या, भिंतीच्या रंगाचे खवले निघाले होते, चहूंबाजूला लोखंडी शेल्फं होतीं त्यांवर पुस्तकं रचून उभीं होतीं. ठिकठिकाणीं फाइली आणि वह्या पडल्या होत्या. खुंटाळ्यावर एक लांब कोट आणि पांढरा रुमाल यांखेरीज कांहींच नव्हतं. आणि कोपऱ्यांत बुटाची एकच जोडी होती तिच्याकडे पाहताच वासंतीच्या मनांत आलं हे बूट घेतले गेले तेव्हां बहुतेक मी इंग्रजी चवथींत असेन. ज्या टेबलासमोर प्रिन्सिपल बसले होते त्यावर कपडा नव्हता, अन् जाड जाड पुस्तकं, कागद, दौत, टाक, कॅलेंडर इत्यादि वस्तु जागेसाठीं एकमेकांशी भांडत होत्या. व्यवस्थेचं अन् प्रिन्सिपलसाहेबांचं वरंच वाकडं असावं असं वासंती मनाशीं म्हणणार तोंच प्रिन्सिपलनीं टेबलावरच्या कागदांच्या भाऱ्यांतून नेमकं एक पत्र ओढून काढलं व म्हटलं, "हें बापूचं पत्र. आज त्याला आठवण आली काय माझी ? पण असो, आज तरी झाली म्हणायची. हं, बरं काय मदत पाहिजे ? वसतिगृहांत राहणार ना ? "

वासंती उत्तर देणार इतक्यांत त्या आंतल्या खोलीच्या दारावर टक्‌टक् करून कुणी तरी विचारलं, "May I come in Sir ?"

प्रिन्सिपलनी फक्त 'Yes' म्हटलं, आणि दुसऱ्या क्षणीं आपल्या उजव्या हाताला जरा अंतरावर कुणी तरी येऊन उभं राहिलं असं वासंतीला वाटलं. दृष्टि फारशी न वळवितां तिनं पाहिलं तों तिच्याच वयाचा एक तरुण मुलगा प्रिन्सिपलसाहेबाकडे तोंड करून उभा होता.

प्रिन्सिपल त्याला विचारीत होते, "काय काम आहे ? "

"मला सर्टिफिकेट पाहिजे आहे."

"म्हणजे ? तुम्ही कॉलेज सोडून जाणार काय ? "

त्या विद्यार्थ्यानें नुसती मान हलविली.

"कां ?"

"यंदा घरचा सपोर्ट मिळेल असं वाटत नाहीं. नोकरी पाहिली पाहिजे. एके ठिकाणीं अर्ज केला आहे. आपलं चांगलं सर्टिफिकेट मिळालं तर मिळेल मला ती नोकरी."

"कुठें ?"

"खडकीच्या 'आर्सेनल' मधें. चांगल्या हॉकी प्लेअर्सना तिथला साहेब मुद्दाम चान्स देतो."

प्रिन्सिपलनी टेबलाचा खण उघडला, अन् मेंथॉलच्या काचेच्या बाटली-सारखी एक बाटली काढली. तिच्यांतली एक चिमूट काढून ती नाकाला लावण्यापूर्वी बोटांवर चाळवीत ते म्हणाले, "पण तुम्ही गेल्यावर आमच्या टीमचं कसं व्हायचं ? चंद्रकांत कॅप्टन नसेल तर आमची टीम काय राह्यली ?

"पण सर, यंदा घरची परिस्थिति अगदींच ---- कॉलेज सोडून जायचं माझ्या जिवावर येतं पण---"

हातांतल्या डबीच्या झाकणावर उजव्या हाताचं बोट मारीत प्रिन्सिपल म्हणाले, "Oh, no, no, you can't go."

"पण सर, खडकीच्या साहेबाला मी भेटून आलों, अन् त्यानं मला जवळ जवळ प्रॉमिस केलं आहे."

प्रिन्सिपल हसले, वासंतीच्या मनांत आलं हे हसतात तर ; ते चंद्रकांतला म्हणाले, "त्याचं काय करायचं तें मग सांगेन मी तुम्हांला. पुन्हा या केव्हां तरी."

असं म्हणतांना त्यांनीं वासंतीकडे अशा तऱ्हेनं दृष्टि टाकली कीं, जणूं त्यांनीं म्हटलं, 'सध्यां मी यांच्याशीं बोलतों आहे ; मग या.'

चंद्रकांताला तें कळलं व त्यानें विचारलं, "पुन्हा केव्हां येऊं ?"

"केव्हांही."

"मग मी जाऊं तर ?"

"हं"

तो गेल्यावर प्रिन्सिपलनीं वासंतीला विचारलं, "मग काय तुम्ही वसति-गृहांत राहणार ?"

"होय; बापूंचे एक आतेभाऊ इथें आहेत. पण त्यांच्याकडे राहण्यापेक्षां-"

" छे छे, वसतिगृहांतच राहणं उत्तम. नातलगाकडे राहिलं कीं त्यांनाहि त्रास व राहणारालाही त्रास होतो अन् शिवाय आमचं वसतिगृह अगदीं फर्स्ट क्लास आहे. दहा नंबरची खोली घ्या; मी रेक्टरना चिठी पाठवतों. फार सुंदर आहे ती खोली. तुमचं मन अगदीं प्रसन्न राहील तिथें."

* * *

ती खोली सुंदर आहे असं प्रिन्सिपल म्हणाले त्यांत अतिशयोक्ति नव्हती असं, आपलं सामान तिथें आणून लावतांना वासंतीला कबूल करावं लागलं. पण ' तुमचं मन अगदीं प्रसन्न राहील तिथें ' हें त्यांचं भविष्य निदान त्या दिवशीं तरी खरं ठरलं नाही.

वासंतीचा तो सबंध दिवस मोठ्या चमत्कारिक मनःस्थितींत गेला. दुपारीं ती कॉलेजांत गेली तों मुलांचे थवे ठिकठिकाणीं उभे असलेले तिला दिसले; जुन्या ओळखीचे मित्र एकमेकांच्या पाठीवर थाप मारीत होते, चेष्टामस्करी करीत होते, हसत होते; परस्परांच्या नव्या ओळखी होत होत्या. कांहीं विद्यार्थि अिकडे तिकडे लगबगीनं जात होते. कॉलेजच्या आवारांत मधेंच एखादी मोटार वेगानं येऊन थडकत होती; ऑफिसपाशीं बरेच विद्यार्थि उभे होते; नोटीस–बोर्डापुढें तर एकमेकांच्या पाठीवर रेलून विद्यार्थ्यांनीं गर्दी केली होती, कॉलेजच्या पट्टेवाल्यांच्या येरझारा चालू होत्या, व प्रोफेसर मंडळींच्या बसायच्या खोलींत उच्च स्वरांत बोलणीं चालू होतीं. विद्यार्थिनींच्या विश्रांतीच्या खोलींत मुलींचा केवढा तरी घोळका जमलेला होता. पण या एकंदर लगबगीच्या आणि उल्हासाच्या वातावरणांत वासंतीचं मन रमेना. तिच्या ओळखीचं कुणीच नव्हतं. आपण होऊन ओळख करून घेऊन लोकांत मिसळण्याचा तिचा स्वभाव नव्हता. त्यामुळें आजूबाजूस इतकी गर्दी असून व हास्यविनोद चालला असूनहि तिला अगदीं एकटं एकटं वाटलं. ती कॉलेजांत फार वेळ थांबली नाहीं. खोलींत परत येऊन ती आपलं सामान लावूं लागली. पण तीहि गोष्ट करावीशी तिला वाटेना. मग तिनं तो उद्योग सोडून दिला, अन् पश्चिमेकडच्या खिडकीजवळ जाऊन ती उभी राहिली.

वसतिगृहाच्या इतर खोल्यांचीं दारं लावलीं उघडलीं जात होतीं, त्यांचे आवाज तिच्या कानीं येत होते. तिला वाटलं, किती हीं दारं, अन् काय ही धडपड ! मुली एकमेकींना ' सुमे ' ' कमे ' ' शरद् ' अशा हाका मारीत

होत्या. 'ए, ये ना माझ्या खोलींत जरा.' 'चल जाऊं ग, असं काय करतेस' अशीं त्यांचीं एकमेकींत बोलणीं चाललीं होतीं तीं वासंतीला अस्पष्ट ऐकूं येत होतीं. मधेंच दोघी-चौघी गॅलरींतून धावत जात तेव्हां त्यांच्या पायांतल्या चपलांचा आवाज होत होता. वासंतीनं खिडकींतून बाहेर पाहिलं तों घरांचीं वाकडीं-तिकडीं छपरं तिला दिसलीं. मधेंच देवळाच्या एका शिखरानं मान उंच केली होती अन्, त्याचा कळस झळकत होता. पलीकडे एका अरुंद रस्त्यानं धुतलेल्या काळ्याभोर लठ्ठ म्हशींची रांग सावकास चालली होती, अन् त्यांच्या गळ्यांतल्या घंटाचा ध्वनि हवेंत तरंगत होता. दूरच्या एका तिमजली घराच्या उंच छपरावर एक माकड बसलं होतं. त्यानं कांहीं वेळ आपली कमर खाजवली, कपाळाला आठ्या घालून इकडे तिकडे पाहिलं अन् त्यानं कसला विचार केला कुणास ठाऊक, एकदम झेप घेऊन तें जें उठलं तें छपरा-छपरावरून उड्या टाकीत पार दिसेनासं झालं. वर आभाळ आज अगदीं निरभ्र होतं, आणि क्षितिजाकडच्या टेकड्यांवर झगझगीत तांबूस निळसर रंग दिसूं लागला होता. संध्याकाळ जवळ येत चालली असं सुचविणारा वारा झोप संपवून संचाराला निघाल्याप्रमाणें वाहूं लागला होता.

पण वासंतीच्या मनाला प्रसन्नता कांहीं केल्या वाटेना. असं वसति-गृहांतल्या खोलींत राहण्याची ही तिची पहिलीच वेळ होती. राहून राहून तिला घरची आठवण येई. मालीचा फोनोग्राफ चालूच आहे असा तिला भास होई. घरांतल्या मागच्या परसाच्या दाराजवळ असलेल्या गोठ्यांतून गाई हंबरल्या असं तिला वाटे. ती पुण्याला यायला निघाली तेव्हांच त्यांच्या घरची सगळ्यांत मोठी गाय नंदिनी व्याली होती अन् गडी-माणसांत केवढी धांदल उडाली होती. तिला निरोप देतांना भागू मोलकरीण तिची दृष्ट काढतां काढतां म्हणाली होती, 'खरवस खायला आमच्या ताई आतां नाहींत,' आणि त्या भोळ्या जीवाच्या डोळ्यांत चटकन् पाणी उभं राहिलं होतं.....पण या आयुष्यांत अशा किती तरी ताटातुटी होत असतात.... गेल्या उन्हाळ्यांत परीक्षा संपवून ती मुंबईहून निघाली तेव्हां त्याला एकदां अखेरचं भेटावं असं तिच्या मनांत एक-दोनदां आलं होतं....

छे! या आठवणी तिला मनांत बिलकुल येऊं द्यायच्या नव्हत्या!....

ती खिडकींतून परत वळली अन् त्याच वेळीं दारावर कुणी तरी टक्टक् केलं. तिनं पुढें होऊन दार उघडलं. तिच्यासमोर तिच्याहून एक-दोन वर्षांनीं लहान अशी मुलगी उभी होती. अन् तिच्या मागें ट्रंक-वळकटी डोक्यावर

घेऊन एक मजूर उभा होता. खोलीच्या दारावरच्या नंबराकडे एकदां पाहून तिनं वासंतीला विचारलं, " वासंती पटवर्धन तुम्ही ? "

वासंतीनं मान हलविली.

" मी तुमची कंपॅनियन आहे. माझं नांव सुरंगा नाईक. "

" या ना आंत. " असं हसत म्हणून वासंती आंत वळली.

सुरंगा मोठी बोलकी मुलगी दिसली. आपलं सामान उलगडतांना ती सारखे प्रश्न तरी विचारीत होती किंवा आपली स्वत:ची कांहीं हकीकत तरी सांगत होती. वासंती कोणत्या क्लासांत होती, यंदाच ती पुण्याला कां आली होती, तिचं घर कुठें होतं, ती टेनिस खेळत होती काय, तिनं कोणकोणत्या कादंबऱ्या वाचल्या होत्या ?–

तिची ती उल्हासी बडबड ऐकून वासंतीच्या मनांतली अस्वस्थता बरी-चशी नाहींशी झाली. आपल्याला चांगली सोबतीण मिळाली असं तिला वाटलं, आणि इतका वेळ खोलींत परत येऊनही तिनं चहा घेतला नव्हता; तो तिला आतां घ्यावासा वाटला.

चहा घेतां घेतां सुरंगा सांगूं लागली,

" मॅट्रिक होण्याच्या आधींपासूनच मी या कॉलेजांत यायचं ठरवलं होतं. माझा थोरला भाऊ इथूनच पास झाला. तो आतां कुलाब्याच्या ऑब्झर-वेटरीमध्यें नोकरीला आहे. मी शाळेंत असतांना त्याच्या तोंडून नेहमीं ऐकायची कॉलेजांतल्या हकीकती, अन् वाटायचं आपल्याला केव्हां एकदां जायला मिळेल कॉलेजांत ? खूप बेत केले आहेत मी मनाशीं. त्यांतले मुख्य दोन म्हणजे खूप वाचायचं, अन् पोहायला शिकायचं. तुम्हाला येतं पोहायला ? "

वासंतीनं चटकन् उत्तर दिलं नाहीं. तिची चर्या एकदम गंभीर झाली अन् मान वळवून तिनं खिडकीकडे पाहिलं. दोन पाखरं उडत गेलीं तीं आकाशाच्या निळ्या पार्श्वभूमीवर क्षणभर तिच्या नजरेस पडलीं. मनां-तल्या जुन्या सुखदु:खांच्या आठवणी अशाच उडून जाऊन नाहींशा कां होत नाहींत ?

" होय ? येतं कां तुम्हांला पोहायला? " असं सुरंगानं पुन्हां विचारलं. तिचं चित्त मुंबईच्या समुद्रकांठावरून परत आलं. तिची मान थोडीशी हलली व तिच्या तोंडून शब्द निघाले,

" हं येतं."

" अगदीं चांगलं ? "

" आतां काय सांगावं या मुलीला ! "

" तुम्हांला चांगलं येत असेल तर तुम्ही मला शिकविलं पाहिजे म्हणून पहिल्याच वर्षांतली विद्यार्थिनी कंपॅनियन म्हणून घ्यायची नाहीं असं मी मनाशीं ठरविलं होतं. तुम्ही मला मिळालांत हें फार छान झालं. माझ्यापेक्षां बुद्धीनं मोठ्या माणसांचा सहवास मला आवडतो. कारण अशा सहवासानं माणसाला कांहीं शिकतां येतं, मोठं होतां येतं, नाहीं का ? तुमचं माझं छान जमेल असं मला वाटतं."

असं म्हणून ती मनमोकळेपणानं हसली, आणि कपबशी उचलून विसळूं लागली; तेव्हां तिच्या प्रश्नानं उत्पन्न झालेली क्षणापूर्वीची वासंतीच्या मनांतील विषण्णता दूर झाली.

* * *

खरोखरच वासंतीचं आणि सुरंगाचं चांगलं जुळलं. त्या दोघी रोज मिळून कॉलेजांत जाऊं लागल्या, मिळून परत येतां आलं नाहीं, तर चहा-साठीं एकमेकींची वाट पाहूं लागल्या, पाऊस नसेल अशा दिवशीं फिरायला जाऊं लागल्या आणि तासामधल्या विश्रांतीच्या वेळीं विद्यार्थिनींच्या खोली-पुढच्या गॅलरींत कठड्याला टेकून शेजारीं शेजारीं उभ्या राहूं लागल्या. थोड्याच दिवसांत कॉलेजांतल्या विद्यार्थ्यांत दुक्कल म्हणून त्यांचा उल्लेख होऊं लागला.

एके दिवशीं मधल्या सुटींत त्या दोघी बोलत गॅलरींत उभ्या होत्या. बोलतां बोलतां एकदम आपल्या कोपरानं वासंतीचा दंड हलवून सुरंगा म्हणाली, " तो पाहिलास का ? "

" कोण ? "

" तो बघ खालीं पोर्चच्या दाराजवळ, त्या चष्मेवाल्या मुलाशीं बोलतो आहे तो."

" तो किडकिडीत---"

" नाहीं ग ! किडकिडीत कुठला ? इश्श्, तो नव्हे ; तो दुसरा, पॅंट घातली आहेत तो."

" हां-हां, तो होय ? बरं, त्याचं काय ? "

" तो आमच्या गांवचा आहे. माझी अन् त्याची थोडी ओळख आहे. आमच्या नानाकडे येत असे तो. फार गरीब आहेत त्याची घरची मंडळी. यंदा कॉलेज सोडीन म्हणाला होता; पण आला वाटतं कॉलेजांत."

वासंती म्हणाली, " याला मी पूर्वी कुठें तरी पाहिल्यासारखं वाटतं ग!"

" होय ? कुठें ? "

" आठवत नाहीं बाई; पण मला वाटतं—"

तितक्यांत खालीं दारापाशीं उभे असलेले ते विद्यार्थी पायऱ्या उतरून दिसेनासे झाले, दुसऱ्या तासाची घंटाही झाली, अन् त्या दोघी लगबगीनं गॅलरींतून दूर झाल्या. पण रात्रीं सुरंगानं पुन्हा आठवण काढून वासंतीला विचारलं " कुठं पाह्यलं होतंस त्याला तू ? "

वासंती पुस्तक वाचण्यांत गढली होती. तिनं मान वळवून विचारलं, " त्याला म्हणजे कुणाला ? "

" चंद्रकांताला ! "

" हां—हां, तूं आतां नांव सांगितलंस म्हणून आठवलं बघ. मी प्रिन्सिपलना भेटायला प्रथम गेलें होतें, तेव्हां तो त्यांच्याकडे आला होता. आत्तां आठवलं. तो आपल्या कॉलेजच्या हॉकी टीमचा गतवर्षी कॅप्टन होता म्हणे."

" हं. आमचा नाना म्हणतो तो फारच छान खेळतो." असं म्हणून सुरंगा त्याच्या हकीकती सांगूं लागली.

पण वासंतीचं मुळींच लक्ष नव्हतं—पुरुषांविषयींची तरुण मुलींच्या मनांत जी जिज्ञासा असावयाची, ती तिच्या बाबतींत करपल्यासारखी झाली होती. कॉलेजांत किती तरी सुदृढ, देखणे तरुण विद्यार्थि तिच्या दृष्टीला दिसत; पण ते दिसले काय न दिसले काय अशीच तिची भावना असे. चंद्रकांत तिला प्रथम दिसला, त्या वेळींहि तिनं त्याच्याकडे विशेष लक्ष दिलं नव्हतं. अन् आतांहि सुरंगा त्याच्याबद्दल बोलत होती तें ती फक्त वरकांती लक्ष देऊन ऐकत होती.

दुसऱ्या दिवशीं पहिल्या दोन तासांनंतर वासंतीला सुटी मिळाली. खोलींत परत जाण्याऐवजीं लायब्ररींत जाऊन वाचीत बसावं असा विचार करून ती तिकडे गेली. तिच्या इंग्रजीच्या प्रोफेसरांनीं फ्रँक हॅरिसचं 'बर्नार्ड शॉ' हें पुस्तक वाचण्याची शिफारस केली होती, व तीनचार वेळां प्रयत्न करूनहि

तें तिला मिळालं नव्हतं. कुणी ना कुणी तरी तें नेलेलं असे. तिनं लायब्रेरियनला विचारलं, " आज तरी मिळेल का मला फ्रँक हॅरिसचं बर्नार्ड शॉ ? "

" अवश्य; तुमची मागणी मी नोंदून ठेवली होती, अन् परवां तें पुस्तक परत आल्यापासून तुमच्यासाठीं राखून ठेवलं आहे. "

" थँक यू ! "

तिनं तें पुस्तक घेतलं अन् लायब्ररींतली एका कोपऱ्यांतली निवान्त जागा पाहून त्याचीं प्रकरणं ती चाळून पाहूं लागली. सतराव्या प्रकरणाचा मथळा ' Shaw 's Sex Credo ' असा होता. ती विशेष उत्सुकतेनं वाचूं लागली—

" What do you consider the greatest obstacle to the emancipation of women ? " Louis Wilkinson once asked Shaw in a long questionnaire. "

( लुई विल्किन्सन् यांनीं एकदां शॉंची मुलाखत घेण्यासाठीं बरेच प्रश्न पाठविले. त्यांत विचारलं, " स्त्रियांची दास्यविमोचनांतून सुटका होण्यांत सगळ्यांत मोठं विघ्न कोणतं आहे असं तुम्हांला वाटतं ? " )

" Lust ! " He replied.

( शॉंनीं उत्तर दिलं, " कामुकता ! " )

वासंतीला पुढं वाचावंसं वाटेना. शॉंच्या त्या उत्तराचा तिला फार राग आला. जगांतला सगळ्यांत खवचट विद्वान् अशी टीका शॉवर थोड्याच दिवसांपूर्वीं तिच्या प्रोफेसरांनी वर्गांत त्याचं ' The philanderer ' हें नाटक शिकवितांना केली होती, त्याची तिला आठवण झाली. कांहीं वेळ तें पुस्तक तसंच पुढं उघडं ठेवून ती स्वस्थ बसली ; पण मग तिचीं बोटं त्या प्रकरणाचीं पानं उलटूं लागलीं. २३७ व्या पृष्ठावर पुढील मजकूर होता,

" I found sex hopeless as a basis for permanent relations and never dreamt of marriage in connection with it. I put everything else before it, and never refused or broke an engagement to speak on Socialism to pass a gallant evening. I liked sexual intercourse because of its amazing power of producing a celestial flood of emotion... "

("दोन व्यक्तींमध्यें गाढ संबंध उत्पन्न करण्याच्या दृष्टीनें कामवासनेच्या तृप्तीचा कांहीं एक उपयोग नाहीं असं मला आढळून आलं व त्या तृप्तीचा आणि विवाहाचा मी मनानं कधींच अन्योन्यसंबंध मानला नाहीं. इतर सगळया गोष्टींपेक्षां कामतृप्तीचं महत्त्व मी कमी समजत असे, आणि एखाद्या स्त्रीच्या सहवासांत, चैनींत संध्याकाळची वेळ घालविण्यासाठीं 'सोशॅलिझम्‌वर' व्याख्यान देण्याचं आमंत्रण मी नाकारलं अथवा चुकविलं, असं तर कधींच झालं नाही. कामतृप्तींत मला सुख वाटे तें अशासाठीं, कीं भावनांचा प्रचंड स्वर्गीय पूर उत्पन्न करण्याचं तिच्यांत सामर्थ्य आहे असं....")

वासंतीनं पुढें वाचण्याऐवजी तें पुस्तक मिटून टाकलं. मात्र तिनं तसं केलं तें रागानं नव्हे. शॉच्या पत्रांतल्या परिच्छेदातल्या पहिल्या वाक्यानं तिचे विचार एका विशिष्ट दिशेनं सुरु झाले होते. ज्या कारणासाठीं मुंबईला न जातां ती पुण्यास आली होती, जे दुःख तिला विसरायचं होतं, त्याचं तात्त्विक स्वरूप समजून घेण्याचा तिनं गेल्या कांही दिवस मनाशीं पुष्कळ प्रयत्न केला होता, आणि प्रत्येक वेळीं तिची विचारशक्ति अपुरी पडून कुंठित झाली होती. शॉच्या पत्रांतलं तें वाक्य वाचतांच कांही तरी नवा प्रकाश दिसल्यासारखं तिला वाटलं....प्रेमाच्या स्वरूपाबद्दल तिचं व ज्याचं प्रेम तिला हवसं वाटलं होतं त्याचे विचार न जुळल्यामुळे तर तिच्या वाट्याला निराशा आली नव्हती ?....

ती आपल्या विचारांत इतकी मग्न झाली, कीं आपल्या पाठीवर कुणी तरी हात ठेवला आहे असं तिला वाटतांच ती दचकली. तिनं वर पाहिलं, तेव्हा सुरंगा हसत होती.

"इश्श ! इतकी दचकलीस काय ? माझे तास संपल्यावर मी इथें यायचं अन् मग आपण मिळून खोलीवर जायचं असं ठरलं होतं, तें विसरलीस वाटतं ?"

आत्तां कुठें वासंती आपल्या विचारांतून पुरती जागी झाली, अन् तिला आढळून आलं कीं, तिच्यापुढें एकटीच सुरंगा उभी नव्हती. थोड्या अंतरावर एक विद्यार्थी——

होय, तोच होता तो——

इतक्यांत सुरंगा त्या मुलाकडे वळून म्हणाली,

"ही माझी मैत्रीण वासंती पटवर्धन."

आणि लगेच तिनं वासंतीला म्हटलं,

"हा चंद्रकांत !"

तो मोठ्या आदबीनं हसला.

सुरंगा म्हणाली, "चल, जाऊं या ना खोलीकडे ?"

नंतर लायब्ररींतून बाहेर पडून व वसतिगृहाच्या वाटेला लागल्यावर सुरंगा व चंद्रकांत यांचंच संभाषण चाललं होतं. ती दोघं एकमेकांचं कुशल विचारीत होतीं, सांगत होतीं.

वासंती कांहीं एक न बोलतां त्यांच्याबरोबर पावलं टाकीत होती. चंद्रकांत मधेंच सुरंगाला म्हणाला,

"आपण दोघं बोलतों आहोंत, अन् या गप्पच राहिल्या आहेत, हें चांगलं नाहीं. आपण दुसरा कांहीं विषय काढूं."

"हो, खरंच कीं ! माझ्या लक्षांतच आलं नाहीं, माफ कर हं, वासंती!"

"तें कां ? तुमचं दोघांचं बोलणं मी ऐकत होतें" असं म्हणून वासंती हसली व तें पाहून चंद्रकांताला बरं वाटलं असं दिसलं.

मग तो कॉलेजच्या जिमखान्याच्या हकीकती सांगूं लागला, अन् त्यांत त्या दोघींनाही संभाषणांत भाग घेतां यावा अशा युक्तीनं तो बोलत राहिला.

विद्यार्थिनींच्या वसतिगृहाजवळ येतांच तो थबकला व सुरंगाला म्हणाला, "अच्छा! मी जाऊं आतां ? नानाला पत्र धाडशील तेव्हां माझे नमस्कार लिही."

तिनं विचारलं, "हें काय ? जातोस ?"

"तर ? तुमच्या या हद्दींत यायची पुरुषांना सक्त मनाई आहे ना ?" असं विचारून तो मोठ्यांदा हसला व "मग येऊं तर ? पुन्हा भेट होईलच केव्हां तरी" असं म्हणून तो झपाझप पावलं टाकीत निघून गेला. 'पुन्हा भेट होईलच' हे त्याचे शब्द नक्की कुणाला उद्देशून होते तें सांगणं कठीण होतं.

खोलीपाशीं पोंचल्यावर एकीकडे दाराचं कुलूप काढीत असतां मान वळवून खांद्यावरून वासंतीकडे दृष्टि टाकीत सुरंगा म्हणाली, "चंद्रकांत तुझ्याच वर्गात आहे कीं ! त्याचा ऐच्छिक विषय निराळा आहे; पण इंग्रजीच्या तासाला तो तुझ्याच वर्गांत असतो, मला सांगत होता तो."

वासंतीनं नुसतं किंचित् हास्य केलं.

आंत गेल्यावर वासंती खाटेवर आडवी झाली, अन् सुरंगा खाटेच्या कडेवर टेकून बसली. ती म्हणाली,

"चंद्रकांत मोठा धाडसी आहे. आमच्या गांवांत एकदां काय झालं---"

वासंती पडल्या पडल्या म्हणाली, "चहा घेऊं या का आतां ?"

"घेऊं; पण मी काय सांगतें तें ऐक तरी !" असं म्हणून ज्या हकीकतीची तिला आठवण झाली होती ती तिनं सांगितलीच.

दुसऱ्या दिवशी सकाळीं कॉलेजाशेजारच्या पुस्तकांच्या दुकानांत वासंती अभ्यासाचीं कांहीं पुस्तकं विकत घेत होती. तिनं किंमती विचारल्या, आपल्या मनी-बॅगमधून नोट काढून ती टेबलावर ठेविली, अन् तिचीं पुस्तकं बांधलीं जात होतीं तोंपर्यंत उजव्या हातच्या एका कपाटाकडे वळून त्यातल्या पुस्तकांवर ती नजर फिरवूं लागली.

कुणी तरी दुकानदाराला विचारलं, "मॅग्डूगलची 'सायकॉलजी' आहे काय ?"

तिनं वळून पाहिलं, व तिची आणि चंद्रकांताची दृष्टादृष्ट झाली. "अरे !" असा उद्गार त्याच्या तोंडून निघाला.

"एकट्याच आलांत ?" त्यानं विचारलं. "सुरंगा कुठे आहे ?"

"कुणाकडेशी गेली आहे ती !"

तिच्याबरोबरच तोहि दुकानाबाहेर पडला व म्हणाला,

"तुमच्याबरोबर आलों तर तुमची हरकत नाही ना ?"

"पण मी परत खोलीवर जाणार !"

"ते माहीत आहे मला, पण या कोपऱ्यापर्यंत. मग मी परत जाईन. मात्र तुमची हरकत असेल, तर मुद्दाम दुसऱ्या रस्त्यानं जाईन, किंवा या रस्त्याच्या उजव्या कडेनं चालायला लागेन."

---वासंतीला हसूं आलं. हातांतल्या पुस्तकांचा गठ्ठा कसाबसा आवरून ती छत्री उघडूं लागली.

"मी घेऊं काय तीं पुस्तकं ?"

"नको." असं म्हणून तिनं छत्री उघडण्याचा प्रयत्न केला. छत्री उघडली गेली; पण पुस्तकं खालीं रस्त्यावर पडलीं.

चंद्रकांतानं तीं झटकन् उचललीं व मग तिची परवानगी न विचारतांच तीं आपल्या हातांत ठेवलीं.

कॉलेजच्या फाटकाजवळ आल्यावर तिनं डावा हात पुढें केला.

पुस्तकं परत देता देतां त्यानं विचारलं, "पुस्तकं संभाळून छत्री मिटवतां येईल का पण ?"

"येईल.' असं म्हणून ती थोडी हसली व मग चटकन् म्हणाली, "थँक यू हं !"

तो हसला व पुढें झाला; पण चारदोन पावलं टाकल्यावर परत वळून म्हणाला, "सुरंगाला एक आठवण कराल का ?"

"काय ?"

"ती मला नानाचा पत्ता देणार होती. तिला म्हणाव, आज पत्ता मिळालाच पाहिजे मला. कधी नव्हे तें पत्र लिहून ठेवलं आहे मी, पण पत्त्यावांचून...सांगाल ना तिला ?"

वासंतीनं मान हलविली आणि मग तो अधिक कांही न बोलतां निघून गेला.

त्याला त्या दिवशीं सुरंगा कॉलेजात भेटली तेव्हां त्यानं विचारलं, "आणला आहेस का नानाचा पत्ता ?"

उजव्या तळहातानं उघडं तोंड झाकून ती म्हणाली, "अय्या ! विसरलेंच की !"

"शाबास ! तरी सकाळीं तुझ्या मैत्रिणीबरोबर निरोप पाठविला होता मी."

"कुणाबरोबर ? वासंतीबरोबर ?"

चंद्रकांतानं मान हलविली.

"पण ती कांहीं बोलली नाहीं मला. तूं भेटला होतास असंहि सांगितलं नाहीं तिनं."

चंद्रकांताच्या कपाळाला आठी पडली, व "बरं, उद्यां तरी सांग मला पत्ता," असं म्हणून तो तिच्यापासून दूर होऊन निघून गेला.

सुरंगा आपल्या मनाशीं वासंतीच्या वर्तनाचं आश्चर्य करीत राहिली. गेल्या तीन आठवड्यांच्या सहवासांत तिला वासंतीच्या स्वभावांतल्या ज्या एका विशिष्ट गोष्टीचं कधीं कधीं आश्चर्य वाटलं होतं, तिचीच आठवण तिला या वेळींहि झाली व ती स्वतःशींच म्हणाली, "हिचं असं कां ?"

# ३

"वासंती!–वासंती, जागी आहेस का?–असं काय पहातेस?–मी आहे तुझ्याजवळ...!"

वासंतीनं तिच्याकडे पाहिलं, डोळे क्षणभर मिटले, पुन्हा उघडले.

होय. सुरंगाच होती ती. तिचा हात तिच्या दडावर होता. तिनं तो हातीं घेतला व दाबला. तिच्या पायागतची खिडकी बंद होती; पण काचेच्या तावदानांतून आभाळांतल्या चांदण्या दिसत होत्या. सुरंगाच्या टेबलावरच्या मोठ्या घड्याळाचा टिक् टिक् आवाज स्पष्ट ऐकूं येत होता.

ती आपल्या खोलींत होती तर! मग ते शब्द, तो स्पर्श, आपली ती भीति–? स्वप्न असलं पाहिजे तें. पण किती स्पष्ट अनुभव होता तो!... तें स्वप्न? कीं हें स्वप्न....?

"केवढ्यादा ओरडलीस? स्वप्नांत भ्यालीस होय?" सुरंगा तिला विचारीत होती.

वासंतीनं उत्तर केलं नाही. तिनं फक्त आपल्या कपाळावरून हात फिरविला. सुरंगा म्हणाली, "घाम आला आहे बघ तुला." अन् मग तिनं चटकन् टॉवेल घेऊन तिचं कपाळ अन् गळ्याखालची जागा पुसली व विचारलं, "दिवा लावू?"

वासंतीनं नको म्हणून मान हलविली. सुरंगा तिच्याकडे निरखून पहात होती. माणूस स्वप्नांत असं मोठ्यांदा ओरडलेलं तिनं पूर्वी कधीं ऐकलं नव्हतं. ती स्वतः अगदी लहानपणीं एकदां स्वप्नांत ओरडली होती. तिच्या आईनं मग तिला कुशींत घेतलं होतं. स्वप्नात तिला भास झाला होता कीं पोहायला शिकायसाठी तिनं आपल्या मळ्यांतल्या विहिरीत उडी टाकली होती, अन् मग गटकळ्या खातांना तिने किंकाळी फोडली होती. ती आठवण तिला झाली. तिनं विचारलं,

"काय स्वप्न पडलं तुला?"

"वासंतीला स्वप्न अगदी स्पष्ट आठवत होतं. किंबहुना अजूनहि त्या अनुभवातून सुटून सत्यसृष्टींत येण्यासाठीं ती धडपडत होती. पण ती सुरंगाला म्हणाली,

"आठवत नाहीं....."

"पण तूं केवढ्यानं ओरडलीस !"

वासंतीनं मान हलवली. मग जरा वेळानं ती अंथरुणावरून उठली; खिडकीच्या कट्ट्यावर तांब्या होता त्यांतलं पाणी प्याली, अन् नावदान उघडीत सुरंगाला म्हणाली,

"ये; आपण जरा इथें उभ्या राहूं."

सुरंगा तिच्याजवळ गेली व तिच्या खांद्यावर हात टाकून उभी राहिली. वर आभाळांत तारकापुंज चमकत होते. मधेंच कांहीं मेघखंड तरंगत होते; त्यांनीं झाकलेल्या चांदण्या पुसट दिसत होत्या. शहरांतल्या रस्त्यांवरचेच तेवढे दिवे तुरळक ठिकाणीं घरांच्या छपरांआडून दिसत होते. गवळी-वाड्याच्या कोपऱ्यावर चार लोक जमून शेकोटीभोंवतीं बसले असावेत. त्या शेकोटीच्या प्रकाशांत छाया नाचल्यासारख्या वाटत होत्या. वाऱ्याच्या झोतांत गारठा होता, अन् त्याच्याबरोबर झाडाझुडपांचा, गवताचा, मातीचा ओलसर वास वाहत येत होता.

कॉलेजच्या पहारेकऱ्यानं दोहोंचे ठोके वाजविले तेव्हां सुरंगा म्हणाली. "चल, निजूं आतां; मला लवकर उठायचं आहे."

"खरंच, उद्यांपासून तू लाठीच्या क्लासला जाणार आहेस नाहीं का? विसरलेंच मी—!" असं म्हणून वासंतीनं खिडकी पुन्हा लावून घेतली.

"मी तुझ्याजवळ निजूं?" सुरंगान तिचा हात धरून विचारलं.

"कां? मी पुन्हा भिऊन ओरडेन म्हणून होय? वेडी!" वासंती किंचित् हसली.

"तूं भिशील म्हणून नव्हे. मलाच भीति वाटते. तू किती विचित्र किंकाळी फोडलीस तुला कल्पना नाहीं. कुणी तरी गळा दाबल्यासारखी. जणूं कुणाच्या तरी मगरमिठींतून सुटका करून घ्यायसाठीं. तुझा तो चमत्कारिक आवाज अजून कानांतनं जात नाहीं माझ्या. मला झोप यायची नाहीं."

मग वासंतीनं तिला जवळ घेतलं. तिला झोप लागली तेव्हां ती वासंतीच्या अगदी कुशींत शिरली होती. वासंतीला एकदम मालीची आठवण झाली. तिनं आपला हात सुरंगाच्या अंगावर टाकला व तिला

आणखी जवळ घेतल्यासारखं केलं. आतां तिच्या मंद श्वासाची उष्णता वासंतीच्या उरोभागाला कळत होती. सुरंगाचा इतका निकट स्पर्श तिला प्रथमच होत होता. पण तो तिला नकोसा वाटला नाहीं.

मग ज्या स्पर्शाच्या स्वप्नातल्या पुन:प्रत्ययानं देखील तिला भय वाटलं होतं त्या स्पर्शाविरुद्ध तिच्या मनानं येवढं बंड करावं, असं का? ....तो पुरुषाचा होता म्हणून ? ....

वासंती पुन्हा आपलं स्वप्न आठवूं लागली, व त्या धाग्यानं मागं सरकत सरकत तिचं मन गतवर्षी मुंबईस घडलेल्या गोष्टींचा विचार करूं लागलं.

पण लगेच तिनं निश्चयानं मनाला परतविलं. त्या आठवणी तिला बुजवायच्या होत्या. त्यासाठी तर ती पुण्याला आली होती;

पण केवळ स्थलांतर करून मनावरचा तो आघात पुसला जात नसेल, जागेपणीं अन् स्वप्नांत अशी अधून मधून त्याची आठवण होणार असेल तर तो बुजविण्यासाठीं आणखी काय करावं ? ....

कॉलेजच्या पहाऱ्यावर तीन ठोके पडले. सुरंगानं केवढा तरी श्वास सोडला. तिचाही जीव कशानं तरी भारावला होता. तिलाही दुःखं होती, अन् त्या दुःखांतून या गाढ निद्रेनं तिला तात्पुरती विश्रांति मिळत होती ? ....

आपण आणखी काय करावं ? ....

वासंती विचार करूं लागली, तो करतां करतांच तिला झोप लागली असावी.

साडे–पांच वाजता गजर झाला तेव्हां सुरंगा जागी झाली. आपण वासंतीच्या बाहुपाशांत आहोंत हें पाहतांच ती क्षणभर दचकली; पण लगेच तिला सारं नीट आठवलं. तिनं पाहिलं, तों वासंतीला शांत झोप लागली होती. ती हलकेच दूर झाली. तिनं घड्याळाचा गजर पुन्हा वाजूं नये म्हणून चाप दाबला व आवाज न करतां खोलीचं दार उघडून व परत लावून ती स्नानगृहाकडे गेली.

वासंती जागी झाली व तिनं डोळे उघडून पाहिलं तेव्हां अरुणोदयाचा फिकट तांबूस प्रकाश खोलींत येऊं लागला होता. सुरंगाच्या बांगड्या वाजलेल्या तिनं ऐकल्या. नेसणं संपवून खिडकींत ठेवलेल्या आरशापुढें उभं राहून ती केस विंचरीत होती. मध्येंच तिनं टेबलाकडे मान वळवून

घड्याळाचं तोंड फिरवून किती वाजले तें पाहिलं, अन् मग ती हातांतला कंगवा केसांवरून घाईनं फिरवू लागली.

तिच्याकडे पाहतां पाहता वासंतीला एकदम आठवण झाली. रात्री झोप लागण्यापूर्वी तिनं एक बेत मनाशी केला होता.

अंगावरचं रग दूर करीत ती म्हणाली,

" सुरंगा ! "

सुरंगाला तिचा शब्द ऐकून आश्चर्य वाटलं. तिनं मान मुरडून विचारलं, " म्हणजे ? तू जागी आहेस ? नीज कीं. मी जाऊन येतें क्लासला. मग आपण चहा घेऊं. नीज. "

" नको, मी उठतें. "

" इतक्यांत कशाला उठतेस ? सहा वाजायचे आहेत अजून. "

" तुझ्याबरोबर लाठीच्या वर्गाला यायचं ठरवलं आहे मीं. "

हातांतले केसांचे पेड गुंफायच्या ऐवजी तसेच धरून सुरंगानं आश्चर्यानं विचारलं, " म्हणजे ? कालपर्यंत मी दहादा तुला आग्रह केला, तर दर वेळी नकार दिलास. अन् आत्ता एकाएकी कशी लहर आली तुला ही ? "

या प्रश्नाचं खरं उत्तर कसं सांगणार वासंती तिला ? ती नुसती हसली व म्हणाली, " तू मला नेणार की नाहीं आपल्याबरोबर, सांग. "

" इश्श, असं काय विचारतेस ? तू आलीस तर मला किती आनंद होईल तुला कल्पना नाहीं, खरंच येणार ? "

वासंतीनं मान हलविली.

सुरंगा म्हणाली, " मग आटप तर लवकर. "

" पांच मिनिटांत. "

मग त्या दोघी तयार होऊन खोलीबाहेर पडल्या व लाठीवर्गाच्या जागेकडे गेल्या. पटांगणांत तीस--पस्तीस तरुण मुली जमल्या होत्या. त्यांना शिकविणाऱ्या बाईंचं नांव इंदुमतिबाई. या वर्षभर बडोद्यास राहून लाठींत तरबेज झाल्या होत्या. मुंबईच्या शारीरिक शिक्षण–परिषदेंत त्यांनीं पदक मिळविलं होतं. त्यांनीं सर्व मुलींची नांवं हजेरीपटांत दाखल केली, अन् मग त्यांना अंतराअंतरावर एका रांगेत उभं केलं.

कवायत सुरू झाली 'रामरामी पहिली!' इंदुमतिबाई सांगू लागल्या 'एक, दोन, तीन..' त्यांनीं लाठी फिरवून दाखविली. मुलींचे हात फिरूं लागले. मधेंच कुणाची लाठी मुठींतून निसटे व मुली स्वभावधर्मानुसार हसूं लागत. "हं! हसायचं नाहीं!"

अर्ध्या तासानंतर वर्ग सुटला. 'नमस्ते' म्हणून प्रत्येक मुलीनं निरोप घेतला पाहिजे अशी इंदुमतिबाईनीं शिस्त लावून दिली.

खोलीकडे परत जातांना सुरंगानं विचारलं, "आवडलं तुला?"

"फार." वासंती म्हणाली.

अंगांतून फुटलेला घाम दोघी टिपीत होत्या. सुर्याचीं किरणं समोरून अंगावर येत होतीं. मधूनच वाऱ्याची झुळूक येत होती. रस्त्यावर रहदारी सुरू होऊं लागली होती– "प्रभा ऽ ऽ त" 'लोकशक्ती ऽ ऽ' अशी ललकारी देत सायकलस्वार वर्तमानपत्रविक्या त्यांच्या अंगावरून गेला.

वासंती बरीच उल्हासांत होती. "परवां वॉशिंग्टनचं चरित्र चाळीत बसलें होतें लायब्ररींत. त्यांतल्या एका गोष्टीची आठवण होते."

सुरंगानं विचारलं, "कोणती?"

"त्याला एकदां कुणीस विचारलं, 'What do you consider the cleanest thing in the world?' (सगळ्यांत निर्मल उद्योग कोणता?) त्यानं उत्तर दिलं, "Physical exercise (व्यायाम!)..." त्याच्यापुढचं वाक्य तिनं सुरंगाला सांगितलं नाहीं. 'It helps you forget yourself (व्यायामांत साऱ्या गोष्टींचा मनाला विसर पडतो.) पण खरं म्हणजे तेंच वाक्य तिच्या मनांत अधिक घोळत होतं, अन् ती मनाशी म्हणत होती, असेच उद्योग लावून घेतले पाहिजेत; म्हणजे मला जें विसरायचं आहे तें विसरतां येईल. मनांतल्या मनांत कुढून, स्वतःला कोंडून घेऊन आठवणी बुजवतां यायच्या नाहींत. व्यायामानं शरीराचीं रंध्रं मोकळीं ताजींतवानीं होतात. आकुंचन पावलेल्या मनालाही व्यायाम झाला पाहिजे ... बस् पूर्वी कधीं केला नाहीं; इतका अभ्यास करायचा, वाचन करायचं, इतर विषयांतही लक्ष घालायचं.

त्या दिवशीं ती कॉलेजच्या 'रीडिंग रूम'मधें गेली. रोज नेमानं

वर्तमानपत्रं वाचायचं ठरविलं होतं तिनं. ती स्टँडजवळ गेली तों वृत्तपत्रांत मोठमोठ्या टाइपांतले मथळे तिला दिसले--

## गुजराथेंत भयंकर अतिवृष्टि !
## घरें व गुरेंढोरें वाहून गेलीं !

खालीं सविस्तर वर्णन दिलं होतं तें तर तिला वाचवेनाच.

नद्यांना महापूर लोटला होता. शहरांतल्या इमारती कोसळल्या होत्या. तारायंत्राच्या तारा उडाल्या होत्या. रेल्वेची वहातूक कठीण झाली होती. उभीं पिकं वाहून गेलीं होतीं. खेडींच्या खेडीं उध्वस्त झालीं होतीं. घरादारांवांचून, अन्नावांचून, कपड्यांवांचून हजारों लोक वाट फुटेल तिकडे पळत सुटले होते. ठिकठिकाणीं 'रिलीफ कमिट्या' स्थापन झाल्या होत्या, सरकारी अंमलदार व स्वयंसेवक गुराढोरांचा व माणसांचा बचाव करण्याची पराकाष्ठा करीत होते. पण निसर्गाच्या रुद्रावतारानं उडविलेला हाहा:कार आटोक्यांत आणायला मनुष्याची शक्ति कशी पुरी पडणार ?....

तो मजकूर वाचून वासंतीचं मन क्षणभर अगदीं खिन्न झालं. अतिवृष्टींत सापडलेले ते हजारों खेडुत गारठ्यानं कुडकुडत असतील, भुकेनं व्याकुळ झाले असतील, गुरंढोरं मेलीं म्हणून आक्रोश करीत असतील ! तिनं स्वत: गरम स्वेटर घातला होता तरी गार झुळुक आली कीं ती शहारे देऊन पदर अंगाभोंवतीं घट्ट ओढीत होती. दुपारीं तिनं सुग्रास भोजन केलं होतं, आतां खोलींत गेल्यावर ती गरम चहा घेणार होती. वर्तमानपत्रावर टेकलेल्या तिच्या डाव्या हातांत सोन्याच्या बांगड्या होत्या, घड्याळ होतं. तिनं मान वर करून आजूबाजूला पाहिलं. सारं व्यवस्थित होतं. गुजराथेंत माणसं सैरावैरा धावत होतीं. पण इथें उल्हास होता, आनंद होता, माणसांचे व्यवहार हसत हसत चालले होते. वासंती गंभीर झाली. तिला वाटलं, काय विचित्र ही जीविताची तऱ्हा ! ...

तिनं इतर वृत्तपत्रं चाळलीं तों सगळ्यांतच ती अतिवृष्टीची कहाणी होती. एका स्थानिक पत्रांत त्यावर अग्रलेख होता, व शेजारच्या कॉलमांत कॉंग्रेस कमिटीची जाहिरात होती---

## स्वयंसेवक व स्वयंसेविका पाहिजेत !

"गुजराथच्या जनतेला साहाय्य करण्यासाठीं फंड जमविण्याचें कॉंग्रेस कमिटीनें ठरविलें आहे. पैसे धान्य, कपडेलत्ते.."

वासंतीनं जाहिरातीखालचा पत्ता आपल्या वहींत टिपून घेतला, व ती तेथून निघाली.

ती पायऱ्या उतरत होती तोंच समोरून एक विद्यार्थी आला. कसलीं तरी छोटीं हस्तपत्रकं वाटत होता तो. एक पत्रक त्यानं तिच्या हातीं दिलं, त्यानं अगदीं ऐटबाज उंची सूट केला होता. त्याच्या तोंडांत पानपट्टी होती ती चघळीत तो म्हणाला,

" Please vote for.. " ( कृपा करून तुमचं मत... )

वासंतीनं पुढचे शद्ब ऐकूनच घेतले नाहींत, त्या मुलाच्या किमती पोषाकाचा तिला राग आला होता. त्याच्या तोंडांतल्या पानाचे ओघळ त्याच्या जिवणीच्या दोन्ही बाजूंनीं आलेले पाहून तर ती चिडली होती. त्याच्याकडे रागाचा कटाक्ष टाकून ती पुढें झाली.

मात्र लगेच तिच्या मनांत आलं, तो विद्यार्थी पान खात होता यांत त्याचा काय दोष ? माणसाचं मन कसं विचित्र पाहा. स्वतःबरोबर साऱ्या जगानं गंभीर अन् विचारप्रवण व्हावं असं माणसाला वाटतं, अन् तसं दिसलं नाहीं कीं तें त्याला खपत नाहीं. त्या मुलाला आपण उगीच दुखवलं; पण तिनं मागं वळून पाहिलं तर तो दुखवलेला दिसण्याऐवजीं हसत एका मित्राच्या पाठीवर थाप मारीत होता. तें पाहतांच तिच्या मनांत उठू पाहणारी पश्चातापाची लहर नाहींशी झाली. हातांत आलेलं पत्रक तिनं वाऱ्यावर सोडून दिलं.

ती थोडी पुढं गेली तों वद्रकात दोन--चार विद्यार्थ्यांशीं बोलत असलेला तिला दिसला. तिला पाहतांच त्यांच्यापासून दूर होऊन त्यानं तिच्या दिशेनं पावलं टाकलीं. तो काहींसं बोलणार होता; पण त्याच्या आधींच वासंतीनं विचारलं,

"सुरंगा दिसली कुठें ? खोलीकडे गेली ती ?"

वर्तमानपत्रांत वाचलेली गुजराथेंतल्या अतिवृष्टीची हकीगत सुरंगाला सांगण्यासाठीं ती उत्सुक झाली होती.

" मी पाहिलं नाहीं तिला कुठें." असं म्हणून चंद्रकांतानं एक पत्रक तिच्यापुढें केलं. तोहि पत्रकं वाटीत होता.

"कसली आहे ही धामधूम ? जिमखान्याच्या निवडणुकी तर होऊन गेल्या. मग आतां या--"

"गॅदरिंगच्या निवडणुकी. मी ड्रामा डिपार्टमेंटसाठीं उभा राहिलों आहे. सुरंगा मला मत देणार आहे. अन् माझ्यासाठीं खटपटही करणार आहे. तुमचं मत मिळालं पाहिजे मला."

वासंती हसली

"कां ?" चंद्रकांतानं विचारलं, "देणार ना मत ? द्यायलाच पाहिजे हं."

"माझं मत फार निराळं आहे--" अर्धवट हास्य करीत वासंती म्हणाली.

"म्हणजे काय ? "

"सांगतें. तिकडे व्हरांड्यांत येतां ?"

ती पुढें झाली. तिच्या मागून चालतां चालतां चंद्रकांत मनांतल्या मनांत आश्चर्य करूं लागला, आज माझ्याशीं बोलायची ही कशी लहर आली आहे हिला ? आजपर्यंत तिचा परिचय वाढविण्यासाठीं तिच्याशीं बोलण्याचा त्यानं जेव्हां जेव्हां प्रयत्न केला होता तेव्हां तेव्हां ती मोठ्या जुलमानें बोलल्याप्रमाणें दोनचार शद्व बोलून दूर झटकली होती. त्या वर्षीं कॉलेजांत आलेल्या विद्यार्थिनींत ती सर्वांत अधिक देखणी होती त्यामुळें मुलांनीं तिला त्या वर्षाची Queen–राणी–ठरविली होती. पण ती कुणाला सलगी करूं देत नाहीं असा पुष्कळ विद्यार्थ्यांना अनुभव आला होता, मग ते आपापसांत " Haughty Queen " अवकडबाज राणी– असा तिचा उल्लेख करूं लागले होते. चंद्रकांत मनाशीं म्हणाला, " आज राणीसरकार आपण होऊन आमच्याशीं बोलणार, हें आहे काय ? तिची व आपली ही मुलाखत पाह्यला प्रेक्षक आहेत कीं नाहींत याचा अदमास घेण्यासाठीं त्यानं इकडे तिकडे दृष्टि टाकली.

होतं ' हाउस फुल्ल ' होतं !

तो मोठ्या खुशींत पायऱ्या चढून गेला. वासंती खांबाला टेकून उभी राहिली. त्यानं विचारलं, " काय ? "

" वासंतीनं त्याच्याकडे रोखून पहात किंचित् हास्य केलं. त्याला तिच्या त्या नजरेचा अर्थ कळेना.

" सांगा ना ?" तो म्हणाला.

" माझं म्हणणं ऐकाल ? अर्थात् तुम्हांला पटलं तर "

चंद्रकांतानं मान हलविली.

" वार्षिक संमेलन मुळींच करूं नये असं माझं मत आहे."

चंद्रकांताला आश्चर्य वाटलं. " तें कां ?"

" या संमेलनांत खर्च होणाऱ्या पैशाची आज दुसऱ्याच एका सत्कार्यासाठीं फार गरज आहे. आजच्या वर्तमानपत्रांतल्या बातम्या वाचल्यात तुम्हीं?"

" नाहीं. "

गुजराथेंतल्या अतिवृष्टीच्या कहराची हकिगत तिनं थोडक्यांत सांगितली. ती ऐकून तो उद्‌गारला, अरेरे–! "

" नुसतं अरेरे म्हणून आपलं कर्तव्य संपत नाहीं. तिकडे गुजराथेंत हजारों लोक अन्नवस्त्रावांचून भुके–उघडे मरत असतांना आपण संमेलनाचा सोहळा करायचा का ? आपण प्रिन्सिपलना सांगूं–आम्हांला यन्दां गॅदरिंग नको. आपण फण्ड गोळा करूं अन् तो कॉंग्रेस कमिटीच्या हवालीं करूं. तुम्हीं या बाबतींत पुढाकार घेतला पाहिजे.."

तिला इतक्या आवेगानं बोलतांना चंद्रकांतानं कधीं पाहिलं नव्हतं. तिची दृष्टी तळपत होती. मुद्रेवर आवेश दिसत होता. तो तिच्याकडे पाहत राहिला.

" काय ? माझं बोलणं पटतं का तुम्हांला ?" ती विचारीत होती.

" पटतं तर ! "

" मग काय करणार ? तीं हस्तपत्रकं वाटीत बसणार कीं--"

" छी ! " असं म्हणून चन्द्रकांतानं हातांतलीं हस्तपत्रकं भिरकावून दिलीं, तीं वाऱ्यावर उडून फडफडलीं व कांही जवळ रस्त्यावरच्या वाळूत, कांहीं दूर बागेंतल्या कुंड्याकुंड्यांवर अन् हिरवळीवर पडलीं. त्यांकडे पाहून त्यानं हसत म्हटलं, झालं ?"

ती अगदीं मनःपूर्वक हसली व म्हणाली, "थॅंक यू. आतां प्रिन्सिपलना सादर करायचा अर्ज तयार केला पाहिजे किती सह्या मिळवाल त्याच्यावर ? "

" किती पाहिजेत ?"

जणूं मनांत आणील तितक्या सह्या तो सहज मिळवूं शकत होता, असा आविर्भाव त्याच्या त्या प्रश्नांत होता वासंतीला हसूं आलं. तें पाहून तो लगेच म्हणाला,

" तुम्ही हसतां कां ? कॉलेजांतल्या एकूण एक विद्यार्थ्यांच्या सह्या आपण मिळवूं शकूं. बघा, मात्र तुम्हीं माझ्या जोडीनं हिंडलं पाहिजे. विद्यार्थ्यांत तुम्ही किती 'पॉप्युलर' आहांत तें–"

" मी 'पॉप्युलर' ?" वासंतीला खरोखरच फार आश्चर्य वाटून तिनें उद्‌गार काढला, " शी! कांहीं तरीच. मीं काय केलंय 'पॉप्युलर' होण्याजोगें. तुम्ही अन् सुरंगा यापलीकडे कुणाशीं धड ओळखसुद्धां नाहीं माझी."

" माझी तरी हवी आहे कुठें तुम्हांला ?" तो चटकन् बोलून गेला.

वासंती गोंधळली अन् गप्प राहिली.

तिचा गोंधळ संपविण्याच्या हेतूनें तो म्हणाला,

" तें जाऊं दे. That's not the point. तुम्ही कुणाशीं मिसळलां नसलांत तरी तुम्ही सर्वांच्या आवडत्या व्हायला अवकाश नाहीं येवढंच सुचवायचं होतं मला. हं, मग अर्ज केव्हां तयार करायचा बोला."

" आत्तां."

" लायब्ररींत जाऊन बसूं या–?"

" हं."

मग अर्ज तयार झाला, अन् त्यावर सह्या घेण्याची मोहीमही दुसऱ्या दिवशीं जोरांत सुरू झाली. कॉलेजांतल्या मुलांमुलींच्या तोंडीं दुसरा विषय उरला नाहीं. दोन दिवसांत नऊशें सह्या झाल्या. अर्ज प्रिन्सिपलना सादर करण्यांत आला.

गॅदरिंग रद्द झाल्याची नोटिस बोर्डावर लागली. वासंतीच्या विनंतीवरून प्रिन्सिपलनीं विद्यार्थ्यांची जाहीर सभा घेऊन गुजराथ फंडाला साहाय्य करण्याबद्दल कळकळीचें भाषण केलें. सभेंत विद्यार्थि विद्यार्थिनीही बोलल्या. सगळयांत वासंतीचं भाषण उत्तम झालं. आपल्या अंगीं वक्तृत्वाचा गुण असेल अशी तिला कल्पनाही नव्हती. ती बोलायला उभी राहिली तेव्हां तिचे पाय लटपटत होते; पण बोलूं लागल्यावर तिला धीर आला व तिनं भाषण संपवितांच टाळयांचा कडकडाट झाला. कॉलेजांतल्या जीवनाचं विराट् स्वरूप प्रगट झालेलं ती पहात होती तिच्या मनांत आलं, कॉलेजांतल्या मुलां–मुलींत कांहीं अर्थ उरला नाहीं असं म्हणणाऱ्या निंदकांनीं तो देखावा आपल्या डोळयांनीं पाहायला हवा होता. कॉलेजतर्फे दोन दिवसांत दीड हजार रुपये जमा झाले. काँग्रेस कमिटीच्या चिटणिसांनीं कॉलेजचे जाहीर आभार मानले ते चार– पांच दिवस कसे गेले वासंतीला कळलंही नाहीं. तहानभूक, झोप सारं विसरून ती सारखी खपली होती. सुरंगानं तिला पुष्कळ मदत केली होती. इतरही पांचपंचवीस मुलांमुलींचं साहाय्य

तिला झालं होतं. पण चंद्रकांतानं सर्वांत अधिक अविश्रांत मेहनत केली होती.

रविवारीं सकाळीं वासंती सुरंगाला म्हणाली,

" माझं एक काम करशील का ?"

" आज्ञा व्हावी राणीसरकार !"

" हें काय नवीन काढलं आहेस ?"

"सारे विद्यार्थि तुला College Queen म्हणतात, तुला माहिती नाहीं."

"चावटपणा करूं नकोस." वासंती डोळे वटारून म्हणाली.

" चावटपणा काय झाला यांत ? तुझ्या सौंदर्यावर सारीं पोरं बेहद्द खूष आहेत. चंद्रकांत काल मला काय म्हणाला सांगूं का ?

" काय ?"

"गॅदरिंग रद्द करून गुजराथ फंडाला दीड हजार रुपये जमवितां आले याचं खरं श्रेय वासंतीच्या रूपाला आहे. ती इतकी सुंदर नसती तर--"

"गप्प बैस." वासंती एकदम म्हणाली.

कॉलेजच्या मुलांमध्यें सत्कार्याचा उत्साह उत्पन्न करूं शकलों अशा कल्पनेच्या आनंदांत ती गेले पांच दिवस होती. विद्यार्थ्यांच्या त्या उत्साहाचा आपल्या सौंदर्याशीं कांहीं संबंध असेल, असं तिच्या मनांत कधीं आलं नव्हतं. अजूनही तसं मानणं तिला शक्य नव्हतं. त्या योगें त्या उत्साहाचं स्वरूप एकदम हिणकस ठरेल असं तिला वाटलं. आपल्या सौंदर्याचा असा उल्लेख व्हावा हें तिला अगदीं रुचलं नाहीं. अन् तो उल्लेख चंद्रकांतानं करावा हें तर--

"खरंच तो असं बोलला तुझ्याजवळ ?" तिनं सुरंगाला रुष्टतेच्या स्वरानं विचारलं.

तिनं नाहीं म्हणावं अशी तिची तीव्र इच्छा होती. चंद्रकांताशीं तिचा परिचय वाढला होता. त्याच्याबरोबर ती हिंडली होती. तो सात्त्विक अंतःकरणाचा, सुवृत्त मुलगा आहे असं तिला आढळून आलं होतं. पुरुषाच्या मनोवृत्तीबद्दल जो प्रतिकूल ग्रह व भय घेऊन ती मुंबईहून निघून आली होती त्याची सत्यासत्यता नीट तपासली पाहिजे, असा विचार तिच्या डोक्यांत घोळूं लागला होता. मनांत अढी न ठेवतां चंद्रकांताशीं वागून

ताह्यचं ती ठरवीत होती. काँग्रेसतर्फे गांवांत हिंडून फंड जमविण्याचा तिचा बेत कळल्यावर त्यानं विचारलं होतं, " मी तुमच्याबरोबर आलों तर आवडेल तुम्हांला ?" अन् तिनं त्याला संमति दिली होती. उद्यां सकाळीं तो व ती मिळून हिंडणार होतीं फंड कमिटीनं नेमून दिलेल्या विभागांत..

पण या साऱ्या उल्हासाला आता एकदम धक्का बसत आहेस वासंतीला वाटलं. इतर लोकांचं असो, पण चंद्रकांत जर आपल्याकडे अशा विकृत दृष्टीनं पाहत असेल.. मुंबईत जें घडलं तेंच पुन्हा.. या पुरुषांना दुसऱ्या कांहीं दृष्टीनं स्त्रियांकडे पाहतांच येत नाहीं का ?..

तिनं सुरंगाकडे पाहून पुन्हा विचारलं. " खरंच तो असं बोलला ? नाहीं म्हण."

सुरंगा हलकेच म्हणाली " नाही." पण तें खोटं होतं हें वासंतीला सहज कळण्यासारखं होतं.

गेले पांच दिवस वाढत गेलेली तिची उल्हासित वृत्ति एकदम मावळली. दिवसभर ती अस्वस्थ होती.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं लाठीचा क्लास आटपून ती आली ती खोलींत दहा-पांच मिनिटंच थांबली. पावती पुस्तकं अन् छत्री घेऊन ती लगेच बाहेर पडली. कॉलेजच्या पोर्चपाशीं चंद्रकांत तिची वाट पहात उभा राहणार होता. पण ती दुसऱ्याच वाटेनं गेली. चंद्रकांताची संगत पुरे झाली. ती झपाझप शहराच्या दक्षिण टोकाकडे निघाली. जो भाग तिला नेमून दिला होता तिकडे जाणारा रस्ता तिला माहीत नव्हता. एकदोनदां तिच्या मनांत आलं, चंद्रकांत असता कीं पंचाइत नव्हती. त्याला पुण्यांतले सारे रस्ते तोंडपाठ होते. पण नसेना का तो ! नकोच. त्याला माझा सहवास हवा तो माझ्या सौंदर्यासाठीं. मी कुरूप असतें तर तो आला असता का माझ्याबरोबर ? कॉलेजची राणी काय मी ? या पुरुषांना......

हे विचार तिच्या मनांतून जाईनात.

तिनं रस्ता विचारला तेव्हां एक वयस्क गृहस्थ विशेष तत्परता दाखवून तिच्याबरोबर दोन रस्ते ओलांडून आला तें सुद्धां तिला बरं वाटलं नाहीं त्याचे आभार मानले नाहींत तिनं.

ज्या भागांत ती फंड जमविणार होती तिथली वस्ती चमत्कारिक होती. पांढरपेशे लोक त्या भागात मुळींच नव्हते. छोटी सावकारी करणारे बनिये,

दुकानदार, गवळी, तांबट, गवंडी असे लोक भरले होते तिथल्या पडीक-झडीक घरांतून. एका गल्लीत तीन चार टोलेजंग हवेल्या दिसल्या. त्या विडी-कारखानदारांच्या होत्या. विडीच्या धंद्यावर ते लक्षाधीश झाले होते. त्यांच्या त्या हवेल्यांभोंवतीं कमालीची भिकार वस्ती पसरली होती. मल-मूत्राचे ओघळ अन् पाऊस-पाण्याची डबकीं जागोजाग दिसत होतीं. त्या ठिकाणी बिळांसारख्या दिसणाऱ्या घरापुढें मुलं उघडीं नागडीं हिंडत होतीं. दोन कोंबडीं माना झटकून किडेमुंग्या टिपीत पावलं टाकीत होतीं. गलिच्छ ओघळांत उरलेल्या कोरड्या जागेवरच्या धुळीत एक नुकतीच व्यालेली कुत्री आडवी पडली होती. तिचीं पिलं तिच्या पोटाचे लचके तोडीत होती, अन् तिच्या अंगावर माशा घोंघावत होत्या ! ......

तें दृश्य पाहतांच वासंती विलक्षण गंभीर झाली !

इथें कुणाजवळ मागणार ती पैसे ? हे लोकच अशा दुष्काळांत राहत होते कीं, यांच्यासाठीच फंड जमवायला हवा होता ! अतिवृष्टींत सापड-लेल्या गुजराथेंतल्या लोकांहून यांची स्थिति काय कमी अनुकंपनीय होती ? दारिद्र्याच्या कर्दमांत अन् अज्ञानाच्या गडद अंधकारांत राहणाऱ्या या माणसांची अवस्था काय कमी केविलवाणी होती ? अन् अशीच हिंदुस्थानची बहुतेक प्रजा नव्हती काय ? हें अज्ञान, हें दारिद्र्य, ही भयंकर विषमता-देशभर पसरलेली लाजिरवाणी विषमता- केवळ एके ठिकाणीं ठिगळ लावायसाठी फंड जमवून दूर होणार होती काय ?... केवळ इंग्रज राज्यकर्ते जाऊन त्यांच्या जागी आपले लोक आल्यानं हें दुःख सरणार होतं काय ?....

हे विचार वासंतीच्या मनात फार आवेगानें आले. अन् तिचं पाऊल अगदी जड झालं.

पण तिनं आपलं चित्त सावरलं. आल्यासारखं फंडाचं काम करणं भागच होतं तिला. ती एका हवेलींत शिरली. मालकांच्या अंगांत तलम रेशमी शर्ट होता, हातांत सोन्याची लठ्ठ पोची होती. पण त्यांना गुजराथ प्रांत कुठें आहे तें कळेना. त्यांनीं एक रुपया दिला अन् वासंतीला वाटेला लावलं. दोन तास हिंडल्यावर वासंतीच्या हातीं नऊ रुपये नवाचार आणे आले. एका बनियानं तिच्या अंगावर एक पैसा टाकून म्हटलं होतं, " आतां शिकलेल्या बायका भीक मागायला लागल्या. कसला आला आहे महापूर ! साऱ्या थापा. मला ठाऊक आहे ! "

ती परत आली अन् खोलींतल्या कॉटवर पडून राहिली. दोन तास तिनं चुकविले. तिसऱ्या तासाला ती कॉलेजांत गेली.

चंद्रकांत तिची वाट पाहत असावा. ती दिसतांच तिच्याजवळ जाऊन तो म्हणाला,

"सकाळीं मी अगदीं वेळेवर आलों होतों पोर्चमध्यें; किती वाट पाहिली–"

"I am sorry (माफ करा)" असें म्हणून ती वर्गाकडे गेली.

तिनं त्याच्याकडे धड पाहिलं देखील नाहीं !

---

# ४

फंड जमविण्यासाठीं पुण्याच्या त्या दरिद्री गलिच्छ विभागांत तीन दिवस हिंडल्यामुळें, वासंतीच्या मनांत जो विचारक्षोभ उत्पन्न झाला तो लवकर नाहींसा होईना. तिच्या मनांत सारखं येऊं लागलं, असं हें दारिद्र्य कशामुळें उत्पन्न होतं ? याला जबाबदार कोण ? केवळ पारतंत्र्यामुळें लोक दरिद्री होतात म्हणावं, तर युरप अमेरिकेंतल्या स्वतंत्र राष्ट्रांतहि ज्यांना अन्नवस्त्र मिळत नाहीं असे लक्षावधि लोक आहेत म्हणतात ? म्हणजे उद्यां हिंदुस्थान स्वतंत्र राष्ट्र झालं तरी गरिबांची गरिबी, अन् त्यांचं अज्ञान व दैन्य संपणार नाहीं म्हणायचं ! मग दारिद्र्याच्या या रोगावर उपाय तरी कोणता ? जगांत आळशी व्यसनी श्रीमंत, अन् गांजलेले बुभुक्षित दरिद्री, असे दोन वर्ग नेहमीं असणारच काय ?–

'असणारच' असं कबूल करायला तिचं मन तयार नव्हतं; ते नाहींसे कसे होतील याची तिला कल्पना करतां येत नव्हती; त्या विचित्र कूटप्रश्नाचा चाळा सोडून द्यायचीही तिच्या मनाची तयारी होईना. जगांत दारिद्र्य आहे ही गोष्ट तिच्या निदर्शनाला प्रथमच येत होती असं कसं म्हणतां येईल ? तिनं आजपर्यंत हजारदां भिकारी पाहिले होते. मोलमजुरी करून लाज कशीबशी राखणाऱ्या स्त्रिया, अन् कष्टाच्या घामानं निथळणारे पुरुष तिच्या दृष्टीला किती तरी वेळां पडले होते. निंबोणी गांवचे शेतकरी तिला माहीत होते. बापूंकडे येऊन वाड्याच्या पुढच्या चौकांतल्या देवडीवर ते बसत. त्यांच्या

कमरेला चार विती कापड अन् अंगावर अर्धीमुर्धी पैरण असे. कधीं कधीं ते आपलीं कच्चीं-बच्चीं बरोबर आणीत. त्यांच्या अंगावर मळकट कपडे अन् चिखलमाती असे. त्यांचीं खोपटं तिनं पाहिलीं होतीं. तिथलं गवतशेण, तिथलीं गुरंढोरं, तिथल्या कोंबड्या, तिथलं खरकटं, तिथलीं खापराचीं भांडीं अशा सरंजामानें सजलेले संसार तिला शेंकडों वेळां दिसले होते. पण ते पाहून तिच्या मनाला असा जबरदस्त धक्का बसला नव्हता. शेतांतल्या त्या दारिद्र्यावर निसर्गाच्या शोभेचं अन् दैन्यांतही तगून राहिलेल्या राकट आरोग्याचं आवरण असे, म्हणून त्याच्या दर्शनानं तिचं अंतःकरण कळवळून द्रवलं नव्हतं, असं कदाचित् असेल. किंवा तिचं मन पूर्वींइतकं विचारोन्मुख नव्हतं हेंही कदाचित् कारण असेल. किंवा आतांपर्यंत तिच्या सुप्त मनावर होत गेलेले संस्कार साचून राहिले होते, व विचारप्रवाहाच्या पृष्ठभागावर प्रगट होण्याच्या संधीची वाट पाहत होते असंही असेल. येवढं खरं, की फंड गोळा करतांना जीं दृश्यं तिनं पाहिलीं व जे अनुभव तिला आले त्यामुळं तिच्या चित्ताचा क्षोभ झाला, व ती भोंवतालच्या परिस्थितीचा जोरानं विचार करूं लागली.

तिला वाटलं, समाजसत्तावादावरचीं पुस्तकं आपण वाचलीं तर आपल्या मनांतल्या शंका फिटतील, व जें बौद्धिक समाधान आपल्याला हवं आहे तें मिळेल. आर्थिक विषमता नाहीशी करून नव्या तत्त्वांवर समाजाची रचना करण्याच्या ध्येयानंच समाजसत्तावादी प्रवृत्त झाले होते ना ?

पण पुस्तकं वाचायचीं म्हणजे कोणती ? कोणतं प्रथम वाचावं, नंतर कोणतं वाचावं ?

तिनं लायब्ररीतल्या पुस्तकांचा कॅटलॉग चाळला. केवळ नांवावरून ठरवायचं म्हटलं, तर पन्नास-साठ पुस्तकं तिच्या उत्सुक मनाला मोह पाडूं लागलीं. यांतली निवड कशी करायची ?

मग तिनं ठरवलं प्रिन्सिपलना विचारावं. नाहीं तरी दर रविवारीं 'माझं बरं चाललं आहे' असा रिपोर्ट त्यांना द्यायचा असं ठरलेलं असून ती पंधरा-वीस दिवसांत त्यांना भेटली नव्हती. या अपराधाबद्दल ते कदाचित् आपल्यावर रागावतील अशी भीति तिच्या मनांत क्षणभर आली. पण जाणं आणखी चुकवून त्यांच्या रागाला अधिक सवड देण्यापेक्षां आजच काय

बोलतील तें सहन करावं असा विचार तिनं केला व ती त्यांच्या बंगल्यावर गेली.

दरवाज्यालगतच्या खोलींत ते तिला दिसले. शिंपी आला होता त्यानं आणलेल्या कापडांतून ते आपल्या कोटासाठीं कापड पसंत करीत होते. तिला पाहतांच ते म्हणाले, " या, कुठें नाहींशा झालां होतां इतके दिवस ?" अन् मग ती जरी भिंतीशी उभी राहिली, तरी तिला 'बसा' म्हणण्याच्या भानगडींत न पडतां ते शिंप्याशीं बोलू लागले.

' हां समजलां ? हें कापड फाडा. "

" पण तें दुसरं गरम कापड बघा तरी. एकदां वापरा आपण..."

" अरे थंडी असते कुठें पुण्यात ? कॉलेजांतलीं पोरं मारे गोधडीसारखे गरम घट्ट सूट घालून कशी वावरतात मला कळतच नाहीं !" प्रिन्सिपलनीं वासंतीकडे पाहिलं

आपण थोडं हसलं पाहिजे हें ओळखण्याइतकी ती हुशार, खचित होती.

" पण आज वीस वर्षं हें एक ठराविक निळं कापड फाडतों आहे मी आपल्या कोटासाठीं. हें करड्या रंगाचं कोटिंग तरी घ्या. तें गरम राहिलं."

" नको. तें निळंच फाडा."

शिंप्यानं हताश चेहरा करून गज उचलला पण मग तो खालीं ठेवून त्यानं प्रिन्सिपलसाहेबांच्या अंगाचीं मापं घेतलीं, ती खडून कापडावरच मांडलीं व विचारलं,

" एक कोट कीं दोन ?"

" दोन."

" दोन्ही एकाच कापडाचे ?"

" हो."

शिंप्यानं त्यांच्याकडे पाहिलंही नाहीं. त्यानं भराभर गज घातले, कापड फाडलं, अन् त्याची घडी करीत म्हटलं,

" पुढच्या रविवारीं दिले कोट तर चालतील ?"

" वा ! एक तरी बुधवारीं द्या. बंगलोरला परिषदेला जायचं आहे."

असला कोट घालून जायचं तुमच्यासारख्या बड्या माणसानं परिषदेला, अशा अभिप्रायानं त्या म्हाताऱ्या शिंप्यानं त्यांच्याकडे पाहिलं व मग म्हटलं, "——देईन."

तो आपल्या कापडाचा गठ्ठा उचलून गेल्यावर प्रिन्सिपल वासंतीला म्हणाले, "हं, कसल्या कामांत होतां आपण इतके दिवस! मला वाटलं, निर्वाणीस गेलां. बसा ना."

ते बसले तेव्हां ती बसली, "नाहीं, इथेंच होतें."

"मग आलां नाहींत? अन् बापू म्हणतो, माझ्या मुलीवर देखरेख ठेवा. मी लिहितों आता त्याला तुम्ही महिन्या-महिन्यांत मला तोंड दाखवीत नाहीं म्हणून, अं?"

"संकोच वाटतो. आपला वेळ घ्यायचा म्हणजे--"

"असं होय?" ते हसले. त्यांच्या हसण्याची तऱ्हा विचित्र होती. हुं ऽ असा झटकेदार ध्वनि त्यांच्या तोंडून फुटे अन् मग पुन्हा त्यांच्या चेहऱ्यावरचं गांभीर्य परत येई. "मग माझा वेळ घ्यायची तुम्हाला जी भीति वाटते ती आपण पुरती घालवून टाकू. तुम्ही आज आमच्याकडे जेवा."

वासंती इतकी चकित झाली, की 'नको, नको' असे शब्द तिच्या ओठांपर्यंत येऊनही ते बाहेर पडले नाहींत. विस्मयाचा अभिप्राय तिच्या डोळ्यांत काय व्यक्त झाला असेल तेवढाच. मात्र तो प्रिन्सिपलनी अ ळखला, व ते म्हणाले,

"त्याला काय झालं? मी तुमचा प्रिन्सिपल आहे तसाच बापूचा मित्र आहे. आतां जेवूनच जा. ठरलं. अहो!....हें पाहा!...."

आतून आवाज आला, "हं...."

"यांना जेवायला राहून घेतों आहे मी...."

आवाज जवळ आला "होय का?..." नंतर दारांत प्रिन्सिपलच्या पत्नी दिसल्या. वासंती त्यांच्याकडे पाहून हसली. तिची ओळख पूर्वींच झालेली होती. त्याही उलट हसल्या व म्हणाल्या "पण जेवण साधं आहे हो!"

त्या भरपूर उंच अन् खूप स्थूल होत्या. आणि अगदीं पिठासारख्या गोऱ्यापान! त्या नुकत्याच न्हाल्या होत्या त्यामुळें त्यांचा चेहरा लाल-लाल दिसत होता. प्रिन्सिपलना शोभतील अशा भव्य दिसत त्या. त्यांच्या अपत्य-शून्यतेला उद्देशून एकदां गणिताच्या एका वात्रट विद्यार्थ्यानं "Zero added to zero equal to " अशी कोटि केली होती. ती आतां सगळ्या कॉलिजांत झाली होती. त्या कोटीची आतां वासंतीला आठवण

झाली; अन् कसं कोणास ठाऊक, तिच्या मनांत आलं आमच्या या प्रिन्सि-पलसाहेबांचा निकट स्पर्श त्यांच्या या पत्नींना...

आपल्याला पुरुषाचा दृढ स्पर्श तिरस्करणीय वाटला तसाच यांनाही...?

असले विलक्षण विचार मनांत यावेत याचं वासंतीला आश्चर्य वाटलं. ती कांहींशी शरमली देखील.

" चला, आंतल्या खोलींत बसूं " असं म्हणून प्रिन्सिपल उठले तेव्हां तीही उठली; पण त्यांच्याविषयीं भलते विचार करून मनानं का होईना, पण आपण त्यांचा एक प्रकारें उपमर्द केला या जाणीवेमुळें ती त्यांच्या मागोमाग गेली ती एकाद्या अपराध्याप्रमाणें जड पावलं टाकीत.

आंतल्या खोलींत पाऊल टाकल्याबरोबर वासंतीला एकदम बरं वाटलं तिथें चहूं बाजूस ग्रंथ होते. सत्पुरुषाच्या केवळ सान्निध्यानं मनाची अप्रसन्नता दूर व्हावी, तद्वत् ग्रंथ दिसतांच माणसाला बरं वाटतं. ते ग्रंथ जणं म्हणत असतात, तुझ्या शंका आम्हांला विचार; आजपर्यंत जीं मोठीं माणसं होऊन गेलीं त्यांचा शहाणपणा आमच्या अंतरंगांत तुला सांपडेल; अन् आमचं अंतरंग गुप्त नाहीं, खुलं आहे, कुणीही तें उघडावं !

खुर्चीवर बसण्याऐवजीं उजव्या हाताच्या शेल्फपुढें उभी राहून त्याव-रच्या पुस्तकांची नांवं वाचीत वासंती उभी राहिली. एच्. जी. वेल्स, लास्की, हॉब्सन, शॉ, मॅक्डोनाल्ड...किती मोठमोठे ग्रंथकार तत्परतेनं उभे होते तिच्या हाकेला ओ देण्यासाठीं...

" कोणतं पुस्तक हवं आहे तुम्हांला ? " तिच्या पाठीमागून प्रिन्सिपलनीं विचारलं.

तिनं तोंड वळविलं व म्हटलं, " कोणतं तें मला कळत नाहीं. आपल्याला विचारायचं मी ठरवलं आहे. खरं म्हणजे आत्तां आपली गांठ घेण्यांत माझा मुख्य उद्देश तोच होता. कोणतीं पुस्तकं वाचूं मी ? "

" पण कोणत्या विषयावरचीं वाचायचीं आहेत तुम्हांला ? अन् कोणत्या उद्देशानं ? "

ती क्षणभर उत्तरावांचून थांबली तेव्हां त्यांनींच पुन्हा विचारलं, "अं?"

" मला वाटतं माझी थोडी हकीगत आपल्याला सांगितली पाहिजे." असं म्हणून वासन्तीनं आपण फंड जमविण्यासाठीं कोठल्या भागांत गेलों त्याच्या वर्णनापासून प्रारंभ करून, आपल्या मनांत आतां कोणते प्रश्न घोळत होते

तेथपर्यंत साऱ्या गोष्टी त्यांना सांगितल्या. आपण वेड्यासारखं तर कांहीं बडबडलों नाहीं; अन् आपल्या मनःस्थितीबद्दल सहानुभूति वाटण्याऐवजीं प्रिन्सिपलसाहेबांच्या दृष्टीनं हा बालिशपणा तर ठरणार नाहीं; अशा शंका तिला एकाएकीं वाटली, व त्यामुळें वर मान ठेवून त्यांच्याकडे पाहण्याचा धीटपणा तिला करवला नाहीं.

" अस्सं. ठीक आहे. मग अवश्य वाचन करा तुम्ही या विषयावर." हे त्यांचे शब्द ऐकले तेव्हां तिनं मान वर केली.

" मी काढून देतों तुम्हांला तीन–चार पुस्तकं, अगदी प्रारंभाला तुम्हीं वाचावीं अशीं."

ते उठले, पुस्तक काढून तीं टेबलावर ठेवण्यासाठीं ते तिच्याजवळ येऊन उभे राहिले व म्हणाले,

" हीं वाचा. पण माझ्या मनाशीं एक सिद्धांत मी ठरविला आहे तो सांगू तुम्हांला ?"

वासंती त्यांच्याकडे पहात राहिली.

" जगांत दारिद्र्य चालू राहिलं आहे याचं कारण हें, कीं ती एक ईश्वरी आपत्ति आहे अशी श्रीमन्त लोक धर्माच्या साहाय्यानं गरिबांची समजूत करून देत आले आहेत, अन् गरीब लोक ती प्रेमानं हृदयाशीं कवटाळून बसले आहेत. दारिद्र्य ही मनुष्यानं निर्माण केलेली आपत्ति आहे, अन् ती करणं माणसाच्या हातीं आहे हा विचार समाजांत जितका फैलावेल तितक्या लवकर दारिद्र्य नाहींसं होईल. आपल्या गरीबीवर इलाज नाहीं असं मानून गरीब लोक चालतील तोंपर्यंत गरिबी कायम राहील. तिच्या कारणांचा लोक विचार करूं लागतील असं करण ही क्रांतीची पहिली पायरी म्हटली पाहिजे. श्रीमन्तांना वाटतं दारिद्र्याचे दुष्परिणाम फक्त दरिद्र्यांनाच भोगावे लागतात, तेव्हां राहीनात का ते दरिद्री. पण हा विचार मूर्खपणाचा आहे. हीं दोन पानं वाचा या पुस्तकांतलीं..."

त्यांनीं एक लठ्ठ पुस्तक उघडलं अन् तिच्यापुढें ठेवलं. तिनं प्रथम— पुस्तकाच्या पहिल्या पानावरचं नांव पाहिलं. An Intelligent Woman's Guide to Socialism and Capitalism. एक पान उलटून ती अर्पणपत्रिका वाचूं लागली तेव्हां प्रिन्सिपल म्हणाले,

" आपल्या कॉलेजांत तीन-चार 'भाई' लोक आहेत त्यांना विचाराल, तर हें पुस्तक वाचण्याबद्दल ते तुमची थट्टा करतील. अस्सल कम्यूनिस्टांच्या दृष्टीनं बर्नार्ड शॉचं लिहिणं 'सायंटिफिक' नाहीं. 'हं ! शॉ!' अशी ते हेटाळणी करतात पण मला विचाराल तर या विषयावर इतकं सुबोध चित्तवेधक पुस्तक दुसर नाही. बघा, तुमचंही असंच मत होईल."

ते दूर झाले. पण परत आपल्या खुर्चीवर जाऊन बसलेले तिला दिसले नाहींत. मागेंच शेल्फजवळ उभं राहून पुस्तकांशीं चाळा चालला असावा त्यांचा वासंती वाचूं लागली —

" Such poverty as we have to-day in all our great cities degrades the poor and infects with its degradation the whole neighbourhood in which they live. And whatever can degrade a neighbourhood can degrade a country and a continent and finally the whole civilized world, which is only a large neighbourhood. Its bad effects cannot be escaped by the rich ..Poverty is a public nuisance as well as a private misfortune. Its toleration is a national crime. We must, therefore, take it as an indispensable condition of a sound distribution of wealth that everyone must have a share sufficient to keep her or him from poverty...." ( मोठमोठ्या शहरांत जें दारिद्र्य पसरलेलं आहे त्या योगें गरिबांची दुर्दशा तर होतेच, पण त्यांच्या दुर्दशेचा संसर्ग आजूबाजूसही पसरतो. हा संसर्ग शहराच्या एका बिभागांतून दुसऱ्या विभागांत, सबंद देशांत, इतकच काय सबंद जगांत हलके हलके फैलावल्यावांचून कसा राहील ? कारण जगांतले लोक तरी एक प्रकारें एकमेकांचे शेजारीच झाले आहेत आतां. दारिद्र्याचे दुष्परिणाम श्रीमंतांनाही पर्यायानं भोगावेच लागतात... दारिद्र्य ही केवळ खाजगी आपत्ति नसून सार्वजनिक उपाधि आहे. ती राहूं देण्यानं आपण आपल्या राष्ट्राचा घात करतों. तेव्हां देशांतील एकाही स्त्रीला अथवा पुरुषाला दारिद्र्याचे हाल सोसावे लागणार नाहींत अशा प्रकारें संपत्तीची वाटणी झाली पाहिजे... )

किती स्वच्छ, सुबोध, सुंदर होती ही विवेचनाची तऱ्हा ! केवळ खवचट, मर्मभेदी कोटया करणारा कुत्सित लेखक अशी शॉविषयीं तिनं समजूत करून घेतली होती. ती सुधारली पाहिजे असं तिला वाटलं. ती मोठ्या उत्सुकतेनं पुढें वाचू लागली, व त्या प्रकरणांत तिला इतकी गोडी लागली, कीं जेवायला उठेपर्यंत तिनं पुस्तक हातावेगळं केलं नसतं. पण ६५ व्या पृष्ठावरचं " You may ask why not only the rich but the poor put up with all this . .( तुम्ही शंका काढाल, की सध्यांची विषम रचना श्रीमंतच नव्हे, तर दरिद्री लोकसुद्धां चालू देतात याचं कारण काय ... )" हें वाक्य ती वाचीत होती, इतक्यांत तीन–चार विद्यार्थि प्रिन्सिपलना भेटायसाठीं खोलीत आले. तिनं पुस्तकावरून आपली नजर काढली नाहीं, पण तिचं अवधान चळल्यावांचून राहिलं नाहीं. त्यांचीं बोलणीं तिच्या कानांवर येत होतीं.

" आपली ...कॉलेजशीं हॉकीची मॅच आहे.. तिची तारीख बदलून घ्यायला पाहिजे..." एक विद्यार्थी म्हणत होता.

" No, no ; ठरलेल्या तारखांप्रमाणें सामने आटपले पाहिजेत असं मी नेहमीं म्हणत आलों, अन्..." प्रिन्सिपलनीं विचारलं.

" पण सर, ही मॅच जिंकायची असेल तर .."

" कां ? येत्या शनिवारीं घातवार आहे की काय कॉलेजचा ? "

" हो, तसंच म्हणायला कांहीं हरकत नाही. चंद्रकांत नसतांना .."

" म्हणजे ? तो कां नाहीं खेळत या शनिवारी ? त्याला घेऊन या पाहूं माझ्याकडे..."

" तसं नव्हे सर. तो आपल्या गांवीं गेला आहे."

" किती दिवस झाले ? "

" आठवडा होत आला."

" कां गेला ? "

" तार आली त्याला. त्याचे वडील मोटार अपघातांत सापडले. ."

"असं ! मग पंचाईत आहे! ..."

" मॅचची तारीख बदलून घेतां नाहीं कां यायची सर ? "

" Well, I don't know..."

त्यांच्या त्या संभाषणांत शेवटीं काय ठरलं तें वासंतीला समजलं नाहीं कारण त्यांच्या बोलण्याकडे तिचं मुळींच लक्ष राहिलं नव्हतं. आणि हातां-तल्यां पुस्तकांतही राहीलं नव्हतं तिचे विचार एकदम निराळ्या दिशेन सुरू झाले होते जेवताना प्रिन्सिपलशीं व त्यांच्या पत्नीशीं एकीकडे बोल-तांना ती तेच विचार करीत होती व नंतर चार पुस्तकं खांकेंत धरून खोलीच्या वाटेन जातांना तर, केवळ तेच विचार तिच्या मनांत चालले होते.

त्या दिवशीं "I am Sorry" येवढंच तुटक स्वरांत बोलून ती वर्गांत निघून गेली. त्यानंतर चंद्रकांत तिला पुन्हा भेटला नव्हता. परिचय चालू ठेवण्याची आपली इच्छा नाहीं हें त्यानं ओळखलं असावं असं तिला वाटलं होतं. तिच्याशीं बोलण्याचा त्यानं आणखी प्रयत्न केला असता तर तिला त्याचा आणखी राग आला असता, व आपण त्याच्याशीं केलेलं कठोर वर्तन बरोबर होतं अशी तिची खात्री झाली असती. परंतु ता नंतर तिच्या दृष्टीस देखील पडला नाहीं याचा परिणाम उलट झाला. तो समजूतदार व अभि-मानी आहे असं तिला वाटलं, व आपण त्याच्याशीं इतका कठोरपणा केला नसता तरी चाललं असतं असंही तिच्या मनांत मधून मधून आलं होतं. आपण त्याच्या अंत:करणावर उगीच घाव घातला असं तिचं मन तिला सांगे. वासंतीच्या प्रेमळ व कोमल मनाला ही जाणीव सह्य होण्यासारखी नव्हती... अन् आतां तिला कळलं होतं की चंद्रकांताला एकाएकीं गांवीं जावं लागलं होतं. त्याचे वडील अपघातांत सांपडले होते. बिचारा संकटांत होता! स्वत:ला ती फार दोष देऊं लागली चंद्रकांत आतां परत आला, कीं त्याच्याशीं पूर्वीप्रमाणें बोलाचालायचं ती मनाशीं ठरवूं लागली. त्यानं आपल्या सौंदर्याचे उल्लेख केले तसे करायला नको होते. पण जाऊं दे. विसरूं आपण त्या गोष्टी...

ती खोलीजवळ पोंचली. तिनं दारावर टिचक्या बाजविल्या. दार उघडलं गेलं; पण आंत पाऊल टाकतांच ती चमकली.

सुरंगाचे डोळे भिजलेले दिसले तिला!

चटकन् तिच्या खांद्यावर हात ठेवून वासन्तीनं विचारलं 'कां ग?"

"चंद्रकांत...त्याचे..." सुरंगाला हुंदका आला.

"तो एकदम गांवाला निघून गेला काय?"

सुरंगानं मान हलविली.

" मला सांगितलं नाहींस तूं ?"

" मला वाटलं तुला आवडायचं नाहीं. चंद्रकांत मला सांगत होता तूं त्याच्यावर फार रागावली असली पाहिजेस. तूं इतकं कां रागवावंस तें त्याला कळेना. मग मीं सांगितलं कीं—"

" तें जाऊं दे. त्याचे वडील फार आजारी आहेत काय ?"

" आहेत कसले ? ... होते म्हणायचे आतां..."

" म्हणजे ?"

" काल वारले ते. मघांशी चंद्रकांताचं पत्र आलं मला. फार हाल झाले म्हणे त्यांचे. अखेर काल सकाळीं..."

" अरेरे !"

" आमच्या रायगांवचा देवमाणूस गेला ! दुसऱ्याला मदत करायला सदा पुढें पाऊल असायचं दादांचं आपला संसार गरिबीचा म्हणून ते कधीं दुर्मुखलेले दिसले नाहींत. साऱ्या गांवाला नेहमीं आधार वाटायचा त्यांचा. लहानपणीं त्यांच्या अंगाखांद्यावर किती खेळलें असेन मी...असं बोलतां बोलतां सुरंगाला हुंदके आवरेनात.

वासंतीनं तिला घट्ट पोटाशीं धरलं व तिचं मस्तक थोपटलं.

" आतां चंद्रकांतावर केवढी जबाबदारी पडली. पांच लहान लहान बहिणी आहेत त्याला. कॉलेज सोडावंसुद्धां लागेल बिचाऱ्याला. किती हुशार आहे, नाहीं का तो ? अन् किती चांगला ! तुला वाटतो तसा तो वाईट नाहीं."

वासन्ती कांहीं बोलली नाहीं. सुरंगानं पाहिलं तों तिच्या गालांवरून आंसवं ओघळत होतीं.

* * *

चंद्रकांताविषयींच्या सहानुभूतीनं व्यथित झालेल्या वासंतीच्या मनाची खिन्नता लवकर नाहींशी होण्यासारखी नव्हती. पण दोन दिवसांनीं तिच्या मुंबईच्या मैत्रिणीचं जें पत्र आलं त्यानं तिची खिन्नता कमी करण्याचं काम पुष्कळच केलं.

तें पाकीट उघडल्याबरोबर त्यांतून एक सुंदर निमंत्रण पत्रिका खालीं पडली. तिच्याकडे दृष्टि टाकतांच "...चंपा जयवन्त आणि मुकुंदराव... यांचा रजिस्टर-पद्धतीनें विवाह..." हा ठळक ठशांतला मजकूर तिला दिसला.

'वा चंपाताई!' असं मनांतल्या मनांत उद्गारून तिनं मग पत्रिका नीट वाचली. "...समारंभास आपण आल्यानें वधुवरांस व आम्हांस विशेष आनंद होईल..." छापील पत्रिकेखालच्या कोऱ्या जागेंत "With love from Champa" असं शाईनं लिहिलेलं होत.

'अस्स!' वासन्तीनं पुन्हा स्वतःशीं उद्गार काढला. त्या उद्गारांत आनंदाइतकाच विस्मय होता. कारण चंपाचं एकाद्या तरुणावर प्रेम असल्याचं तिला माहीत नव्हतं व वासंतीनं स्वतःची सुखदुःखं तिच्याशीं इतकीं उघड केलीं होतीं, कीं तिनं तें मुद्दाम लपविलं असेल असा संभव नव्हता. अर्थात् तिचं हें लग्न प्रेमोत्तर विवाहांपैकीं नसावं तरी, किंवा वासन्ती मुंबईहून इकडे निघून आल्यानंतर हे जे मुकुंदराव कोण होते त्यांची तिची गांठ पडली असावी; व मग त्यांनीं झटपट काम आवरलं असलं पाहिजे. असे कांहींसे विचार मनांत आल्यामुळं आतां चंपा भेटल्याबरोबर आपण तिला कसं चिडवूं याची कल्पना वासन्ती करून पाहूं लागली, व त्या कल्पनेच्या ओघांतच ती पुन्हा मनाशीं म्हणाली, 'वा चंपाताई!'

मग तिच्या लक्षांत आलं, कीं पाकिटांत नुसती निमंत्रणपत्रिका नव्हती, एक पत्रही होतं. तिनं पत्राची घडी उघडली अन् वाचायला आरंभ केला--

"...तुला आनंद होईल याबद्दल माझी खात्री आहे. पण आतां तुझी माझी भेट होईल तेव्हां तूं मला चांगला मार देशील अशी भीति वाटते. 'माझ्यापासून लपवून ठेवलंस काय सारं?' असं विचारतांना, तुझे आधींच मोठे असलेले पाणीदार डोळे आणखी मोठे होऊन कसे चमकतील तें स्पष्ट दिसतंय् मला. पण तुझ्यापासून मी मुद्दाम लपवून ठेवलं सारं असं मुळीच नाहीं. गेल्या दोन महिन्यांत तूं माझ्याकडे पूर्ण दुर्लक्ष केलंस. कॉलेजांत दाखल झालीस तेव्हां पत्ता कळविलास तेवढाच. त्यानंतर तुझं एक तरी पत्र यायचं होतं? मीच तुझ्यावर रागावलें होतें, अन् तुला पत्र धाडायचं नाहीं असा निश्चय केला होता गीं. त्यामुळें मुकुंदाबद्दल मी कांहीं कळवलं नाहीं तुला. उन्हाळ्याच्या सुटींत मीं तुला दोन-तीन पत्रं लिहिलीं त्यांतहीं मुकुंदाचं नांव आलं नाहीं. कारण तेव्हां नुकताच त्याच्याशीं परिचय झाला होता माझा, अन् मला काय कल्पना लवकरच इतकी मजल आम्ही गाठूं म्हणून?"

त्या वाक्याची वासंतीला फार गंमत वाटली, अन् तें तिनं पुन्हा एकदां वाचलं तेव्हां तिला चंपा मूर्तिमंत डोळ्यापुढें दिसूं लागली. काळी सांवळी, उंच हाडापेराची, केस मुद्दाम सैल ठेवून वाऱ्यावर उडूं देणारी, हसायला लागली कीं 'बाई, बाई!' करून आपलं पोट आवरून धरणारी, भोंवताlच्या जगाबद्दल क्वचितच विचार करणारी, कांहींशी भित्री, बरीचशी भोळी, पण अत्यंत प्रेमळ—अशी तिनं मुंबईच्या मुक्कामांत जोडलेली एकच एक जिवाभावाची मैत्रीण!....

वासंती स्वतःशींच हसली.

मग ती पुन्हा पत्र वाचूं लागली—

"....त्याला इथल्या ऑल इंडिया रेडिओंत नोकरी आहे. येत्या जानेवारींत कदाचित् दिल्लीला बदली होणार आहे त्याची. पण मी त्याला सांगतें आहे, कीं ती रद्द होईल अशी खटपट कर. दिल्लीला जाणं माझ्या जिवावर येईल. भाऊंना अन् आईला सोडून दूर राह्यची कल्पनाच सहन होत नाहीं मला. मुकुंद अन् मी एकान्तांत असलों कीं तो मला म्हणतो, 'तुझ्यासाठीं मी वाटेल तें करीन इतकं माझं प्रेम आहे तुझ्यावर!' तें ऐकून मला फार सुख होतं, अन् आपणही उलट तसं म्हटलं पाहिजे अशा विचारानं मी तसं म्हणतें. पण तो म्हणतो 'हो! माहीत आहे. भाऊंपासून दूर राह्यला देखील तयार नाहीस!' अन् मग मला अगदी शरमल्यासारखं होतं. मी मुकुंदावर प्रेम करतें तें अपुरं तर नाहीं. अशी शंका माझ्या मनांत यायला लागते. इतर पाश तोडल्यावांचून प्रेम करणं अशक्य कां असावं मला कळेनासं होतं...."

हें सारं लिहिणं अगदीं चंपाला शोभेसं नव्हतं काय? भोळी चंपा! तिच्या निष्कपट भोळ्या स्वभावामुळेंच ती वासंतीला अतोनात प्रिय झाली होती!

वासंतीची दृष्टि सहज सुरंगाच्या कॉटकडे गेली. सुरंगा कॉटवर नव्हती. चंद्रकांताच्या समाचाराला म्हणून ती रायगांवला गेली होती. 'तूं चल ना' म्हणून तिनं वासंतीला फार आग्रह केला होता. अन् वासंतीनं तो मानला नाहीं म्हणून तिनं जातांना अगदी वाईट तोंड केलं होतं. निष्कपट प्रेमळ जीवाचा तो दुसरा नमुना वासंतीला सापडला होता.

अन् हे सारे प्रेमळ भोळे जीव शेवटीं कुणा तरी पुरुषाशीं एकरूप व्हायचे होते! आपणसुद्धां....?

पण त्या विचित्र विचारांत वासंतीनं आपलं चित्त सापडूं दिलं नाहीं. ती पत्र पुढें वाचूं लागली--

"....तेव्हां तुला आलंच पाहिजे. अगदीं आलंच पाहिजे. तुझी कसलीही सबब मी ऐकणार नाहीं. कोणत्या दिवशीं कोणत्या गाडीनं निघतेस तें कळव, म्हणजे मी स्टेशनवर येईन तुला घ्यायला.

अन् हें बघ, तुला मावशींकडे उतरूं देणार नाहीं मी. माझ्याकडेच राहायला पाहिजेस तूं. तसंच, नेमकी माझ्या लग्नाच्या दिवशीं आलीस तर तें मुळींच चालायचं नाहीं. दोन दिवस तरी आधीं ये. खूप बोलायचं आहे मला तुझ्याशीं, अन् त्यासाठीं निवांत भेट झाली पाहिजे आपली. समजलं ना ? तुझ्या पत्राची वाट पाहतें बघ.

तुझी प्रिय
चंपा

ता. क.—स्टेशनवर आम्ही दोघंही येऊं.

चंपा"

"आणखी ता. क.— मुकुंद तुला आवडेल. प्रथम तुला तो कांहींसा अबोल अन् गंभीर वाटेल. पण खरं म्हणजे तो बोलका अन् चांगलाच वात्रट आहे.

तुझी
चंपा"

या खालीं आणखी पांच-सहा ओळी होत्या. त्या खोडलेल्या होत्या. प्रथम वासंतीनं त्या वाचल्या नाहींत. पण खोडलेला मजकूर माणूस मुद्दाम वाचून पाहतं हा नेहमींचा न्याय आहे तिनं त्या काट मारलेल्या मजकुराकडे जरा लक्षपूर्वक पाहिलं तों त्यांत एके जागीं 'अशोक' हें नांव तिला दिसलं. मग तिला राहवेना. तिनं एकेक अक्षर लावून तो सबंध मजकूर वाचला.

"पुन्हा ता. क.—परवां सिनेमाच्या थिएटरांतून आम्ही बाहेर पडलों तों मला अचानक तुझे अशोक दिसले. त्यांनीं मला पाहिलं असतं तर मी कदाचित् त्यांच्याशीं बोललें असतें, पण ते बसमध्यें चढून दिसेनासे झाले..."

वासंतीला वाटलं उगीच आपण तो मजकूर वाचला. चंपानं तो खोडला होता, अशोकचा कांहीं उल्लेख आपल्याला सुखाचा वाटणार नाहीं अशी

तिची कल्पना होती, तेंच बरोबर होतं. आपणही तो वाचला नाहीं असंच समजू....

पण असं कुठें समजतां येतं ?

रात्रीं चंपाच्या लग्नाला जायचं कीं नाहीं याबद्दल ती मनाशीं विचार करूं लागली तों, त्या खोडलेल्या मजकुराची आठवण त्या विचारांत पुन: पुन्हा मिसळूं लागली. मग मुंबईंतले ते पूर्वीचे दिवस तिच्या अंतर्दृष्टीपुढून सरकूं लागले, व अशोकची मूर्ति तिला स्पष्ट दिसूं लागली. तो प्रथम परिचय, नंतरच्या त्या गाठीभेटी, तीं मधुर भाषणं, तें सुख, अन् अरेरे, नंतर त्यानं केलेला अविचार अन् आपल्या मनाला दिलेला भयंकर धक्का.. सारेच पुरुष असे अधीर व अविवेकी असतात?....पुरुषांचा तसला तो स्पर्श साऱ्याच स्त्रियांना दु:सह तिरस्करणीय वाटतो का?....चंपाच्या मुकुंदानं तसं केलं असेल? चंपा माझ्या जागीं असती तर तिला किळस आली नसती? पुरुषांत अशोक अपवादात्मक, कीं स्त्रियांत मी?....

हे विचार अन् या आठवणी मनाचा उत्साह नाहींसा करणाऱ्या होत्या अन् त्यांतच सापडून गिरक्या खाणाऱ्या वासंतीच्या मनाला असंही वाटलं—काय करायचं आहे चंपाच्या लग्नाला जाऊन? रागावेल ती आपल्यावर; पण पुढें केव्हां तरी आपण काढूं तिचा राग....

परंतु सकाळीं उठून तिनं खिडकींतून बाहेर डोकावून पाहिलं, त्याबरोबर तिच्या मनांत एकदम आलं, कीं मुंबईला न जाण्याचा बेत आपण रात्रीं ठरविला तो चुकीचा आहे.

प्रात:कालच्या वातावरणांत काय गुप्त अतर्क्य जादु आहे सांगतां येत नाही.

पण तिचा परिणाम वारवार अनुभवाला येतो. रात्रीच्या एकांतांत असह्य वाटलेलं दु:ख सकाळीं हलकं वाटतं, शल्यासारखे बोंचलेले अपमान क्षुद्र दिसतात, निराशा क्षुल्लक भासते, खिन्नतेच्या भरांत केलेले निश्चय व्यर्थ केले असं वाटूं लागतं.

वासंतीचं असंच झालं. तिनं खिडकींतून पाहिलं तों सूर्य वर आला होता. पर्वतीच्या टेकडीच्या माथ्यावर देवळांचे सोनेरी कळस झळाळत होते. अलीकडे दोनचार मोठमोठीं पिंपळाचीं झाडं होतीं. त्याच्या हलत्या-डुलत्या पानांपानांत हजारों प्रकाशबिंदु असे हेलकावत होते, कीं जणूं दिवसाही

ज्यांचा प्रकाश पडावा अशा काजव्यांचा प्रचंड थवाच्या थवा त्या वृक्षावर घोंगावत होता. कॉलेजच्या मैदानाच्या कुंपणालगत शेळया चरत होत्या, त्यांचीं अंगं सकाळच्या उन्हांत किती नितळ दिसत होतीं. आणि मैदानावर दोनचार विद्यार्थी धावत होते....

तें दृश्य पाहतांच वासंती मनाशीं म्हणाली. चंपाच्या लग्नाला जायला पाहिजे. तिच्या आयुष्यांतल्या सगळयांत अधिक आनंदाचा हा प्रसंग मी गेलें नाहीं तर स्वार्थी ठरेन मी..

त्या दिवशीं लाठीच्या वर्गाला सुटी होती. तिनं चहा घेतला व मग आधीं चंपाला पत्र लिहिलं. आपण येणार हें समजल्याबरोबर चंपाला केवढा आनंद होईल असं तिच्या मनांत सारखं येत होतं. दुसऱ्याला आनंद देण्याची कल्पना किती सुखकर असूं शकते त्याचा अनुभव ती घेत होती.

ती मुंबईला गेली ती चंपा आपल्याला किती आनंदांत दिसेल याच्या वाटभर कल्पना करीतच.

अन् चंपा तिला प्रत्यक्ष भेटली तेव्हां तिला कळून आलं, कीं आपल्या सर्व कल्पना अपुऱ्या होत्या. ती नुसती आनंदांत नव्हती, तर अक्षरशः जमिनीपासून उंच उल्हासांत तरंगत होती. तिनं स्टेशनावर वासंतीला मिठी मारली अन् मग जी बडबड सुरू केली ती एखाद्या आनंदांत चिवचिवणाऱ्या पाखरासारखी. रात्रीच्या गप्पांत तिनं मुकुंदाचा विषय काढला व त्याचे आपले प्रेमप्रसंग वर्णन करून सांगतांना तिनं किंचितही संकोच ठेवला नाहीं.

"..मला वाटलं होतं तो माझं पहिलं चुंबन घेईल तें भीतभीत अलगद घेतल्यासारखं घेईल. तितकी मी मनाची तयारी ठेवली होती. पण त्यानं मला एकदम धसकन् ओढलं, अन् माझे ओठ आपल्या ओठांत घट्ट धरले. मला मूर्च्छाच आली. पण त्या मूर्च्छेंतही सूक्ष्मपणें वाटत होतं, कीं त्यानं माझा अधर आणखी दुखवावा. त्यानं दृढ आलिंगन देतांच माझं सारं अंग शहारलं. त्या सुखाच्या आघातानं मी मूर्च्छेंतून बाहेर येत आहेसं वाटलं मला. पण लगेच 'चंपा ! लाडके !' हे त्याचे शब्द कानीं पडले न पडले तोंच एका प्रचंड लाटेंत सांपडून मी खोल कुठें तरी पडतें आहेसं मला झालं.."

चंपाचं हें बोलणं आपण आवडीनं अन् उत्सुकतेनं ऐकत आहोंत असं दाखविणं वासंतीला अवघड झालं. कारण तें ऐकून ती मनांतल्या मनांत फार गंभीर झाली होती. ज्या गोष्टीच्या सुखाचं चंपा तन्मयतेनं वर्णन करीत

होती तसल्या गोष्टींचीच वासंतीला भीति वाटली होती, शिसारी आली होती. त्या गोष्टीमुळेंच अशोकचं वागणं तिला पाशवी, क्रूर, निंद्य वाटलं होतं. त्याच्याशीं भांडून त्याला तिनं कायमचं दूर केलं होतं. आपले कुणा पुरुषाशीं कधीं निकट संबंध येऊंच द्यावयाचे नाहींत असं तिनं ठरविलं होतं! ..असं कां ?..

मग रात्रभर ती याच चमत्काराबद्दल विचार करीत राहिली.

आणि चम्पाच्या लग्नाचे दोन दिवस तिनं जरी मोठ्या आनन्दांत घालविले, तरी तिचा निरोप घेऊन जेव्हां ती परत निघाली, तेव्हां आपल्या मनावर आनन्दापेक्षां गांभीर्याचंच आवरण अधिक आहे असं तिला आढळून आलं.

ती परत पुण्यास आली तों सुरंगा परत आली होती.

" चन्द्रकांत आला आहे. " सुरंगा म्हणाली.

" होय ?"

" वाळला आहे बिचारा, दिसेलच तुला. "

खरच तो सुकला होता. तो दुपारीं कॉलेजांत वासन्तीला भेटला तेव्हां श्राद्धकर्मांनी विद्रूप झालेला त्याचा चेहरा तिला अगदी केविलवाणा दिसला.

" तुमचा निरोप घ्यायला आलों. " तो उदास स्वरांत म्हणाला.

" असं कां म्हणतां ?"

" मला आतां नोकरी केलीच पाहिजे. प्रिन्सिपलनीं मला फ्री-शिप दिली आहे, पण जेवणापुरते तरी पैसे कुठले आणूं ? शिवाय गांवी आई अन् पांच बहिणी.."

" पाहू आपण. " वासन्तीनं त्याला पुढें बोलूं न देतां म्हटलं, " तुमचं शिक्षण मधेंच सुटतां कामा नये. करतां येईल कांहीं तरी व्यवस्था. आम्हीं तुम्हांला निरोप घेऊं देणार नाही. "

ती किंचित् हसली. त्याची खिन्नता नाहीशी करायचा तिचा तो प्रयत्न वायां गेला नाही. त्याच्याही मुद्रेवर हास्य आलं.

त्यानं तिच्याकडे पाहिलं तें अशा आविर्भावान, कीं जणूं आपल्याशीं जी त्या दिवशीं रागानें, कठोरपणानें वागली तीच का ही वासन्ती असा विस्मय त्याला वाटत होता.

तो मनाशीं म्हणत होता, " हिचा मित्र-भाव मला असाच नेहमीं मिळेल का ?"

# ५

सभेंत असला कांहीं प्रकार होईल याची वासन्तीला थोडी जरी कल्पना असती तरी ती त्या व्याख्यानाला गेलीच नसती. परन्तु एक तर टिळक-स्मारक-मंदिरांतल्या वर्तमानपत्रांत गाजणाऱ्या सभा कशा असतात हें तिला एकदां प्रत्यक्ष पाह्यचं होतं, अन् शिवाय ज्या कॉंग्रेस पुढाऱ्यांचं व्याख्यान जाहीर झालं होतं, त्यांच्या वक्तृत्वाची कीर्ति तिनं बरेच दिवस ऐकली होती. म्हणून तिनं जायचं ठरविलं. सुरंगाला तिनं विचारलं, पण ती यायला खुषी दिसली नाहीं. वासन्तीला अलीकडे वाचनाचा नाद लागल्यापासून तिच्या व सुरंगाच्या स्वभावांतील भिन्नता जरा स्पष्ट होऊं लागली होती. अंतःकरणांतलं एक विचित्र शल्य विसरण्याच्या हेतूनं कां होईना, पण बुद्धिविकासाची व भोंवतालच्या परिस्थितीचं ज्ञान करून घेण्याची हौस वासन्तीला वाटूं लागली होती. सुरंगाला ही हौस वाटत नव्हती. त्यामुळं त्या दोघींत थोडंसं—फारच थोडं पण दोघींनींहिं मनांतल्या मनांत समजावं इतकं— दूरत्व उत्पन्न होऊं लागलं होतं. अमुक पुस्तक चांगलं आहे, वाच, असं वासन्ती सुरंगाला म्हणे; पण तिनं तें वाचलं नाहीं तर ती तिला आग्रह करीत नसे. तद्वत्च सभेला जाऊं या, येतेस, असं तिनं सुरंगाला एकदां विचारलं; पण ती सबबी सांगूं लागली तेव्हां तिची इच्छा नाहीं हें वासंतीनं ओळखलं. मग तिनं पुन्हा विचारलं नाहीं. ती टिळक-स्मारक-मंदिराकडे एकटीच निघाली.

ती सभेच्या जागीं पोंचली तों व्याख्यान सुरू झालं होतं. व्याख्याते नामांकित होते. 'कॉंग्रेस व तिचे टीकाकार' हा विषय लोकांचं कुतूहल जागृत करणारा होता. दिवस बरेचसे गरम राजकीय वातावरणाचे होते. त्यामुळें गर्दी खूपच होती. वासन्तीनं कशीबशी वाट काढली, अन् बायकांसाठीं राखून ठेवलेल्या जागेंत ती जाऊन बसली.

ब्रिटिश सरकारशीं कोणत्या प्रकारचा लढा कॉंग्रेसला लढायचा आहे, व त्यासाठीं कॉंग्रेसचं सामर्थ्य वाढविणं हेंच देशांतल्या प्रत्येक माणसाचं कसं कर्तव्य आहे याबद्दलचं विवेचन व्याख्याते करीत होते, तोंपर्यंत सभा शांत चित्तानें ऐकत होती. त्यांची जी कीर्ति तिनं ऐकली होती तितक कांहीं

त्यांचं वक्तृत्व वासंतीला असामान्य वाटलं नाहीं. पण त्यांचं विवेचन तिला ठीक वाटलं. पण मग कॉंग्रेसच्या एकेका टीकाकाराचे कॉंग्रेसवरचे आरोप खोडून काढायला त्यांनीं प्रारंभ केला तेव्हां त्यांच्या विवेचनांत तर्कशुद्धता तिला दिसेना. कम्यूनिस्टांविषयीं ते अगदीं तिरस्कारानं बोलूं लागले तें पाहून तिला आश्चर्य वाटलं. सध्यां ती कम्यूनिस्ट वाङमय वाचीत होती व तिच्या मनावर त्याचा पगडा बसूं लागला होता. व्याख्यात्यांच्या बेजबाबदार उद्‌गारांची तिला मनांतल्या मनांत चीड येऊं लागली. पण श्रोत्यांना ते आवडत होते असं दिसलं. कारण त्यांनीं कांहीं कोटि केली कीं, श्रोते उपहासानं हसत. व्याख्याते म्हणाले,

" या 'भाई' लोकांना लढ्यावांचून दुसरं कांहीं दिसत नाहीं. साम्राज्यशाहीशीं लढा, भांडवलवाल्यांशीं लढा, घरच्या कॉंग्रेसशी देखील लढा !"

श्रोत्यांत हशा पिकला.

कोणसं ओरडलं, " घरच्या 'ताई'शींसुद्धां लढा का ?"

पुन्हा मोठा हशा झाला.

माथ्यावरची गांधी टोपी चाचपीत व्याख्याते म्हणाले,

" तें मी कसं सांगू ? ताईला विचारा.."

प्रचंड हशा पिकला.

वासन्तीला किळस आली. सत्य-अहिंसेचं ब्रीद सांगणारा कॉंग्रेसवाला असं बोलूं शकतो याचं तिला विलक्षण आश्चर्य वाटलं. त्याचा तिला संतापही आला. अन् सभा खुषींत होती तें पाहून तर तिला अतिशय वाईट वाटलं. आपल्या देशांतलं सार्वजनिक आयुष्य किती निकृष्ट स्वरूपाचं आहे असा विचार तिच्या मनांत आला. कम्यूनिस्ट वाङमयाबद्दल, व त्या मताच्या लोकांबद्दल सामान्य पांढरपेशा वर्गांत इतकी गैरसमजूत व अढी कां असावी, असाहि प्रश्न तिच्या मनांत आला..कांहीं वेळ ती आपल्याच विचारांत मग्न झाली.

पण मग तिनं पाहिलं तों सभेचा नूर पालटला होता. श्रोते हसत नव्हते; गंभीर होऊं लागले होते. अस्वस्थतेची चळवळही सभेच्या कांहीं भागांत दिसूं लागली होती.

कारण व्याख्याते आतां हिंदुमहासभावाल्यावर टीका करूं लागले होते. ते म्हणाले,

" ..यांना वाटतं कॉंग्रेस मुसलमानधार्जिणी आहे.."

' मग खोटं आहे काय हें ?'' एक खणखणीत आवाज ऐकू आला.

"साफ खोटं आहे.'' अस गर्जून व्याख्याते बोलू लागले.

पण आतां त्यांच्या वक्तृत्वाची छाप सभेवर पडेना. सभेंत जागोजाग हिंदुमहासभावाले उभे असावेत, व वासतीच्या बरोबर समोरच्या बाजूला तर त्यांचं टोळकच्या टोळक असलं पाहिजे. त्या बाजून टाळ्या सुरू झाल्या. "बसा–बसा ! पुरे हो ! '' "शेम शेम '' असे आवाज सारखे होऊं लागले.

वास्तविक व्याख्यात्यांच्या मधांच्या कम्युनिस्टांवरच्या टीकेपेक्षां त्यांची हिंदुमहासभेच्या विचारसरणीवरची टीका अधिक तर्कशुद्ध होती, अस वासन्तीला वाटलं. देशाच्या राजकीय लढ्याचा विचार करतांना जातीय अभिमान धरणं कस घातुक आहे याचं तें विवरण करीत होते.

पण सभेंतल्या कांहीं लोकांना तें नको होतं. त्यांचा आरडाओरडा वाढू लागला. टाळ्या जोरांत सुरू झाल्या. व्याख्याते हट्टानें बोलतच होते. सभेंतली शांतता आतां पार नाहीशी झाली होती गोंगाट माजू लागला होता. लाउड स्पीकरमधून बाहेर पडणारे व्याख्यात्यांचे शब्दही तुटकपणेंच कानांवर येऊं लागले. लोक उठून उभे झाले. बायकाही चाळवल्या गेल्या. ".. हे..हिंदुमहासभावाले··देशाचा द्रोह..अस मी म्हणतो..'' हे शब्द वासतीनं कसेबसे ऐकले अन् तिन पाहिलं तों व्यासपीठावर एक जोडा गेला. मागोमाग दुसरा गेला. दगड सुरू झाले. "हिंदु धर्म की जय !'', "गांधी-महाराज की जय '', "कांग्रेस झिंदाबाद '' अशा आरोळ्यांचे शब्द एकमेकांत मिसळले. धक्काबुक्की सुरू झाली. काठ्याही वाजल्या. "पोलिस ! पोलिस ! '' असं कुणीसं ओरडलं. एकच दंगल उठली. सभेंतल्या ढकला-ढकलीची जोराची लाट बायकांपर्यंत पोंचायला वेळ लागला नाहीं. जिकडून तिकडून एकमेकांत मारामारी करणाऱ्या पुरुषांची झुंबड त्यांच्या अंगावर येऊन आदळली. त्यांना पळायलाही वाट राहिली नाहीं. बायका घाबरल्या. ओरडूं लागल्या. वासंती ओरडून सांगू लागली. "..धावूं नका. जागच्या जागीं उभ्या राहा !...'' तिच्या मनांत आलं, या वेळीं हातांत लाठी हवी होती. असाहि विचार आला कीं, लाठीबंद स्वयंसेविका असायला पाहि-जेत. प्रत्येक सभेच्या ठिकाणीं...

पण या विचारांचा या क्षणीं काय उपयोग होता ?

भोंवतालची मारामारी वाढत होती. ही कोंडी फोडून बायका जाणार कशा ?...

पण तितक्यांत वासन्तीनं पाहिल तों एका बाजूचे लोक भराभर दूर होऊं लागले, फाकले, पळाले.

तिनं आश्चर्यचकित होऊन निरखून पाहिलं, व मग तिला अधिकच आश्चर्य वाटलं.

तिला चंद्रकांत दिसला. जो सापडेल त्याला हातांतल्या हॉकीच्या काठीनें झोडपीत तो पुढें येत होता

गर्दी हटली. तो वासतीच्या जवळ आला, व तोंड फिरवून लोकांना उद्देशून ओरडला,

"अरे बायकांना सुरक्षित जाऊं देतां की नाही ? व्हा दूर ! हटा..."

तितक्यात शिट्या वाजल्या. पोलिस आले. लोक भराभर पांगले. दगल सपली.

चन्द्रकांत व वासती मिळून चालू लागली. पण प्रथम पाचसात मिनिटं गर्दीच्या लोटाबरोबर जाव लागल्याकारणान लोकांचे धक्के तिला लागू नयेत अशी काळजी घेत तो चालत होता, त्यामुळें तो गप्पच होता. वासन्तीही बोलत नव्हती.

कॉलेजच्या फाटकाच्या आत शिरल्यावर मात्र त्यांना मोकळेपणा सापडला, अन् त्याची तोंड आपोआपच उघडली.

"हुश्श ! सुटलें बाई !...." वासती म्हणाली.

"पुरात सांपडून हात मारीत कांठाला लागल्यावर वाटाव तस वाटतय, नाही ?" चन्द्रकांत हसला.

"नाहीं तर काय ? कुठून आलें व्याख्यानाला अस झाल मला. काय हे पुण्याचे लोक !..."

"पुण्याचेच कां म्हणतां ? जिकडे तिकडे असलेच प्रकार चालले आहेत हल्लीं. परवां नागपूरला तर एका व्याख्यात्यांच्या गळयांत जोडयांची माळ घातली लोकांनीं !"

"असच चालायच का ?" वासन्ती फार गंभीर झालेली दिसली. "बायका चेंगरून मरायला कांहीं अवकाश नव्हता आज ! ..."

कांहीं वेळ स्तब्धपणें तिनं पावलं टाकलीं. पण मग एकदम मान वर करून, जणू इतका वेळ विसरून राहिलेला प्रश्न करण्याच्या आविर्भावानं तिनं विचारलं,

" पण तुम्ही कसे नेमक्या वेळीं आलांत ?"

या तिच्या प्रश्नाच प्रामाणिक उत्तर देण चन्द्रकांताला कठीण वाटल. कारण तें तिला आवडणार नाहीं हें त्याला माहीत होतं. सध्याकाळीं तो ग्राउंडवर जाऊन हॉकी खेळत होता. पण त्याच उजव मनगट थोडं दुखावल होतं म्हणून त्यानं पंधरा वीस मिनिटच ' प्रॅक्टिस ' केलं होतं व मग कपडे चढवितां चढविता त्याला एकदम आवेगान वाटल होत, आतां वासन्ती भेटेल काय ? तिच्या सान्निध्याची तीव्र इच्छा आतांशा बारवार त्याच्या मनांत एकाद्या उर्मीसारखी उसळे. ती इच्छा सुखावह होई, पण तिच त्याला सूक्ष्म भयही वाटे. कारण सामान्य तरुण मुलींहून वासन्तीच सौंदर्य जितक वेगळ होतं, तितकीच तिची वृत्तीही वेगळी होती, हें त्याच्या आतां चांगलच लक्षांत आलं होत. ती फार उदार अंतःकरणाची होती. तिन त्याला पैशाची मदत केली होती. ती प्रेमळ होती. ती नेहमीं त्याला धीर देई. तिला स्नेहाची लालसा होती. आतांशा किती मनमोकळेपणान ती त्याच्याशी वागे. तिच्या बुद्धीची प्रशसा केली तर ती आनद झाल्यासारखी चर्या करी. पण या मर्यादेपलीकडे त्यानं जातां कामा नव्हत. आपल्या सौंदर्यामुळें अमका तरूण लुब्ध होऊन आपल्या मागें मागें हिंडतो ही जाणीव एखाद्या तरूण मुलीला सुखाची व अभिमानाची वाटली असती. वासती त्या जाणीवे-पासून अलिप्त होती. ही अलिप्तता तिच्या ठिकाणीं कां असावी हें एक चन्द्रकांताला कोडं वाटल होत ; पण ती हिशेबांत घेण त्याला भाग होत. तिला वारंवार भेटावसं आपल्याला वाटत हें तिला कळू देतां उपयोगी नाहीं असा इशारा तो स्वतःला देई. पण इशारा दिला म्हणून इच्छा थोडीच निर्मूल होणार ? ती पुन्हः पुन्हा त्याच मन अस्वस्थ करून टाकी. एकीकडे त्याला वाटे, कीं वासतीच्या सौंदर्यदर्शनाची व सान्निध्याची बळावत चाललेली आपली आसक्ती तिच्यांत व आपल्यांत उत्पन्न झालेल्या मित्रभावाचा घात केल्या-वांचून राहणार नाहीं; पण एकीकडे ती इच्छा पूर्ततेसाठीं एखाद्या स्फुलिंगा-सारखी धगधगू लागली, कीं तिच्या दाहापासूनही त्याला चमत्कारिक सुख वाटे. मग तो तिच्या आहारीं जाई, व संयम करणं त्याला अवघड होई.

खेळ आटपून कपडे घालतां घालतां जेव्हां त्याला एकदम वासन्तीची आठवण आली, व तिला भेटावंसं वाटलं तेव्हां त्याची अशोच मनःस्थिति झाली होती. मग तो विद्यार्थिनींच्या वसतिगृहाच्या बाजूला गेला होता, व त्या इमारतीपुढून त्यानं कांहीं वेळ येरझारा घातल्या होत्या. त्याच्या सुदैवानं थोड्या वेळानं सुरंगा बाहेर पडलेली त्याला दिसली होती. त्याला पाहून व त्याच्या हातांतल्या हॉकीच्या काठीकडे दृष्टि टाकून तिनं विचारलं होतं,

" मॅच होती कीं काय तुझी ?"

" नाहीं. रोजचं प्रॅक्टिस.." त्यानं उत्तर दिलं होतं.

" माझ्याबरोबर येतोस ?"

" कुठें ?"

" गांवांत. मला फाउंटन पेन दुरुस्तीला टाकायचं आहे."

" आलों असतों. पण मला थोडं काम आहे.. तू एकटीच कशी ? वासती कुठें आहे ?"

" ती टिळक स्मारक मन्दिरांतल्या व्याख्यानाला गेली आहे."

" असं होय ?"

मग तो तिच्या उलट दिशेनं गेला होता, पण ती फाटकांतून बाहेर पडून रस्त्याला लागून दिसेनाशी झाली तेव्हां परत आला होता, व सभेच्या जागेकडे गेला होता तिथं चार पांच ठिकाणीं उभं राहून त्यानं पाहिलं होत, व जेव्हां वासती त्याच्या दृष्टीस पडली त्या जागीं तो स्थिर झाला होता. त्याचे डोळे मग तिच्यावरून हालले नव्हते. स्त्रियांच्या त्या जमावांत वासंतीचं सौंदर्य किती असामान्य दिसत होतं..

पण ही हकीगत तो वासन्तीजवळ उघड करू शकत नव्हता.

त्यामुळें, 'पण तुम्हीं कसे नेमक्या वेळीं आलांत ?' हा तिचा प्रश्न ऐकल्यावर त्यानं चट्दिशीं उत्तर दिलं नाहीं, व जरा वेळानं तो बोलला तेव्हां सुद्धां " मी होय ?.. अं.. आलों म्हणून बरं झालं.. " असं कांहीं तरी पुटपुटून त्यानं तो विषय हसण्यावारी संपविला.

त्याच्या प्रतारणेची वासंतीला कोठून कल्पना ? आतां कॉलेजच्या आवारांत पोंचल्यामुळें ती रेंगाळत पावलं टाकीत होती, व त्याच्याशीं बोलत होती.

" तुम्हीं कोणत्या पक्षाचे आहांत, चंद्रकांत ?"

" म्हणजे ?"

" म्हणजे तुमचीं राजकीय मतं काय आहेत ?"

तो तिच्याकडे निरखून पाहत होता. चंद्राचा प्रकाश तिच्या सुंदर केसांत खेळत होता. त्या निर्मल शीत प्रकाशामुळें अन् शुभ्र वस्त्रांमुळें तिच्या लावण्यावर केवढा सात्त्विकपणा आला होता ! तिला शुभ्र वस्त्राची फार आवड होती. त्याला ती बहुधा शुभ्र साडी नेसलेलीच दिसली होती..

मनाशीं असे विचार करीत राहिल्यामुळें तिचा प्रश्न त्यानं ऐकला तरी त्याचा अर्थ त्याला कळला नाहीं.

तो चाचपडत म्हणाला, " आं ?.."

" नाहीं, म्हटलं तुमची राजकीय मतं काय आहेत ?"

तो हसला. " राजकीय मत प्रत्येकाला असलींच पाहिजेत का ?"

" मतं नसलीं तरी मनाचा कमी अधिक कल म्हणा. आपल्या देशाच कांहीं तरी हित साधावं असं तर प्रत्येकाला वाटलं पाहिजे ना ?"

" हो, तस मलाही वाटत. अन् म्हणूनच राजकारणाचा बिलकूल विचार करायचा नाहीं अस मी ठरविल आहे."

" वा ! तुम्हीं अगदी शॉसारखें बोलायला लागलांत की !" वासन्ती हसली.

" तें कां ? राजकारण हा काय एकच मार्ग आहे आपल्या देशाची सेवा करण्याचा ? जगदीशचन्द्र बोसनी हिंदुस्थानच नांव जगांत गाजविल. ते राजकारणी होते ? टागोर तरी राजकीय पुढारी आहेत काय ? राधाकृष्ण राजकारणी आहेत ?"

" म्हणजे तुम्ही कवि, तत्त्वज्ञ अस काहीं व्हायच ठरविल आहे कीं काय ?"

" छे-छे-छे ! आपला निराळाच धोपट मार्ग आहे. हा !" अस म्हणून चंद्रकांतानं हातांतली काठी वर उचलून धरली.

" म्हणजे मारामारीचा कीं काय ? शाबास !"

" वेडेपणाचं सोंग पांघरून चेष्टा करू नका माझी. मला खरंच वाटत, कीं हॉकींत नैपुण्य संपादन केल्यानं हिंदुस्थानचा लौकिक मला वाढवितां येईल. खेळांच्या योगानं स्वराज्याचा प्रश्न सुटेल असं भलत कांहीं म्हणत

नाहीं मी; पण आपल्यांत उत्तमोत्तम खेळाडू निर्माण झाले तर जगांत आपल्या देशाला मानाचं स्थान मिळायला मदत होईल हें खचित. हिंदी हॉकी टीमचंच उदाहरण घ्या..."

मग तो किती वेळ तरी मोठ्या उत्साहानं बोलत राहिला. त्याच्या म्हणण्यातलं सत्य वासतीनं कबूल केलं. पण ती म्हणाली,

"तरी उत्कृष्ट खेळाडूलासुद्धां राजकीय मतं असलींच पाहिजेत. तीं त्यानं आपल्या खेळांत मिसळूं नयेत. पण.."

"म्हणजे मी कोणत तरी मत स्वीकारलंच पाहिजे म्हणतां ?"

"हो."

"ठीक आहे. तुम्हीं सांगाल तें माझं मत. मग तर झालं—"

"वा ! असं नाही.." ती मान हालवीत हसली.

"किती सुंदर हसतां तुम्ही !" त्याच्या तोंडून चटकन शब्द गेले, अन् लगेच आपण हा अविचार तर केला नाही अशी भीति वाटून तो अतिशय गोंधळला. त्याला वाटलं, आतां वासती रागावून एकदम दूर तर होणार नाहीं?..

वासंती हसली नाहीं किंवा रागावल्यासारखीही दिसली नाहीं. ती फक्त म्हणाली,

"उद्यां मी तुम्हांला एक पुस्तक देईन तें तुम्हीं वाचलं पाहिजे."

आणि मग आपल्या वसतिगृहाच्या फाटकाकडे ती कांहींशा घाईनं निघून गेली.

आपलं बोलणं तिला रुचलं की वावगं वाटलं तें चंद्रकांताला ठरवितां येईना. कदाचित् त्याबद्दलचेच तो विचार आणखी किती तरी वेळ करीत राहिला असता.

❁ ❁ ❁

परंतु तो वसतिगृहांत शिरला तों फाटकाजवळच्या चौथऱ्यावर दहा वीस विद्यार्थि जमून एकमेकांत मोठमोठ्यान बोलत असलेले त्याला दिसले. त्यांच्यांत जाऊन मिसळण्याच्या मनोवृत्तींत तो नव्हता. जो जिन्याकडें वळला. पण तितक्यांत त्यांच्यापैकीं एकदोघांनीं हाका मारल्या. 'ए चंद्रकांत ! इकडे ये ना ! वा ! ये, ये" मग परत वळण्यावांचून त्याला गत्यंतर उरलं नाहीं.

"तुला समजली का बातमी ?"

" काय ?" चंद्रकांतानं विचारलं.

" घाटे, कुळकर्णी, बापट या तिघांना पोलिसांनीं चौकीवर नेलं आहे..'

" खरं ?..कां ?"

" सभेंत दंगल करतांना पकडलं त्यांना. हा जोश्या सांगत आला आहे. तूं गेला होतास सभेला ?"

" छे !"

" वासंती गेली होती म्हणे.."

" गेली असेल.."

" नाहीं आपलं सांगितलं." त्या विद्यार्थ्यांनि डोळे मिचकावले, व बाकीचे हसले.

" का रे ! मार हवा आहे का ?" चंद्रकांतान दटावलं.

" तें राहूं दे. आतां कसं करायचं ?"

" कशाबद्दल ?"

" घाटे वगैरेना पोलिसांनीं चौकीवरच डांबून ठेवलं रात्रभर तर?"

" बरं होईल कीं.' चंद्रकांतानं उत्तर दिलं, " सभेंत दगडफेक केली कीं काय प्रायश्चित्त घ्यावं लागतं तें कळेल तरी एकदां !"

" वा, असं कसं ? आम्हीं एक ठरवलं आहे. तुला कसं वाटतं सांग."

" काय ?"

" प्रिन्सिपलना कळविली पाहिजे ही हकीगत. "

" मग कळवा. " चंद्रकांत म्हणाला.

" आम्ही नाहीं कळविणार. आम्ही गेलों सांगायला तर ते म्हणतील Sorry, I can't help hooligans. म्हणून म्हणतों.."

" काय मी जाऊं कीं काय ? शहाणा आहेस !'

" तूं नको जाऊंस. वासंतीला जायला सांग ती तुझं ऐकेल, अन् प्रिन्सिपल तिचं ऐकतील.."

" वा वा ! लॉजिकमध्यें पटाईत व्हायला लागला आहेस खरा ! ' अशा सौम्य शब्दांत नापसंती व्यक्त करून चंद्रकांत त्या टोळक्यापासून दूर झाला, व आपल्या खोलीकडे गेला.

"..सारखा तिच्या मागें मागें असतो आतांशा.." असे त्यांच्यापैकीं कुणाचे तरी.शब्द त्याला ऐकूं आले.

खोलींत पोंचल्यावर तो विचार करूं लागला, लोकांच्या डोळ्यांवर यावं इतकीं मी व वासंती एकत्र असतों काय ?..त्याला तसं वाटेना. उलट तिचा सहवास त्याला जितका हवासा वाटे तितका त्याला मिळत नव्हता. नव्हे मिळण्यासारखा असून तो टाळीत होता. कितीदा तरी तो आपलं मन आवरीत असे. ती इकडे तिकडे जातांना दिसावी, पण तिच्यापुढं त्यानं जाऊं नये, जणू तिच्याकडे आपलं लक्ष नाहीं असं दर्शवून सोबत्यांशीं बोलत रहावं. वर्गांत तिच्या बाकापासून शक्य तितकं दूर बसावं अन् तिच्या मागच्याच बाकावर बसलेल्यां विद्यार्थ्यांचा मनांतल्या मनांत मत्सर करावा. लायब्ररींत ती दूरच्या एका टेबलावर पुस्तकांतलीं टिपण करीत बसलेली दृष्टीस पडली तरी तिच्याकडे न जातां आपलं काम आटपून तिथून निघून यावं. तिच्या खिडकीखालून जायची क्वचित् वेळ आली तर वर होऊं पाहणारी नजर निश्चयानं जमिनीकडे ठेवावी अन् शीळ बंद करावी.

कारण, वासंती सामान्य तरुण मुलींहून किती निराळी आहे हें त्यानं आतां जाणलं होतं. आपलं तारुण्य, आपलं रूप, आपलं पुरुषत्व, यांकडे तिचं चित्त चुकूनसुद्धां नसतं ही गोष्ट अनेक वेळां त्याच्या लक्षांत आली होती. तिच्यापासून त्याला काय हवं होतं ? साधा, निर्विकार मित्रभाव ? तशी त्यानं प्रथम स्वतःची समजूत करून घेतली होती व तीच खरी आहे असं त्याला कांहीं दिवस वाटलं होतं. परन्तु गेल्या महिन्यांत एकत्र व कधीं कधीं फक्त ती व तो असे बोलण्या-चालण्याचे प्रसंग अधिक आल्यावर त्याला आढळून आलं, कीं तिचा नुसता मित्रभावच त्याला पुरेसा नव्हता. रात्रीं अंथरुणावर पडून विचार करतां करतां त्यानं कितीदां तरी स्वतःला प्रश्न केला होता, मला काय पाहिजे ? अन् त्या प्रश्नाच्या उत्तराचा स्पष्ट उच्चार करण्याचं जरी त्यानं टाळलं, तरी तें मनांतल्या मनांत तो समजला होता. आणि त्याची त्याला भीति वाटली होती ! कारण, वासनात्मक प्रेमाचा उद्भव तिच्या मनांत होणारा नव्हता, व तसलं प्रेम आपण तिच्यावर करतों अशी तिला शंका आल्याबरोबर ती दूर होईल याविषयीं त्याला शंका नव्हती. तिच्यावर प्रेम करणं शक्य नसेल तर निदान तिचा मित्रभाव तरी टिकावा अशी त्याच्या मनाला ओढ वाटे. पण तेंच किती कठीण आहे याची त्याला वारंवार जाणीव होई. एखादं पाण्यानं भरलेलं भांडं डोक्यावर घेऊन त्यांतला थेंबही सांडू न देतां वाट चालण्यापैकीं ही गोष्ट होय, असं त्याच्या मनांत येई....

परंतु, हा अवघड प्रयोग करायचं त्यानं ठरविलं होतं. अन् म्हणूनच त्याच्या सोबत्यांनीं केलेली ती चेष्टा ऐकतांच त्याचं मन जरा चिचकलं होतं. मी फार असतों काय वासंतीबरोबर ?...तिची कुणी अशी थट्टा केली तर ?...ती न आवडून ती एकदम बोलणं चालणं बंद तर करणार नाहीं ? ...छे, छे ! असं कधीं होतां कामा नये ! तिच्या प्रेमाची त्याला भूक होती; ती पुरी होण्याची आशा नव्हती. पण तिचा मित्रभाव त्याला मिळाला होता; तो नाहींसा झाला तर त्याचं अंतःकरण भुकेनं पुरतंच व्याकुल होणार होतं...

  

रात्रभर हे विचार केल्यामुळं सकाळीं उठल्याबरोबर त्यानं एक लहानसं पत्र लिहिलं, व वासतीनं दुपारीं कॉलेजांत भेट होतांच जेव्हां त्याला एक पुस्तक दिलं व म्हटलं.

"हें तुम्हीं वाचावं अशी माझी इच्छा आहे."

तेव्हां त्यानं तें पत्र हळूच तिच्या हातीं देऊन म्हटलं, "अन् तुम्हीं हें..."

"हें काय ?" तिनं आश्चर्यानं हसत विचारलं.

पण तो तिथें अधिक थांबला नव्हता.

वासन्तीनं त्या लखोटयाकडं पाहिलं. तिला क्षणभर त्याची भीति वाटली. तिच्या मनांत आलं. हें प्रेमपत्र तर नसेल ? आपल्या सौंदर्यापेक्षां, आपल्या स्त्रीत्वापेक्षां, आपल्या बौद्धिक सहवासाविषयीं अधिक आसक्ति ठेवायला चंद्रकांत शिकला. असं तिला अलिकडे वाटूं लागलं होतं. त्याच्या मनांतील द्वंद्वाची तिला कल्पना नव्हती. तिला फक्त त्याचं संयमित वर्तन दिसत होतं. त्याचं सौजन्य अनुभवाला येत होतं. पुरुष वासनातीत स्नेह ठेवूं शकत नाहीत ही आपली समजूत चन्द्रकांत खोटी ठरवील असं ती मानूं लागली होती. अन् आतां हें पत्र ?...आपल्यांत उत्पन्न झालेल्या सुंदर स्नेहभावावर चन्द्रकांतानं घाव तर घातला नसेल या पत्रांतल्या मजकुरानं ?...

खोलींत गेल्यावर तिनं तें लगेच वाचलं नाहीं. ती कॉटवर स्वस्थ पडून राहिली. पण जरा वेळानं तिच्या लक्षांत आलं, कीं सुरंगा यायची वेळ झाली. तेव्हां ती यायच्या आंत तें वाचलं पाहिजे या विचारानं तिनं तें पाकीट फोडलं.

आंतल्या नोटपेपरवर मजकूर थोडाच होता—

"....तुम्ही व मी एकत्र फार दिसतों अशी जर विद्यार्थ्यांत टीका होत असेल तर ती बरी नव्हे असं तुम्हांला वाटण साहजिक आहे. मीं शक्य तो गाठभेट कमीच घेत असतों. पण याहूनही कमी घ्यावी असं तुम्हांला वाटत असेल तर तशी मला सूचना द्या..."

तो मजकूर वाचून वासन्ती स्वतःशींच हसली.

कांहीं वेळान ती उठली, टेबलाशीं गेली, व एका कागदावर लिहूं लागली—

" तुम्ही मला पत्र दिलं तेव्हां क्षणभर मी भ्यालें. कां तें स्पष्टच सांगतें. मला वाटलं—-"

पण पुढें लिहिण्याऐवजीं तिनं तो कागद फाडून टाकला. तिला वाटलं, असं कशाला लिहायच ?

मग तिनं दुसऱ्या कागदावर लिहायला आरंभ केला—

"विद्यार्थ्यांत काय बोलणीं चालतात तें मला माहीत नाहीं. पण तीं कशींही असलीं, तरी जोंपर्यंत—-"

जोंपर्यंत—

जोंपर्यंत काय ?

छेः ! उत्तर लिहिण्याच कांहीं जमेलसं वाटेना तिला. तिनं तोही कागद फाडून टाकला, व मनाशीं वेगळाच बेत केला.

कॉलेजांत पहिला तास झाल्यावर वर्गाबाहेर पडतां पडतां तिनं त्याला म्हटल, " जरा बाजूला येतां ? मला कांहीं बोलायचं आहे तुमच्याशीं."

चन्द्रकांतानं मान हलविली. त्याची छाती धडधडूं लागली. शिक्षेचा निकाल ऐकण्याचा क्षण जवळ आला कीं आरोप्याची मनःस्थिति कशी होत असेल तें त्याला कळलं. तो वर्गापुढच्या गॅलरीत थांबला. ती त्याच्याकडे पावल टाकीत आली तेव्हां ती हसली. त्याला त्या हसण्याचा थोडासा राग आला. 'तुम्हीं माझी गाठभेट कमी घेतली तर बरं' असं ही मला सांगणार, अन् तें सांगतांना हिन हसाव ? स्त्रिया निर्दय असतात...

ती जवळ आली व म्हणाली, " आतां किती तास आहेत तुम्हांला. ?"

"दोन."

"मलाही दोनच. आहेत. तुमचे तास आटपल्यावर लायब्ररींत थांबाल माझ्यासाठीं ? माझं काम आहे."

"काय ?"

"मग सांगेन..." असं म्हणून ती आपल्या वर्गाकडे निघून गेली.

तो जिना उतरून आपल्या वर्गांत जाऊन बसला. पण त्याचं लक्ष ठिकाणावर नव्हतं. एका प्रोफेसरांनीं पशूपक्षांना विवेचक बुद्धी असते कीं नाहीं या प्रश्नावर तासभर प्रवचन केलं, व त्यानंतरच्या तासांत ॲरिस्टॉटल्, ॲरिस्टॉटल असं नांव त्याच्या कानांवर सारखं येत होतं. पण त्यानं एक अक्षर-सुद्धां वहींत टिपून घेतलं नाहीं.

तास संपल्यावर तो लायब्ररीकडे गेला.

वासंती लवकर आली नाहीं. पण ती आली तेव्हां यथाप्रमाणेंच किंचित् हसत होती.

"आतां तास नाहींत ना तुम्हांला ?"

"त्यानं मान हलविली.

"Good ! आतां आपण बाजारांत जाऊं. येतां ? आमच्या बापूंकडे कोणसे बडे पाहुणे यायचे आहेत आदितवारीं. त्यांच्या सरबराईसाठीं बरंच सामान मागवलं आहे त्यांनीं. मी इथें खरेदी करून मोटार स्टॅंडवर पोंचवलं कीं जाईल. मोटारवाले आमच्या ओळखीचे आहेत. बिस्किटं, लोणी, पाव, सिगार्स, अन् आणखी काय काय ! ही पाहिलीत का केवढी यादी धाडली आहे बापूंनीं ! ..."

होय. फार मोठी यादी होती. अन् चंद्रकांत ती वाचतांना हसत होता.

तो म्हणाला, "लष्करांत जायला पाहिजे."

"हो ना. अन् म्हणून तर तुम्हांला तसदी देतें आहे मी. येतां ना ?"

कॉलेजपासून बऱ्याच अंतरावर गेल्यानन्तर त्यांना टांगा मिळाला. त्यांत बसल्यावर वासन्तीनं विचारलं,

"तुमच्या पत्राचं आतां निराळं उत्तर नको ना तुम्हांला ?"

तो हसला, पण त्याला उत्तर सुचलं नाहीं. त्याचं मन एकदम भरून आलं होतं. त्याला वाटत होतं, किती निष्कपट अन् किती प्रेमळ ही वासंती! हिच्या शुद्ध वासनातीत स्नेहानं संतुष्ट होण्याइतकं मला माझं अंतःकरण विशुद्ध करतां येणारच नाहीं काय ? त्या क्षणीं तरी तें त्याला शक्य वाटलं. तिच्या अगदीं जवळ बसावं लागल्यानं मधेंच तिच्या दंडाचा त्याला स्पर्श होत होता, मधेंच तिचे केस जवळ जवळ त्याच्या केसांशीं भिडत होते,

उन्हाची तिरीप डोळयांवर येऊ लागली म्हणून तिनं सलाम केल्यासारखा पंजा कपाळावर धरला तेव्हां तिच्या गोऱ्यापान बोटांच्या फटींफटींतून रक्तिमा दिसला तो किती मनोहर होता. पण त्या क्षणीं वासनेची उर्मि त्याच्या अतःकरणांत किंचित् देखील नव्हती. अगदीं वासनातीत वृत्तीनं तो तिच्या निकटत्वाचं सुख घेत होता. त्याच्या मनांत सारखं येत होतं, माझी ही वृत्ति नेहमींच टिकेल तर किती बरं होईल !...

लष्करांतल्या एका मोठ्या दुकानापुढें चन्द्रकांतानं टांगा उभा केला.

"इथं मिळेल तुम्हांला सगळं." तो म्हणाला.

ती टांग्यांतून उतरत होती तोंच दुकानांतून एक ऐटबाज पोषाक केलेली तरूण स्त्री हातांत एक छोटं बन्डल घेऊन बाहेर पडली. तिच्यापुढें एक भला मोठा देखणा कुत्रा उड्या मारीत रस्त्यावर आला; व टांग्यांतून खालीं उतरलेल्या वासतीला पाहतांच क्षणभर थबकून त्यानं तिच्याकडे पाहिलं. मग तो आपलं झुपकेदार शेपूट हलवीत तिच्या जवळ आला, व तिच्या साडीवरून त्यानं आपलं नाक फिरविलं.

दुकानांतून बाहेर पडलेली ती स्त्री ओरडली,

"पाशा ! हें काय हे ?..."

पण पाशानं तिची दटावणी मानली नाहीं.

त्याची शेपूट अधिकच जोरानं हलूं लागली, व त्यानं आपल्या तोंडानं वासन्तीच्या पायाला ढुशी दिल्यासारखं केलं.

"हं ! पाशा ! चल" असं म्हणून ती स्त्री रस्त्याच्या दुसऱ्या कडेला उभ्या असलेल्या मोटारींत जाऊन बसली, व तिनं जेव्हां "पाशा !" अशी पुन्हा जोरानं हाक मारली तेव्हां मात्र तो मोठाल्या झेपा टाकीत गेला, व उडी मारून तिच्याजवळ बसला.

दुकानाच्या पायऱ्या चढतां चढतां चन्द्रकांतानं वासन्तीला म्हटलं, "काय गम्मत त्या कुत्र्याची ! जशा कांहीं तुम्ही त्याच्या ओळखीच्याच !"

वासन्तीला वाटलं, पूर्वी आपण त्या कुत्र्याला कुठें पाहिलं तें सांगावं. पण लगेच त्या तरूण स्त्रीची तिला आठवण झाली व तिला वाटलं, नाहीच सांगू. कां कोण जाणे त्या कुत्र्याबरोबर त्या स्त्रीला पाहिल्यानं तिच्या मनाची निराशा झाली होती. तिचा थोडा रागही तिला आला होता.

चन्द्रकांतानं दुकानदाराला विचारलं,

" मघाशी गेल्या त्या बाई कोण ?"

दुकानदारानं हसत उत्तर दिलं, " त्या होय ? मिसेस गोखले. इथें डॉक्टर जयन्त आहेत ना, त्यांच्या..."

पुढचे शब्द वासन्तीनं ऐकलेच नाहींत.

पाशाच्या मालकाचं नांव डॉ. जयंत गोखले होतं तर ?...अन् या मिसेस् गोखले काय ?...

पण तिला त्या स्त्रीचा असा राग यायचं काय कारण ?...

" हां. तुमची यादी काढा." असं चन्द्रकांतानं म्हटलं तेव्हां ती दचकली. आपल्या वृत्तींत एकदम झालेली चलबिचल त्याच्या लक्षांत तर आली नसेल असं तिला वाटलं व आपलं वर्तन त्याला कदाचित् चमत्कारिक वाटलं असलं तरी त्याचा अधिक विचार करूं नये म्हणून ती हसत म्हणाली,

" वा महाराज, यादी तर तुम्हीं आपल्या खिशांत ठेवलीत कीं मघाशी!"

" अरे, खरंच कीं !" असं म्हणून तोही हसला.

वासन्तीला वाटलं, बचावलें, याला कसली शंका आली नाहीं.

---

# ६

संध्याकाळीं साडेचार वाजल्यापासून बापूसाहेब निंबोणीच्या मोटार-स्टँडवर येऊन बसले होते, आणि पांच वाजायला आले तरी पुण्याकडची गाडी येईना तेव्हां ते अस्वस्थ झाले, व आठ दहा मिनिटांच्या अवधींत त्यांनीं मोटर एजंटला तीन चार वेळां विचारलं,

" काय सखाराम, आज गाडीला किती उशीर होणार ?"

पान-तंबाखूची पिचकारी टाकून सखारामानं प्रत्येक वेळीं उत्तर दिलं होतं, " आतां येईलच बघा इतक्यांत. आज चेकिंग आहे वाटतं, तेव्हां गाडी प्रत्येक ठिकाणीं जरा जास्ती उभी राहत येणार. पण फार लेट व्हायची नाहीं."

बापूसाहेबांच्याबरोबर माली आली होती, ती तर आतां अगदीं चुळबूळ करायला लागली होती. ती दर दोन मिनिटांनीं त्यांना विचारी, " अजून कशी येत नाहीं आपली ताई ?"

" येईल बघ, आत्तां येईल " असं ते तिला दर वेळी सांगत.

त्यांचं तें उत्तर ऐकलं, कीं मालीचं तेवढ्यापुरतं समाधान होई. व स्टॅंडवरच्या दृश्यांकडे ती आपलं लक्ष गुतवी. एका दुकानापुढं एक भिकारीं तोंडानं तबला वाजवल्यासारखा आवाज काढीत होता, जवळच एका मोटारची रिपेअर करण्यासाठीं तिचा ड्रायव्हर पुनः पुन्हा एंजिन सुरू करून त्याचा घर्रर्रर्र असा केवढा तरी आवाज होऊं देत होता, जवळच्या शाळेत मुलं मोठमोठ्यांदा परवचा म्हणत होतीं त्यांचा ' दाही दाही शंभर ', ' वीस दाही दोनशें ' असा गजर ऐकूं येत होता, आणि रस्त्याला लागून असलेल्या कडूलिंबांच्या मोठमोठाल्या झाडांपैकी एका झाडावर तीन चार पाखरांची शिवाशिव चालली होती.

पण या गोष्टींकडे मालीचं चित्त थोडा वेळच लागे. तिला ताईची पुन्हा आठवण होई व ती बापूंना विचारी, "अजून कशी नाहीं येत ताई ?"

" येईल हं, आत्तां येईल. " असं ते तिचं समाधान करीत, पण त्यांचं स्वतःचंही चित्त अस्वस्थ असे. त्यामुळें ते सखारामला विचारीत, " काय, आज काय बेत आहे तुझ्या गाडीचा ?"

अखेर साडेपांचाच्या सुमाराला मोटरचा हॉर्न ऐकू आला व सखाराम बापूसाहेबांना म्हणाला, " ती पहा आली गाडी साहेब. "

मोटर स्टॅंडवर थांबल्याबरोबर बापूसाहेब मालीला घेऊन पुढं झाले व वासंतीनं खालीं उतरतांच मालीला चटकन् जवळ घेतलं.

वासंती प्रवासानं थोडी शिणलेली दिसली; परंतु एकंदरीत तिची तब्येत पूर्वीपेक्षां सुधारली होती असं बापूसाहेबांना वाटलं, आणि ' तब्येत बरी आहे ना तुझी ?" असा प्रश्न जरी त्यांच्या तोंडाशीं आला तरी तो बदलून ते म्हणाले,

" तुझी तब्येत चांगली दिसत आहे. "

" होय. छान आहे " वासंती हसत म्हणाली.

वासंतीचं सामान खालीं उतरविलं जात होतं त्याकडे पाहून मालीनं विचारलं, " मला खाऊ आणला आहेस ?"

" तर !"

एका मोठ्या ट्रंकेकडे बोट दाखवून मालीनं विचारलं " सबंध पेटी भरून ?"

" हो. "

" उघड पाहूं. "

" वा ! इथें का उघडायची पेटी ?" असं म्हणून वासंती हसली व बापूसाहेबही हसले.

त्या ठिकाणीं पेटी उघडण्यास काय प्रत्यवाय होता तें मालीला नीटसं कळलं नाही. मग ती वाड्यावर पोंचेपर्यंत गड्याच्या डोक्यावरच्या त्या पेटीकडे सारखं लक्ष ठेवून वाट चालली होती.

गांवांत जिकडे तिकडे नेहमीपेक्षां अधिक माणसं वावरत असताना वासंतीला दिसलीं, आणि ती वाड्यांत शिरली तेव्हां पडवीवर ज्या ठिकाणी आबा कारकून बसत असत त्या ठिकाणी तर पुष्कळच कुळं जमलेलीं तिनं पाहिली. दोन दिवसांनीं दसरा होता. आबा कारकुनाच्या जवळून कुणी दोन रुपये, कुणी चार रुपये घेण्यात ते सारे शेतकरी गुंतले होते. वर्षातला तो मोठा सण साजरा करण्यासाठी त्यांची ती उमेदवारी चालली होती. दारिद्र्यांतही सण केला पाहिजे....

वासंतीच्या एकदम मनांत आलं, की ज्या दारिद्र्याच्या प्रश्नाबद्दल ती आतांसा विशेष विचार करूं लागली होती व ज्यावर तिनं अनेक पुस्तकं वाचली होतीं तो प्रश्न तिच्या या जन्मभूमीतही एका विवक्षित स्वरूपांत दिसण्यासारखा होता. तिच्या वडिलांच्या जमिनी खंडानं करणारे शेंकडों शेतकरी होते, आणि आज कित्येक वर्षे पिढ्यान्‌पिढ्या ते सगळेजण गरिबींत आणि एक प्रकारच्या दास्यातच राहिले होते. त्यांची गरिबी नाहींशी होण्यासाठीं तिच्या वडिलांची श्रीमंती नाहींशी होणं आवश्यक नव्हतं काय ? आणि या गोष्टीला तिचे वडील तयार होतील हें शक्य होतं काय ?

असले विचार मनांत चालू असल्यामुळे नंतर बापूंशीं बोलतांना एकीकडे ती जरी हसत हसत पुण्याच्या गमती सांगत होती, तरी दुसरीकडे तिला वाटत होतं, की गेल्या तीन चार महिन्यांच्या अवधींत आपल्या वृत्तींत व विचारांत जो फरक पडला आहे तो मनमोकळेपणानं आपल्या वडिलांना सांगणं कठीण आहे. त्यांच्याशी गप्पा गोष्टी करतांना मालीच्या चौकस

प्रश्नांचीं उत्तरं देतांना, गडी माणसांचं कुशल विचारतांना, आणि वाड्यांत इकडे तिकडे वावरतांना ती जरी खूप आनंदांत होती, तरी रात्रीं निजण्याच्या वेळीं ती जेव्हां एकटी राहिली तेव्हां तिला कांहींसं सुटल्या-सारखं झालं अन् बरं वाटलं. पेटींतलीं पुस्तकं काढून तिनं तीं टेबलावर मांडलीं अन् त्यातलं एक काढून घेऊन ती खिडकीजवळ बसली.

खालीं गडीमाणसं अजून वावरत होतीं. त्यांचे शब्द तिला ऐकूं येत होते. बाहेर आश्विन महिन्यांतलं चांदणं जिकडे तिकडे पसरलं होतं. आणि गांवांतल्या ठिकठिकाणच्या कडूलिंबाच्या झाडांच्या लहान लहान नाजूक फुलांतून विलक्षण मादक सुगंध बाहेर पडून वाऱ्याच्या झुळकेबरोबर त्याचा संचार सुरू झाला होता. वासंतीला आपल्या जन्मभूमींतल्या ज्या कांहीं वस्तू अत्यंत प्रिय होत्या त्यांपैकीं हा सुगंध होता, अन् कुणाजवळही आपल्या निंबोणी गांवाचं वर्णन करतांना ती नेहमीं म्हणे, " आमच्या घरीं दोन दिवस आल्याखेरीज या सुगंधाची कल्पना तुम्हांला यायची नाहीं. कितीदां तरी या सुगंधाचा आस्वाद घेत मी आपल्या खिडकीजवळ स्वस्थ बसतें, अन् मग माझ्या मनांत येतं, या सृष्टींत एक एक काय काय चमत्कार भरलेले आहेत ! "

तिचे हे उद्‌गार ऐकले, की चंद्रकांत दर वेळेस म्हणे, " तुम्ही आपल्या खोलींत बसलां आहांत, अन् तुम्ही सांगतां त्या सुगंधानं भरलेल्या मंद वायुलहरी तुमच्या अंगावरून वहात आहेत, असं चित्र मी नेहमीं डोळ्यांपुढं आणतों. "

त्याच्या त्या बोलण्याची वासंतीला आतां आठवण झाली, व तिचं लक्ष हातांतल्या पुस्तकांतून जरी अजीबात दूर झालं नाहीं तरी गेल्या चार पांच दिवसांतल्या कांहीं गोष्टींची तिला विशेष आठवण होऊं लागली.

कॉलेज सुटीसाठीं बंद झालं, त्यापूर्वीं हॉकीचा जो सामना झाला तो पाहण्यासाठीं चंद्रकांताच्या आग्रहावरून ती गेली होती. ती त्याला म्हणाली होती, " मला त्या खेळांतलं कांहींच समजत नाहीं. मला काय गोडी वाटणार सामना पाहण्यांत ? "

तो म्हणाला होता, " पण मी तुम्हांला बोलावतों तो मी आपल्या स्वार्थासाठीं. तुम्ही हजर असलां तर मला बरं वाटेल; खेळायला अधिक हुरूप येईल मला; अन् त्याचा काय नेम, तुम्ही खेळ पाहूं लागलांत कीं कदाचित् तुम्हांला त्यांत गोडीही वाटूं लागेल ! "

त्याचं म्हणणं खरं ठरलं होतं.

क्रीडांगणावरची ती अफाट गर्दी अन् विद्यार्थ्यांचा तो विलक्षण उत्साह पाहून ती अल्पावकाशांतच त्या प्रसंगाच्या आवेशाशीं समरस झाली होती. प्रथम कांहीं वेळ पुनः पुन्हा होणाऱ्या शिट्या, खेळाडूंची उलट-सुलट हालचाल, आणि प्रेक्षकांतून उठणाऱ्या सांकेतिक आरोळ्या इत्यादि गोष्टींचा अर्थ न कळल्यामुळें तिला जरा चमत्कारिक झालं, पण नंतर तो अर्थ समजून घेण्याचा प्रयत्नच जेव्हां तिनं सोडून दिला व उभय पक्षांची चाललेली झटापट तेवढी पाहण्याचं तिनं ठरविलं, तेव्हां तिला खेळांत आपोआप गोडी वाटूं लागली. विशेषतः चंद्रकांताचं नांव घेऊन कॉलेजांतले सारे विद्यार्थी एकमुखानं "Go on, shoot" अशा आरोळ्या ठोकीत, त्या वेळीं क्रीडांगणावरची चंद्रकांताची विलक्षण चपळाईची हालचाल पाहण्यांत तिला मोठी गंमत वाटली. प्रतिपक्षाच्या खेळाडूंना चुकवीत चुकवीत आपल्या हातांतल्या काठीनं पांढरा शुभ्र चेंडू पुढें नेत नेत चंद्रकांत जेव्हां जेव्हां विद्युत् गतीनं धांवत सुटे, तेव्हां तेव्हां तें पाहतांना आपल्या चित्तवृत्ति थरारल्यासारखं वासंतीला वाटे, व भोंवतालच्या ओरडयांत आपणही सामील व्हावं अशी तिला इच्छा होई. आणि अखेर खेळ संपण्याचा आधीं एक मिनिटच जेव्हां 'गोल !' असा कानठळ्या बसविणारा ओरडा झाला, तिच्या भोंवतालचे विद्यार्थी वेड्यासारखे नाचूं लागले व क्रीडांगणावर खेळाडूंनीं चंद्रकांताला घट्ट आलिंगन दिलेलं तिनं पाहिलं, तेव्हां नक्की काय घडलं हें जरी तिला कळलं नाहीं तरी चंद्रकांतानं कांहीं तरी विलक्षण पराक्रम केला येवढं तिच्या लक्षांत आलं, आणि तिनंही टाळ्या वाजविल्या, हात उंच करून रुमाल फडफडविला...

आठवणीचा धागा येथपर्यंत येतांच वासंतीनं आपल्या मनाचा तो चाळा थांबविला व हातांतलं पुस्तक एकाग्रतेनं वाचण्यास प्रारंभ केला:-

"Nothing is gained, in any discussion of communism, by treating it as a wicked doctrine.... (साम्यवादाविषयींच्या चर्चेत तो वाद म्हणजे केवळ दुष्ट लोकांनीं प्रसृत केलेलं एक तत्त्वज्ञान आहे असं समजण्यानं कसलाही फायदा होण्यासारखा नाहीं.)"

तिनं आतांपर्यंत आपली नजर किती तरी वेळ त्या वाक्यावर ठेवली होती; परंतु त्याच्या अर्थाकडे तिचं लक्ष नव्हतं. आतां मात्र तिनं केवळ ते

शद्व वाचले नाहींत तर त्यांतल्या अभिप्रायावर विचार करण्यासाठीं तिनं आपल्या चित्ताची एकाग्रता केली. हॉकीच्या मॅचनंतर ज्या गोष्टी घडल्या त्यांच्या आठवणी तिला विशेष प्रिय नव्हत्या. त्या तिनं प्रयत्नानं बंद केल्या व मग किती तरी वेळ ती पुस्तक वाचीत बसली.

मात्र ज्या आठवणी जागृत अवस्थेंत तिनं कटाक्षानं दूर ठेवल्या त्या ती अर्धवट निद्रावश झाल्यानंतर स्वप्नरूपानं तिच्यापुढें उभ्या राहिल्याच.

ती चंद्रकांताला म्हणाली होती, " काल केवढा विजय मिळवून दिलांत तुम्ही आपल्या कॉलेजला ! तुम्हांला स्वत:बद्दल केवढा अभिमान वाटत असला पाहिजे..कां, अशी का मान हालविलीत ?"

तो किंचित् हसला होता, पण त्याच्या मुखावर किंचित् दुःखाची छटा तिला दिसली होती. " स्वतःच्या पराक्रमाबद्दल स्वःतच अभिमान बाळगण्यांत मनुष्याला मोठंसं सुख होतं असं मला नाहीं वाटत. आपल्याविषयीं दुसऱ्या व्यक्तीच्या मनांत अभिमान आहे या जाणीवेंत अधिक सुख आहे, अन् त्या सुखासाठी मनुष्य धडपडत असतो."

" पण हें सुख तुम्हाला मिळालं नाही असं कसं म्हणता ? कितीजणांनीं तरी तुमचं अभिनंदन केलं असेल !"

" हो. विद्यार्थ्यांनीं मला खांद्यावर उचलून घेतलं, प्रोफेसरांनीं माझ्याशी हस्तांदोलन केलं, प्रिन्सिपलनीं माझी पाठ थोपटली, आज वृत्तपत्रांत माझी स्तुति आली तीही मी वाचली; पण–"

" पण काय ?"

" ज्या व्यक्तीचे अभिनंदनाचे दोनच शद्व मला या सर्व गोष्टींपेक्षां अधिक प्रिय वाटतात तिनं–तुम्ही माझं अभिनंदन अजून कुठं केलं आहे ?"

" वा, म्हणजे हें चांगलं कीं ! ग्राउंडवर मीं केवढ्यांदा टाळ्या वाजविल्या अन् रुमाल किती उंच उडविला तें तुम्हीं पाह्यला हवं होतं. त्या वेळीं तुमच्याभोंवतीं ती गर्दी नसती तर खचित तुमच्या हातांत हात घालून मी तुम्हांला शाबासकी दिली असती !"

" मग त्या वेळीं जें करतां आलं नाहीं तें आत्तां करायला काय हरकत आहे ?" असं म्हणून त्यानं आपला उजवा हात पुढें केला होता.

परंतु त्याच्या हातांत झटकन् हात द्यावा असं तिला वाटलं नव्हतं. जी गोष्ट सामन्याच्या वेळच्या एकंदर भावनोत्कटतेमधें तिनं सहज केली असती

ती आतां या वेळीं त्याबद्दलची सहजस्फूर्ति पार ओसरली असतांना करणं तिला कसंसंच वाटूं लागलं. पण तिनं जेव्हां वर मान करून त्याच्या चेहऱ्याकडे पाहिलं तेव्हां केवढी आर्त इच्छा त्याच्या मनांत होती तें तिला दिसलं, व मग मनाचा कठीणपणा दूर करून तिनं आपला हात त्याच्या हातीं दिला होता.

आणि दुसऱ्याच क्षणीं तिला एकदम वाटलं होतं, कीं ही गोष्ट आपण करायला नको होती.

कारण तिचा हात आपल्या हातीं अलगद घेण्याऐवजीं त्यानं तो आपल्या दोन्ही हातांत घट्ट धरला होता, व मग झटकन् वांकून त्यानं आपले ओठ तिच्या तळहातावर टेकले होते..

वासंती दचकून झोपेंतून जागी झाली. आपण निंबोणीच्या आपल्या वाड्यांतल्या आपल्या खोलींत आहोंत ही गोष्ट तिला क्षणभर खरी वाटली नाहीं. पर्वतीच्या टेकडीवर एकांत जागीं आपण व चंद्रकांत बसलों आहोंत असंच तिला वाटलं, व पुसट होत जाणाऱ्या संधिप्रकाशांत डाव्या बाजूला पर्वतीच्या पायऱ्या उतरणाऱ्या माणसांच्या आकृति, व समोर वानवडीच्या बाजूला चकाकूं लागलेले विजेचे दिवे क्षणार्धापर्यंतच—पण किती स्पष्टपणें दिसल्याचा तिला पुन्हां भास झाला.

मग कांहीं वेळ तिला कांहीं केल्या झोंप लागेना. ज्या गोष्टी मनावेगळ्या करायचं तिनं ठरविलं होतं त्यांच्या आठवणींत तिचं मन पुनः पुन्हा गुंतूं लागलं.

तिनं चंद्रकांताची निर्भत्सना एका शद्बानंही केली नव्हती. त्याचं वर्तन आपल्याला मुळींच आवडलं नाहीं हें त्याला कळावं अशी तिची इच्छा होती व त्याप्रमाणें ती वागली होती; पण नंतरच्या एक दोन वेळच्या गाठीभेटींत त्याची मुद्रा जेव्हां एखाद्या अपराध्यासारखी पस्तावलेली दिसली, तेव्हां त्याला लागेलसं बोलण्याचा तिला धीरच झाला नव्हता. मात्र त्याच्याशीं बोलतांना पूर्वींइतक्या उत्साहानं किंवा आनंदभरानं ती बोलूं शकली नव्हती. पुण्याहून ती दुपारीं निघाली तेव्हां तिला निरोप देण्यासाठीं चंद्रकांत व सुरंगा दोघंही मोटारच्या स्टँडवर आलीं होतीं. गाडींत चढून बसण्यापूर्वीं तिनं सुरंगाला घट्ट धरून म्हटलं होतं "सवड काढून चार

दिवसांसाठीं ये कीं आमच्या गांवाला !" आणि चंद्रकांतकडे पाहून ती नुसतंच म्हणाली होती, "बरं."

त्यानं हंसून विचारलं होतं "मला नाही का आमंत्रण ?"

त्याचं तें विचारणं विनोदाचं वाटून सुरंगा हसली होती. पण त्याच्या शब्दांत दीनवाणेपणा किती होता तें वासंतीला समजलं होतं. "तें कां ! तुम्ही सुद्धां या कीं." असं म्हणावंसं तिला वाटलं होतं; पण तितक्यांत मोटार चालू झाली होती व तिच्या तोंडावर आलेले ते शब्द तसेच राहिले होते.

मग मोटारमधून प्रवास करताना सान्या वाटभर चंद्रकांताविषयींच ती विचार करीत राहिली होती.

आणि आता मध्यरात्री स्वप्नातून दचकून उठल्यावर तिच्या त्याच विचारांची पुनरावृत्ति होऊं लागली.

✿ ✿ ✿

दुसऱ्या दिवसापासून वासंतीचं आपल्या खेड्यावरचं आयुष्य सुरू झालं. दुपारचा व रात्रीचा बहुतेक वेळ ती वाचनांत घालवी, आणि सकाळ-संध्याकाळ ती मन मानेल तिकडे आणखी लहर लागेल तितकं भटकत राही. एकादे वेळीं बापूसाहेब तिच्याबरोबर असत; पण बहुधा ती एकटीच असे. शेतांची कापणी तुरळक कोठें झाली होती, तरी जमिनी उजाड दिसत नव्हत्या. लहान मोठ्या झाडांवर पर्णराजी भरपूर दिसत होती आणि डोंगरमाथ्यावर-सुद्धां गवत भरगच्च माजलं होतं. पुष्कळदां ती एखाद्या शेतकऱ्याच्या खोपटांत शिरे, आणि आपल्या धनीसाहेबांची मुलगी आपल्या घरीं आलेली पाहून शेतकरी व त्याची बायको ज्या अकृत्रिम आनंदानं स्वागताची धांदल करीत ती पाहून तिला तिथें पुष्कळ वेळ बसावंसं वाटे. शेतकऱ्याच्या एखाद्या छोट्या मुलाकडे बोट दाखवून ती विचारी,

"हा मोठा झाला कीं काय करणार आहे ?"

शेतकरी म्हणे, "आम्ही आमच्या हयातभर तुमची जमीन करून तुमच्या कृपेवर जगलों. आमची मुलेंही हेंच करणार."

"कां ? त्याला शिकवून सवरून मोठा कर की. तो श्रीमंत व्हावा असं नाहीं तुला वाटत ?"

"असं श्रीमंत व्हायचं म्हटल्यानं होता येतं ताईसाहेब ? देवानं आम्हांला गरिबीत जन्म दिला तेव्हां गरिबीच लई ब्येस मानली पाहिजे आम्हीं."

असलीं उत्तरं ऐकलीं, कीं वासंतीला वाईट वाटे. शेतकऱ्यांत मिसळून त्यांना कांहीं गोष्टी शिकविण्याचा ती प्रयत्न करी तेव्हां तेव्हां त्यांचं अज्ञान पाहून तिच्या मनाला मोठा धक्का बसे. बापूसाहेबांच्या जमिनी आपण करतों, ते आपल्याला ममतेनं वागवितात, तेव्हां त्यांच्यावर निष्ठा ठेविली आणि त्यांच्याशीं इमानदारी राखली, कीं आपल्या स्वतःच्या कल्याणाचा अगर आपल्या मुलाबाळांच्या भवितव्याचा कसलाही विचार करण्याच आपल्याला कारण नाहीं अशा समजुतीन तीं सारीं भोळीं माणसं निर्धास्त होतीं. पिक चांगली आलीं, देवाची मर्जी: पिक बुडाली, देवाचा कोप; येवढच त्यांना कळत होत. आणि आपल्या वाईट दिवसांत आपले धनी बापूसाहेब आपल्याला संभाळून घेतील ही खात्री त्यांच्या निश्चिंतपणाला पुरेशी होती. गांधींचं नांव बायकापोरांनाही माहीत होतं; पण गांधी जिवंत आहेत कीं मेले आहेत हें त्यांना ठाऊक नव्हत. गेल्या निवडणुकींत त्या टापूंतल्या साऱ्या शेतकऱ्यांनी शृंगारलेल्या बैलगाड्यांत वाजतगाजत जाऊन काँग्रेसच्या उमेदवारांना मतं दिलीं होतीं. परंतु काँग्रेस म्हणजे काय याची त्यांना पुसटसुद्धां कल्पना नव्हती. आपण परकीय सत्तेच्या अमलाखालीं आहोत ह्याची त्यांना यत्किंचितसुद्धां जाणीव नव्हती; मग स्वराज्याचा अर्थ त्यांना कुठून कळणार ? आणि कसा ? तो या खेड्यापाड्यांपासून आणखी किती वर्षं दूरच राहणार होतो कोण जाणं ! . .

तिनं एके दिवशीं आपल्या वडिलांना विचारलं, "मी सुटींत इथं आहे तवर एक शाळा चालवून पाह्यची आहे मला."

ते म्हणाले, "शाळा ? आहे तिच्यातच मुलं पुरतीं येईनात, आणखी तू कसली काढणार नवीन शाळा ?"

"मी शाळा काढणार ती मुलांसाठीं नव्हे. मोठ्या बायकापुरुषांसाठी रात्रीचा वर्ग काढणार आहे मी."

"लिहिण्या-वाचण्यावांचून त्यांचं फार अडतं अशी तुझी कपलना आहे वाटतं ?"

"त्यांना मी नुसतं लिहावाचायला शिकवणार नाहीं. भोंवतालच्या परिस्थितीची समजूत त्यांना देतां आली तर देणार आहे."

" बापूसाहेब हसले. "म्हणजे ग्रामोद्धार का काय म्हणतात अलीकडे, तें करणार आहेस होय तू ?"

" मी जें करणार आहे त्याला नांव द्यायच्या भानगडींत मला पडायचं नाहीं. पण आपल्या शेतकऱ्यांचं अज्ञान मला पहावत नाहीं. अन् तें घालविण्याच्या उद्योगाचा प्रारंभ मला करतां आला तर करून पाहणार आहे मी."

बापूसाहेबांना तिची कल्पना जरी फारशी पटली नाहीं तरी तिला जेवढं म्हणून साहाय्य करतां येण्यासारखं होतं तेवढं त्यांनीं लगेच केलं. गांवाच्या सीमेवरच्या देवळांतला एक मोठा सोपा त्यांनीं सुसज्ज करून दिला, आणि पूर्णिमेच्या मुहूर्तावर वासंतीची छोटीशी रात्रीची शाळा सुरू झाली. वासंतीला या बाबतींतला कांहींच अनुभव नव्हता. परंतु, शेतकऱ्यांना आणि त्यांच्या बायकांना केवळ साक्षरच नव्हे, तर जागृत करण्याची तिच्या ठिकाणी तळमळ होती. तिच्या अंगचा वक्तृत्वाचा गुण तिच्या पुष्कळच उपयोगी पडूं लागला. ती रोज रात्रीं प्रथम अर्धा तास वर्गांत जमणाऱ्या स्त्रीपुरुषांना लिहिण्यावाचण्याचे धडे देई व नंतर पंधरावीस मिनिटं त्यांना लहानसं सुबोध व्याख्यान देई. आपल्या एकंदर देशाचं राज्ययंत्र कसं चालतं, त्याचीं चक्रं प्रांतांत, जिल्ह्यांत, आणि तालुक्यांत कशीं फिरतात, त्या पद्धतीमुळें गरीब व श्रीमंत हे भेद कसे कायम राहतात, व ते नष्ट होणं कितपत शक्य आहे, इत्यादि गोष्टी त्या लोकांना समजावून सांगण्याचं तिनं ठरविलं होतं ; आणि चार सहा दिवस तो उपक्रम केल्यावर तिला वाटलं, आपण जे करीत आहों तें चुकत नाहीं

सातव्या दिवशी देवळाचा तो सबंध सोपा शेतकऱ्यांनी व त्यांच्या बायकांनी भरून गेला होता व त्याच सुमारास पुण्यास झालेल्या शेतकऱ्यांच्या मोर्च्याची हकीकत जेव्हां तिनं समजावून सांगितली तेव्हा आपल्या अगदीं जिव्हाळ्याची कांहीं तरी गोष्ट आपण ऐकत आहोंत असा भाव त्या सर्वांच्या मुद्रेवर पाहून तिला फार आनंद झाला होता.

वाड्यावर परत येतांना ती मनाशीं म्हणत होती, "हा माझा प्रयत्न जर असाच यशस्वी होत गेला तर..."

पण तितक्यांत समोरून तिच्या घरचा म्हातारा गडी लगबगीनं आलेला तिला दिसला व "काय रे ? " असं तिनं विचारतांच तो म्हणाला,

" मघांधरून एक पाव्हणं घरी अल्यातीं. तुम्हांला लै येळ लागला तवा बापूसाहेब म्हणाल बोलवाया जा."

"पाहुणे आले आहेत ? कोण रे ? मुंबईच्या मावशी तर नाहीं आल्या ?"

"वा ! त्येसनी मी वळकीत न्हाई व्हय ? "

"तुझ्या ओळखीचे नाहींत पाहुणे ?"

"माझ्याच काय, बापूसाहेबांच्याबी वळकीच न्हाईत."

"खरं म्हणतोस ?" असं उद्गारून वासंती त्याच्या मागोमाग झपाझप पावलं टाकूं लागली.

घरांतल्या कुणाच माणसाच्या ओळखीचे नसलेले हे कोण पाहुणे असावेत याचा ती मनांतल्या मनांत विचार करीत होती. तिला एकदां वाटलं चंपा आणि तिचा मुकुंद तर आला नसेल ? छे ! तीं दोघं कशाला येतील ? पण मग कोण ? असा विचार करीत ती अतिशय उत्सुकतेनं वाड्यांतल्या पायऱ्या चढून आंतल्या चौकांत गेली.

आणि सोप्यांतल्या एका खुर्चीवर जी व्यक्ति बसलेली तिला दिसली तिच्याकडे पाहतांच तिला विलक्षण विस्मय वाटला.

चंद्रकांत आपल्या घरीं असा येईल असं तिच्या ध्यानींमनींही नव्हतं; उलट आतां सुटी संपेपर्यंत त्याची आपली गाठ पडणार नाहीं व त्यानं केलेल्या अविचाराच्या वर्तनाचा उभयतांनाही विसर पडायला या काला-वधीचा उपयोग होईल असं ती आपल्या मनाशीं म्हणत होती.

आणि तो आतां अकस्मात् तिच्या घरीं आला होता !

त्याचं स्वागत करण्यासाठीं ती जरी हसली तरी त्यानं असं यायला नको होतं असाच विचार तिच्या मनांत त्या क्षणीं होता.

तिचं हास्य पाहून चंद्रकांताला बरं वाटलं असावं. आपल्या येण्यानं तिला कदाचित् जें आश्चर्य वाटलं असेल तें नाहींसं करण्यासाठीं तो आपल्या जागेवरून उठल्याबरोबर म्हणाला, "कांहीं कामासाठीं कोल्हापूरला गेलों होतों. परत जातांना म्हटलं तुमचं निवोगी गांव कसं आहे पाहावं तरी !"

पण खरं म्हणजे तो कोल्हापूरला मुळींच गेला नव्हता. वासंतीचा वियोग त्याला सहन करवेना म्हणून कांहीं एक विचार न करता तो सरळ इकडे निघून आला होता. त्यानं मनाशीं काय ठरविलं होतं तें त्याचं त्याला माहीत !

# ७

गाडींतली फ्रंट सीट रिकामी नव्हती. परंतु त्या जागेवर बसलेला इसम बापूसाहेबांच्या ओळखीचा निघाला. "आपले पाहुणे जायचे आहेत होय ?" असं म्हणून त्यानं तत्परतेनं उठून जागा खाली करून दिली, व मग जणू आपण आपल्या मर्यादेबाहेर जाऊन चौकशी करीत आहोंत याची जाणीव आपल्याला आहे असं दर्शविणाऱ्या स्वरानं त्यानं विचारलं, "केव्हां आले होते पाहुणे ?"

हें विचारतांना त्यानं आपली नजर म्हटलं तर बापूसाहेबांच्याकडे म्हटलं तर चंद्रकांताकडे ठेवली होती, अन् दोघांपैकीं कुणीही उत्तर दिलं तरी चालेल असंच जणू त्याला सुचवायचं होतं. पण चंद्रकांत बोलला नाहीं. बापूसाहेब म्हणाले,

"गेल्या शुक्रवारीं आले ; पण शनिवारींच मला शेतावर जावं लागलं, अन् आज सकाळीं परत येतों तों पाहुणे परत जाणार असं कळलं. म्हणजे त्यांचं आदरातिथ्य करण्याची माझी स्वतःची हौस तशीच राहिली. त्यांना पुष्कळ आग्रह केला मीं राहा राहा म्हणून ; पण माझं न ऐकतां ते निघाले आहेत."

"वा वा ; हें कांहीं चांगलं नाहीं बरं का पाहुणे !" तो इसम विनोदानं म्हणाला, "बाकी काम असलं म्हणजे जावंच लागतं माणसाला."

चंद्रकांतानं कांही तरी बोलावं, निदान हसावं अशी त्याची अपेक्षा दिसली; परंतु त्यानं तसं कांहींच केलं नाहीं. किंबहुना आज सकाळपासून बापूसाहेबांनीं लक्षपूर्वक पाहिलं तों त्यांना वाटलं होतं की, चंद्रकांत अगदीं थोडं बोलत आहे. पण त्याचा स्वभावच तसा असेल असं ते समजून चालले होते ; व त्याला निरोप द्यायला म्हणून ते वाड्यापासून मोटारस्टँडपर्यंत त्याच्या बरोबर चालत आले तेव्हां साहजिकपणेंच तो इतक्या लवकर परत जात आहे याबद्दल आपल्याला किती वाईट वाटतं, व तो आणखी राहिला असता तर आपल्याला किती आनंद झाला असता इत्यादि गोष्टीच ते पुनः पुन्हा बोलून दाखवित होते.

परंतु त्यांचीं तीं सौजन्याचीं बोलणीं चंद्रकांताला विटंबनेसारखीं वाटत होतीं. कारण ज्या प्रसंगानं त्यानं वासंतीचा अमर्याद राग आपल्यावर ओढ-

वून घतला होता तो घडल्याला अजून पुरते चोवीस तासही झाले नव्हते व तिचे निर्वाणीचे अधिक्षेपाचे शद्ब त्याच्या कानांत अजून घुमत होते. आपली प्रीति मर्यादित ठेवणं व तिचं खरं वासनात्मक स्वरूप गुप्त ठेवणं अशक्य वाटलं म्हणून तो निंबोणीला आला होता, व अधिक मिळविण्याच्या प्रयत्नांत तिच्यापासून जो मित्र–भाव त्याला लाभला तोही गमावून तो आतां परत निघाला होता. त्याची व वासंतीची आतां पुन्हा कधीं गाठ-भेट होणार नव्हती. अशा मन:स्थितींत असतांना बापूसाहेबांचीं गोड बोलणीं त्याला विटंबनेसारखीं वाटल्यावांचून कशीं राहतील ? त्यानं आपली मुद्रा शक्य तितकी नीट ठेवली होती, परंतु उल्हासानं उत्तरं प्रत्युत्तरं करणं त्या घटकेला त्याच्या शक्तीच्या बाहेरचं होतं.

मोटर निघायची वेळ झाली तेव्हां बापूसाहेबांनीं त्याला म्हटलं, "आतां पुन्हा लवकर यायला पाहिजे बरं का."

चंद्रकांतानं नुसती हनुवटी हालविली.

"नाताळांत या. अं ? मग आपण शिकारीला जाऊं. हरणांची शिकार पुष्कळ आहे या भागांत. शिवाय त्या सुमाराला कुठें कुठें गुऱ्हाळंही चालू राहतात. या, अवश्य या. वासंती करीलच तुम्हांला आग्रह ; पण मीही बजावून ठेवतों. आलंच पाहिजे बरं का. काय ? "

"येईन ना." असं उत्तर देतांना चंद्रकांतानं मोठ्या प्रयत्नानं हास्य केलं.

मोटारचं एंजिन सुरू झालं तेव्हां बापूसाहेब दोनचार पावलं मागं सरकले, अन् मग ते काय म्हणाले तें चंद्रकांताला नीट ऐकू आलं नाहीं. त्यानं नमस्कार केला व 'गुड् बाय' म्हटलं, तेवढ्यांत गाडी पाचपंचवीस यार्ड सरकलीसुद्धां. आपले दोन्ही हात एकमेकांवर आडवे धरून मागच्या अरुंद लाकडी पाठीवर अंग टेकून तो डाव्या हाताच्या खिडकींतून बाहेर पाहूं लागला. बाजारपेठेंतलीं दुकानं झराझर मागं सरकलीं, नंतर कचेरीची इमारत गेली, पलीकडे तलाव दिसला, देवळाचा कळस चमकला, मग डोंगराच्या उतरणीवर चरणारीं गुरं दिसलीं, टेकडीच्या माथ्यावरचं तें एकच एक झाड डोळ्यांपुढून गेलं, आणि अखेर दहावीस झोपड्यांचा एक वाकडा तिकडा घोळका कांहीं वेळ दिसत राहिला. मग निंबोणीची हद्द संपली, आणि जणूं कांहीं हा विचार करूनच मोटार अधिक वेगात रस्त्यानं निघाली. चंद्रकांत मनाशीं म्हणाला, "गुड् बाय !" आतां पुन्हा तो कधीं या प्रांतांत येणार नव्हता. त्यानं वासंतीचा अखेरचा निरोप घेतला होता !....

त्यानं डोळे मिटून घेतले व स्वतःला प्रश्न केला, असं जावं लागत आहे म्हणून मला दुःख होत आहे काय ?...

त्यानं आपली मनःस्थिति नीट तपासून पाहिली, परंतु दुःखाचा प्रहार झाल्यावर मनाची जी असहाय अवस्था होते ती आपली झाली आहे असं त्याला वाटेना.

याचं कारण कदाचित् असं असेल कीं, आपण ज्या तऱ्हेनं वागलों तिच्यांत आपलं कांहीं एक चुकलं नाहीं अशी त्याची खात्री होती. वासंतीची भेट आतां पुन्हा कधीं होणार नाहीं या जाणीवेची चुटपुट त्याच्या मनाला लागल्यावांचून कशी राहील ? परंतु आपल्या वर्तनाचा कदाचित् असा शेवट होईल हें ओळखून तो निंबोणीला आला होता हें एक, व शिवाय आपल्याला हवं तसं प्रेम तिच्याकडून मिळत नसेल तर तिचा मित्र-भावदेखील न मिळाला तरी चालेल असं मानण्यापर्यंत त्याच्या वृत्तीचा हट्ट गेल्या कांहीं दिवसांत पोंचला होता हें दुसरं. त्यानं आपल्या मनाला पुष्कळ आवरून पाहिलं होतं. तिच्या शुद्ध मैत्रीवर आपल्या मनाचं समाधान आपल्याला करतां येईल अशी आशा त्यानं पुष्कळ दिवस बाळगली होती. परंतु हा प्रयत्न त्यानं जों जों केला तों तों त्याची व्यर्थताच त्याला समजून आली होती. वासंती सतत आपल्या दृष्टीला दिसावी, तिच्यावर आपलं कशा प्रकारचं प्रेम आहे तें सांगण्यात कसलंही बंधन नसावं असं त्याला अधिकाधिक वाटत गेलं होतं. उत्कट प्रीति किती मत्सरी असते याचाही अनुभव त्याला वारंवार येऊं लागला होता. वाचनाच्या निमित्तानं कॉलेजांतल्या दोनचार कम्यूनिस्ट विद्यार्थ्यांमध्यें ती मिसळूं लागलेली पाहून त्याला मत्सराचे फणकारे बसूं लागले होते. आणि सर्वांत महत्त्वाची गोष्ट अशी, कीं आपल्या वासनात्मक प्रेमाचा अव्हेर वासंतीनं काय म्हणून करावा तें त्याला कांहीं केल्या कळेनासं झालं होतं. वासंती ज्या प्रकारच्या स्नेहाची त्याच्याकडून अपेक्षा करीत होती त्याबद्दल विचार करतांना तो स्वतःशीं पुष्कळ वेळां आश्चर्य करी, वासनेच्या अंशसुद्धां ज्यांत नाहीं असं आकर्षण पुरुषाला स्त्रीविषयीं वाटणं संभवनीय आहे काय ? असा संभव मानायला त्याच्या मनाची तयारी होत नसे. कारण, त्याचा स्वतःचा वासंतीबद्दलचा अनुभव फार वेगळा होता. तिच्या बुद्धीचे गुण पाहून त्याच्या मनाला मोह पडे, व तिचं लावण्य पाहून त्याच्या भावना उचंबळून येत; आणि या दोन्ही गोष्टींची उत्कटता एकमेकींत इतकी मिसळलेली असे, कीं एक दुसरीपासून

अलग ठेवणं त्याला अशक्य वाटे. आपल्या प्रेमाचा वासंतीवर जुलूम करणं शक्य नाहीं हें त्याला समजत होतं. प्रेम अट्टाहासानं उत्पन्न करतां येत नाहीं येवढी साधी गोष्ट त्याला खचित माहीत होती. परंतु, आपल्या मनांत उद्‌भवलेलं प्रेम आपल्याला जर अनावर वाटत असेल, तर तें स्वच्छ सांगून टाकण्यांत आपल्या हातून तिचा कांहीं अपराध घडेल असं त्याला वाटेना. आणि म्हणूनच स्वतःच्या वृत्तीचा अधिक कोंडमारा करण्यांत अर्थ नाहीं असं जेंव्हां त्याला पटलं तेव्हां तो तिच्या भेटीसाठीं निंबोणीला आला होता.

सारांश, आतां परत जातांना आपण जें केलं तें करायला नको होतं अशा पश्चात्तापाचा त्रास त्याला होत नव्हता. वासन्तीचे व आपले ऋणानु-बंध कायमचे तुटले याचं त्याला दुःख वाटत होतं; पण तें अल्प होतं. जी ताटातूट आतां झाली ती केव्हां तरी होणं जर अनिवार्यच होतं, तर ती आज झाली हें एक प्रकारें बरंच झालं होतं. जो प्रयोग अशक्य होता तो संपला होता. त्यानं तिला दुखविलं नव्हतं. ज्याची जन्मभर शरम वाटावी असं त्यानं कांहीं केलं नव्हतं. आज पहाटेच्या प्रहरीं तो तिच्या खोलींत शिरल्यानंतर जो प्रसंग घडला, व ज्यामुळें वासंतीच्या घरीं अधिक राहणं त्याला अशक्य झालं त्या प्रसंगाच्या आठवणीनं देखील त्याला शरमल्यासारखं वाटेना. त्याच्या त्या वेळच्या वर्तनानं वासन्ती चकित झाली असली, संता-पली असली, व तिचा विस्मय आणि संताप तिच्या दृष्टीनं साहजिक असला, तरी त्यानं जी गोष्ट केली ती एकाद्या पापकृत्यासारखी होती काय ?

तो तिच्या खोलींत गेला त्यावेळच्या स्वतःच्या मनांतल्या भावना त्याला अजूनही आठवत होत्या. तो झोपेंतून एकदम कसा जागा झाला कोण जाणे! परंतु जागा झाल्यावर त्याला कांही केल्या पुन्हा झोप लागेना. पूर्वेकडच्या खिडकींतून चंद्राची कोर त्याला दिसली होती, व तो मनाशीं म्हणाला होता पहाट झाली असावी. वाड्यांत कसलीही चाहूल नव्हती. मागच्या अंगणा-कडल्या गोठ्यांतल्या गुरांनीं पुढ्यांतल्या कडब्याची चाळवाचाळव केल्याचा आवाज मध्येंच ऐकू येत होता. खिडकीपलीकडच्या कौलारावर मध्येंच पावलं वाजलीं, व मांजरांचीं गुरगुरणीं ऐकू आलीं. त्यांच्या प्रियाराधनाच्या विचित्र रीतीचा विचार मनांत येऊन तो स्वतःशींच थोडा हसला होता. मग कौलावरची ती धावपळ अजीबात बंद झाली होती, व पुन्हा जिकडे तिकडे सामसूम झालं होतं. चंद्राची कोर आतां खिडकीच्या वरच्या रेषे-पाशीं टेकली होती, व तिच्यावर थोडी पांढुरता आल्याचा भास होत होता,

वाऱ्याचा स्पर्श अधिक थंड होऊं लागला होता. आणि कडूनिंबाच्या सुगंधाची तीव्रता मंदावली होती...

तो किती तरी वेळ अगदीं उघड्या टक्क डोळ्यांनीं अंथरुणावर तसाच पडून राहिला होता...

आणि मग तो एकदम उठून उभा राहिला होता व त्याचीं पावलं दाराकडे वळलीं होती...

दिवाणखान्यांतून पलीकडच्या भागांत जातांना जमिनीवरच्या जाजमाच्या एका भोकांत त्याचा पाय अडखळला तेव्हां त्यानं भिंतीवरची खुंटी चटकन् पकडली होती, व त्या खुंटीवरची कांहीं तरीं जड वस्तु हिंदकळून तिचा मोठ्यांदा आवाज झाला होता. त्या क्षणीं त्याला वाटलं होतं परत आपल्या अंथरुणाकडे जावं. क्षणभर तो जागच्या जागीं उभा राहिला होता. चांदण्याच्या अगदीं पुसट प्रकाशांत दिवाणखान्यांतले शिशवीचे खांब, भिंतींना लावलेलीं वन्य पशूंची मुंडकीं, अन् लहानमोठ्या तसबिरी यांचं दृश्य त्याला मोठं चमत्कारिक वाटलं होतं. आणि तेवढ्यांत मनांतला विचार पालटून तो वासन्तीच्या खोलीकडे गेला होता. आपल्या मनांत कोणताही अशुद्ध संकेत नाही याची त्याला खात्री होती. मात्र, आपण अशा अवेळीं वासंतीच्या खोलीकडे कुठल्या प्रेरणेनं ओढले जात आहोंत हें त्याला नीटसं कळत नव्हतं. त्याची छाती धडधडत होती, परंतु ती पापाच्या जाणीवेनं नव्हे, तर त्या क्षणीच्या प्रेरणेचं स्वरूप त्याचं त्यालाच नीटसं कळत नव्हतं म्हणून...

तो जेव्हां अगदीं अलगद पा[illegible] पावलं टाकून वासंतीच्या शय्येजवळ जाऊन उभा राहिला होता, आणि निद्रावश झालेल्या तिच्या देहाच्या लावण्याची पहाटेच्या त्या अस्पष्ट प्रकाशांत ती स्वप्नतुल्य शोभा दिसत होती तिच्याकडे अतृप्त दृष्टीनं जेव्हां त्यानं बराच वेळ पाहिलं होतं तेव्हां—

रस्त्यांत मोटार इतकी वाकडीतिकडी हिंदकळली, की साऱ्या उतारूंनीं आरोळ्या ठोकल्या. चंद्रकांतलाही इतका मोठा हिसका बसला कीं तो जोरानं पुढें कलंडला त्या वेळी त्याचं डोकं पुढच्या काचेवर कसं आपटलं नाही याचं त्याचं त्यालाच आश्चर्य वाटलं !

रस्त्यांत एक गाय आडवी आली होती, व तिला चुकविण्यासाठीं ड्रायव्हरनं असे वळसे घेतले होते. हा प्रकार तो उतारूंना समजून सांगतो न

सांगतो तोंच मुक्कामाचा टप्पा आला, व गाडी स्टँडवर शिरून उभी राहिली. ज्या इसमानं फ्रंट सीट खाली करून दिली होती तो चंद्रकांता-जवळ आला व म्हणाला, " काय, चहाबिही घेणार का ?"

" नको " असं म्हणून चंद्रकांत खालीं न उतरतां आपल्या जागेवरच बसून राहिला. मात्र आठवणींचा चाळा मन पुन्हा करूं लागतांच त्यानं आपल्या मनाला निश्चयानं रोखलं, " No! Good-bye Vasanti!" ..." Good-bye love !"...आतां तो वासंतीला फक्त अखेरचं एक पत्र पाठविणार होता, आणि मग सारं संपणार होतं !

  

पाव्हण्यांना निरोप देऊन बापूसाहेब परत वाड्यावर आले ते ' ताई, ताई ' अशा हाका मारीतच वरच्या दिवाणखान्याकडे गेले. आपण पाहुण्यांना नाताळांत या म्हणून कसा आग्रह केला, व त्यांनीं आपलं निमंत्रण कसं स्वीकारलं इत्यादि गोष्टी तिला सांगण्याची त्यांना घाई झाली होती.

पण त्यांच्या हाकेला वासन्तीचं उलट उत्तर तर आलं नाहींच; पण ते तिच्या खोलीजवळ गेले तो तिनं दाराला आंतून कडी लावली होती असं त्यांना आढळून आलं. ती विश्रांतीसाठीं पडली असली तर तिला कशाला त्रास द्या अशा विचारानं त्यांनीं मग तिला अधिक हाका मारल्या नाहींत.

त्यांच्या हाका ऐकू आल्या असत्या तर वासंतीनं ओ देऊन दार उघडलं असतं कीं नाहीं कोण जाणे ! परंतु तिला त्या मुळीं ऐकूंच आल्या नाहींत. ती आपल्या विचारांत इतकी मग्न झाली होती, कीं भोंवतालच्या गोष्टींचं भानच तिला बिलकुल उरलं नव्हतं.

चमत्कार असा कीं वासंतीला कायमचं सोडून जाण्यांत चंद्रकांताला मनस्वी दुःख होण्याऐवजीं त्यानं तशा वियोगाची वेळ ओढून आणली म्हणून वासंतीलाच अगदीं मर्मावर घाव बसल्याप्रमाणें दुःख झालं. याचं मुख्य कारण असं, कीं पुरुषानं ज्या प्रकारचं प्रेम स्त्रीवर करावं असं तिला वाटत होतं तें त्याच्याकडून आपल्याला सतत मिळेल अशी अपेक्षा ती करूं लागली होती. मुंबईस अशोकच्या बाबतींत तिला जो अनुभव आला होता याहून निराळा अनुभव चंद्रकांतांच्या मित्रभावापासून मिळेल असं तिला वाटूं लागलं होतं. ज्या स्त्रीवर प्रेम करायचं तिच्याबद्दल शारीरिक वासना पुरुषाला दूर ठेवतां येणं अशक्यच आहे काय ? या प्रश्नाचा आज कित्येक

महिने ती सारखा विचार करीत होती. कोणत्याही पुरुषाशीं आपले निकट संबंध आले कीं, त्याच्या ठिकाणीं आपल्या स्वरूपसौंदर्याविषयींची आसक्ति उत्पन्न होणं अनिवार्यच आहे काय ? अशोकच्या बाबतींत ती अनिवार्य ठरली होती ! चंद्रकांताच्या बाबतींत ती तशी ठरणार नाहीं अशी दृढ आशा तिनं धरली होती. मुंबईस न जातां ती पुण्याला गेली तेव्हां यापुढें पुरुषाचा सहवास टाळावा असा तिनं आपल्या मनाशीं निश्चय केला होता. पण, योगायोगानं चंद्रकांताशीं झालेला तिचा परिचय जसजसा वाढत गेला तसतसा तिचा हा निश्चय पालटूं लागला होता, व पुरुषाच्या ठिकाणीं वासनातीत प्रेम आपण उत्पन्न करूं शकूं अन् त्याच्या उपभोगाचा आनंद आपण घेऊं शकूं असं तिला अधिकाअधिक वाटत गेलं होतं...

परंतु, मनांत दृढ होत गेलेली ही तिची नवी आशा आतां अकस्मात् पार उन्मळून नष्ट झाली होती, अन् या प्रकाराचं जें दुःख तिला झालं तें असह्य होत.

त्या दिवशीं रात्रीं तो अकस्मात् आपल्या घरीं आलेला पाहूनच ती मनांतल्या मनांत चरकली होती. तथापि, आपली भीति व्यर्थ आहे असं तिनं आपल्या मनाला पुनः पुन्हा सांगितलें होत. हॉकीच्या मॅचच्या दुसऱ्या दिवशीं पर्वतीच्या टेकडीवर त्यानं तिच्या हाताच चुंबन घेतल त्याबद्दलची नापसंती शब्दांनीं नव्हे पण वर्तनानं तिनं दर्शविली ती त्यानं ओळखली असली पाहिजे असा तिचा तर्क होता. शिवाय, तो निंबोणीस आल्यानंतर चार पांच दिवसांत खोलींत बसून बोलतांना अगर शेतवाडींतून हिंडतांना त्याच्या भाषणांत जेव्हां जेव्हां तो मर्यादा सोडीत आहेसं तिला वाटलं तेव्हां त्याच्यापासून कोणत्या स्वरूपाच्या भावनांची आपण अपेक्षा करतों तें तिनं त्याला स्पष्ट शब्दांत सांगितलं होतं.

काल संध्याकाळीं पुष्कळ लांब फिरून परत येतांना तीं दोघं जेव्हां विसांव्यासाठीं तलावाच्या कांठीं थांबलीं तेव्हां ती मुद्दाम त्याच्यापासून कांहींशी दूरच बसली होती. चंद्रकांत मनांतल्या मनांत बराच अस्वस्थ असावा अशी शंका तिला दिवसभर येत होती. परंतु, तो तिच्याशीं उत्साहानं बोलत होता. आपल्या क्रीडापटुत्वाचा आपल्याला किती फायदा होण्यासारखा आहे त्याचं तो पुनःपुन्हा वर्णन करीत होता.

" खेळांत आणखी प्रगति करतां यावी म्हणून पुढच्या वर्षीं मुंबईला जाऊन राहणार आहे मी. तिथें जाऊन खेळल्याशिवाय मनुष्य लोकांच्या नजरेंत

भरत नाही. महाराष्ट्रातर्फे खेळण्याची संधी मला यंदाच मिळेल. परंतु तेवढ्यानं माझं समाधान होणार नाहीं. अखिल भारतीय संघाकडून खेळायला मिळेल तेव्हांच माझं खरं समाधान होईल. मला वाटतं मी फार महत्वाकांक्षी आहे. माझ्या हातावर ही मोठी उभी रेघ आहे ना, हिच्यामुळें मनुष्य मिळेल त्यांत समाधान मानीत नाही आणि स्वतःला मनानं दुःखी करून घेतो. तशीच ही मध्येंच तुटलेली आडवी रेघ---"

पुढें बोलण्याऐवजीं तो आपल्या तळहाताकडे निरखून पाहत स्तब्ध राहिला.

वासंती हसून म्हणाली, "वा! हस्तसामुद्रिक बरंच कळतं वाटतं?"

"होय. मला फार पूर्वीपासून हा नाद आहे. तुमच्या हाताकडे दुरून पाहतांना किती तरी गोष्टी माझ्या ध्यानांत आल्या आहेत. विशेषतः शनीचा उंचवटा—दाखवूं तुम्हाला? करा पाहूं हात इकडे."

तो सरकून तिच्याजवळ आला होता, व एकमेनात गुतविलेले आणि गुढग्यावर टेकलेले आपले हात तिनं सोडविले नाहींत तेव्हां तो हसत म्हणाला होता, "पाहूं."

"नको."

"कां?"

त्याच्याकडे निश्चल नजरेनं पाहत ती म्हणाली होती, "पर्वतीच्या टेकडीवर माझा हात धरून तुम्ही जो अविचार केलात तो मी अजून विसरलें नाहीं."

तें ऐकतांच तो एकदम गप्प झाला होता, किंचित् मागेंही सरकला होता, आणि मग तिच्याकडे पाहण्याऐवजीं तलावाच्या पाण्याकडे दृष्टि लावून त्यानं म्हटलं होतं, "तुमच्या या भीतीचा मला अर्थच कळत नाहीं!"

यावर तिनं आपल्या मनाची वृत्ति शक्य तितकी स्पष्ट करून त्याला सांगितली होती; त्याची मैत्री तिला किती हवीशी वाटत होती, व तिचं शुद्ध सात्विक स्वरूप कायम ठेवणं त्याच्या हातीं कसं होतं याबद्दलही ती पुष्कळ वेळ बोलत राहिली होती.

अंधार पडूं लागला तेव्हां उठून वाड्याकडे परततांना तो अगदी स्तब्ध होता. परंतु, त्याच्या त्या स्तब्धतेचा वासंतीला खेद वाटला नव्हता. उलट तिचा अर्थ ती मनाशीं असा करीत होती, की आपलं बोलणं त्याला थोडं

तरी पटलं असेल, अन् स्वतःच्या मनांतले विकार कसे घालवावे याचाच विचार तो करीत असेल.

त्यामुळें ती रात्री झोपी गेली होती ती बऱ्याचशा निर्धास्त मनानं.

पहाटे ती एकदम कशी जागी झाली कुणास ठाऊक! पण, तिनं डोळे उघडले तों पलंगाच्या अगदीं जवळ तिला एक आकृति दिसली; आणि ती आकृति चंद्रकांताची आहे हें लक्षांत येतांच तिच्या पोटांत धस्स झालं. ती एकदम उठून बसली, व विलक्षण विस्मयानं आणि संतापानं त्याच्याकडे पाहतां पाहतां तिच्या तोंडून अगदीं हलक्या आवाजांत येवढेच शद्ब निघाले होते,

" चंद्रकांत, तुम्हांला वेड तर नाहीं लागलं ?"

त्याचे घोगऱ्या आवाजातले शद्ब तिला ऐकू आ[illegible] होते, " वासंती, [illegible] नकोस. मी काय म्हणतों तें नीट ऐकून घे."

अशा अवेळीं तो आपल्या खोलींत असून त्याच [illegible] बोलणं चाललं आहे येवढी गोष्ट जरी चुकून कुणाच्या लक्षांत आली [illegible] काय होईल अशी कल्पना वासंतीच्या मनात एकदम आली होती; व एक[illegible] राहून ती त्याला म्हणाली होती, "कांही बोलू नका. माझ्या स[illegible]शा तुम्ही आपल्या वागण्यानं दग्ध करून टाकल्यात. आपण आतां एकमेक[illegible] कधीही न भेटणं उत्तम. मला वाटत तुम्हीं आज पुण्याला जावं...."

आणि ती झटकन् खोलींतून बाहेर पडून जिना उतरून माजघर ओलांडून अंगणांत गेली होती, अन् उंबराच्या झाडाखालच्या कट्ट्यावर किती वेळ तरी सुंद मनानं बसली होती.....

आणि आतां चंद्रकांत तिच्या इच्छेप्रमाणें तिचा कायमचा निरोप घेऊन गेला होता! .....

तिच्या आयुष्यांतलं आणखी एक प्रकरण दुःखपर्यवसायी ठरून संपलं होतं!

आपल्या खोलींत अंथरुणावर ती किती वेळ पडून राहिली कुणास ठाऊक! पण तिनं डोळे उघडले तरी तिच्या अंतःकरणांतल्या खेदाची जडता संपलेली नव्हती. खोलींतल्या वस्तूंकडे तिनं दृष्टि टाकली. त्या तिला खऱ्याच वाटेनात. घड्याळांत संध्याकाळचे साडेपांच वाजलेले दिसले, तेंही तिला खरं वाटेना. तिनं खिडकीबाहेर पाहिलं. दिवळीच्या सुमारास

आभाळांत असे मोठमोठे ढग जमलेले, आणि वादळी वारे सुटलेले तिला आठवत नव्हते.

ती घराबाहेर पडली ती वेडयासारखी चालत सुटली. आपण किती दूर-वर जात आहोत याचं तिला भान उरलं नाहीं. जोराचा पाऊस आला तेव्हां ती चिंब भिजून गेली. घरीं परत आल्यावर चांगलंच थंडी भरल्या-सारखं तिला झालं, पण तिनं कोणाला सांगितलं नाहीं. अंगांत थोडा ताप असतांनाच ती आपला रात्रीचा वर्ग घ्यायसाठीं गेली. पण तिकडून परत येतांना मात्र तिच्या अशक्त शरीराचे झोकांडे जाऊं लागले, आणि ओटीवर बसलेल्या बापूसाहेबांना ती म्हणाली,

"मला वाटतं मला सपाटून ताप भरणार आहे."

★ ★ ★

चार दिवस झाले तरी वासंतीचा ताप हटला नाहीं तेव्हां घरातली माणसं घाबरलीं. आतां यानंतर खेडयात उपलब्ध असणाऱ्या डॉक्टरी उपा-यांवर विसंबून राहणं बापूसाहेबांना धोक्याचं वाटू लागलं. पुण्याच्या एखाद्या मोठ्या डॉक्टरला बोलावून आणण्याचा ते विचार करूं लागले. पण आपल्या कारकुनाला ते मोटारीनं पाठविण्याच्या तयारींत होते इतक्यांत [illegible]गांवचे जानबा पाटील आले व वासंतीच्या दुखण्याची हकी-कत [illegible]तांच ते बापूसाहेबांना म्हणाले,

"आबाला पुण्याला पाठवावयाचं कांहीं कारण नाहीं. अगदी उत्तम डॉक्टर मी आणून देतों तुम्हांला. कालच आले आहेत ते आमच्या घरी. आत्तां संध्याकाळीं जाणार म्हणत होते, पण आतां आपण त्यांना जाऊं देणार नाहीं."

"कोण डॉक्टर हो जानबा?"

"डॉक्टर जयंत."

"होय? त्यांचं नांव मीं ऐकलं आहे खरं."

'डॉक्टर जयंत' हें जानबाच्या तोंडून निघालेलं नांव ऐकतांच अंथरुणांत निपचित पडलेली वासंती किंचित् चमकली. तिनंही तें नांव पूर्वीं ऐकलं होतं. केव्हां बरं? ... ज्वरानं तप्त झालेल्या तिच्या मेंदूची स्मरणशक्ति चटकन् काम करीना. पण, कांहीं वेळानं तिला आठवण झाली. चंद्रकांत तिच्याबरोबर होता. एक भला मोठा कुत्रा तिच्याजवळ येऊन आपल्या

मुखाचा स्पर्श तिच्या साडीला करीत होता आणि दूर अंतरावर उंची ऐटबाज पोषाक केलेली एक स्त्री त्याला दटावून हाक मारीत होती. ती आठवण तिला नको होती. तिनं डोळे मिटून घेतले....ते तिनं पुन्हां उघडले तेव्हां खोलींत कोणी नव्हतं. मग खोलीच्या छताकडे पाहतां पाहतां तिला दुसरी आठवण झाली. गांवाबाहेरच्या टेकडीच्या माथ्यावर ती एकटीच बसली होती. इंद्रधनुष्याची भली मोठी कमान आकाशांत कांहीं वेळ तरंगून दिसेनाशी झाली होती. तो भिप्पाड कुत्रा तिच्या दिशेनं धावत येऊन तिच्या समोरच थांबला होता. आणि नितक्यांत तिनं शब्द ऐकला होता, "पाशा." मग काही वेळानं धनी व कुत्रा दोघंही तिला दिसेनासे झाले होते.

"वासंती, डॉक्टर जयत आले आहेत." असे तिच्या वडिलांचे शब्द तिला ऐकू आले तेव्हां अंगावरचा एखादा कपड्यांचा ढीग दूर करून माणसनं डोकं वर करावं त्याप्रमाणें वासंतीन झोपेंतून प्रयत्नानं जागं होऊन आपले अतिशय जड आणि कढत वाटणारे डोळे किलकिले केले. तिन्हीसांजा झाल्या असाव्यात. कारण, खोलींत दिसणारा तो प्रकाश सूर्याचा खास नव्हता, दिव्याचा होता. दाराच्या उंबऱ्यापाशीं दोन आकृति दिसत होत्या आणि त्यांच्या केवढाल्या भव्य काळ्या सावल्या पलीकडच्या भिंतीवर पडल्या होत्या! पलंगाच्या कडेवर कुणी तरी बसलं होतं. त्या माणसाच्या भव्य कपाळावर, कानशिलावर, आणि दाट केसांवर दिव्याचा प्रकाश नेमका पडला होता. तो मनुष्य तिच्या वडिलांशीं कांहीं बोलत होता... "पाशा"... तोच तो आवाज होता. त्या माणसानं तिच्या मनगटावर आपली बोटं अलगद टेकली, अन् खिशांतून काढून तळहातावर धरलेल्या घड्याळाकडे निरखून पाहिलं. किंचित् दाब देणाऱ्या त्या बोटांचा स्पर्श दूर झाला तरी तो अजून आपल्या मनगटाला होतोच आहे असं वासंतीला वाटलं. मग तिनं अगदीं सारी शक्ति एकवटून आपले डोळे उघडले, आणि बापूसाहेबांकडे वळलेल्या त्या तेजस्वी मस्तकाकडे पहात, व आपल्या कोरड्या ओठावरून जीभ फिरवीत ती स्वतःशींच म्हणाली, "डॉक्टर जयंत."

त्याची आपली अशा रीतीनं भेट होईल अशी तिची कल्पना नव्हती.

# ८

ज्याच्या त्याच्या तोंडून तेच उद्गार वासंतीला ऐकू येत होते. "चंद्रकांत नव्हता म्हणून कॉलेजला पराभव झाला. तो असता तर गेली दोन वर्षे ओळीनं जिंकलेली हॉकीची ढाल यंदाही आपल्याकडे खचित राहिली असती "...

मॅच संपल्यावर क्रीडांगणावरून परतलेल्या गर्दीतून चालता चालतां तिच्या कानांवर ते उद्गार दहादा पडले असतील. मधूनच कुणी तरी प्रश्न केलेला तिला ऐकू येई, " पण चंद्रकांतानं कॉलेज सोडून जावं याचं कारण तरी काय ?" त्याचं उत्तर कुणी तरी देई, " कांही समजत नाही बुवा."

आणि त्यानंतर विद्यार्थ्यांत जी चर्चा सुरू होत त्यातले तुटक शब्द वासंतीला ऐकू येत,

" पण चंद्रकांत आहे तरी कुठे आता ?.."

" खडकीच्या अॅम्युनिशन फॅक्टरीत नोकरी धरायची म्हणत होता मागं तो.."

" अरे पण खडकीला असता तर आपल्याला इथं कधीं मधीं तरी दिसला असता की नाहीं ? तो खडकीला खास नाही."

" खडकीला नाही तर मग तो गेला कुठे ?"

" तें मी कसं सांगू बाबा ? तुला फारच जिज्ञासा असेल तर त्याच्या गांवची ती सुरंगा आपल्या कॉलेजात आहे तिला विचार."

" अँहँ, काय अक्कल याची ! म्हणे सुरंगाला विचार. चंद्रकांत कुठें आहे याची नक्की बातमी हवी असली तर सुरंगाला का विचारायचं ?"

" मग कुणाला बाबा ?"

" अँहँ रे शहाण्या ! अन् म्हणे मी एका मोठ्या साप्ताहिकाचा कॉलेजचा बातमीदार आहे. अरे, चंद्रकांताची खरी बातमी कुणाला माहीत असेल तर ती फक्त एकाच व्यक्तीला."

" कोण रे ?"

"..वासंती.."

तितक्यांत त्या विद्यार्थ्यानं सहज वळून पाहतांच मुरंगा व वासंती दोघीही त्याच्या दृष्टीस पडल्या. त्याबरोबर चपापून त्यानं जीभ चावल्यासारखं केलं व आपल्या उजव्या हाताशीं असलेल्या विद्यार्थ्याला कोपरानं ढोसून त्याच्या कानांत तो कांहीं तरी कुजबुजला.

मग त्या विद्यार्थ्यांच्या घोळक्याची बोलणी एकदम बंद झाली.

आपल्या हातीं असलेला वासंतीचा हात सुरंगानं किंचित् दाबला. जणू तिनं त्या खुणेनं सुचवलं, "बघ काय बोलतात!" परंतु त्या खुणेकडे वासंतीनं लक्ष दिलं नाही. ती गंभीर मुद्रेनं पावलं टाकीत होती. सुरंगाहि मग कांहीं न बोलतां चालूं लागली.

पण खोलींत पोचल्यावर ती वासंतीला म्हणाली, "विद्यार्थी काय म्हणत होते ऐकलंस ना?"

"विद्यार्थी बहुधा वाटेल तें बडबडतात. पण यावेळी मात्र त्याचं म्हणणं खरं आहे. चंद्रकांत असता तर आज आपल्या कॉलेजचा पराजय झाला नसता."

"ते नाही म्हणत मी. तुझ्याबद्दल विद्यार्थी काय बोलत होते तें ऐकलंस का?"

"ऐकलं." एवढाच उद्‌गार काढून वासंती गप्प झाली.

तिला तो विषय चालू व्हावयाचा नसावा. हें सुरंगाच्या लक्षांत आलं, परंतु तिला फार वेळ गप्प बसवेना. चंद्रकांत दुसऱ्या टर्मला कॉलेजांत कां आला नाही याचं तिलाही आश्चर्य वाटत राहिलं होतं, आणि कॉलेजांत न येतां तो कुठें गेला असावा याबद्दल तिला कांहींच तर्क चालवितां आला नव्हता. दिवाळीत तो रायगांवला आला तेव्हां तिची व त्याची भेट झाली होती. परंतु त्या भेटींत तिच्या सारखं मनांत आलं होतं, याची वृत्ती इतकी निराळी कां दिसते? नेहमीचा उत्साही खेळकर चंद्रकांत तिला त्याच्या ठिकाणी आढळेना. पूर्वी रायगांवला तो जेव्हां जेव्हां सुटीसाठीं आला होता तेव्हां तेव्हां तिच्या घरीं येऊन गप्पागोष्टी करण्यांत रोज किती तरी वेळ तो घालवीत असे, तिला व तिच्या धाकट्या बहिणीला ओढून तो त्यांना पत्ते खेळायला लावी. गेल्या उन्हाळ्याच्या सुटींत ब्रिजचा डाव त्यानंच तिला शिकविला होता, व तिला अजून पोहतां येऊं नये याबद्दल तिची चेष्टा करून तिला पुढें केव्हांतरी शिकविण्याचं त्यानं कबूल केलं होतं. परंतु,

परवांच्या दिवाळींत त्याची वागण्याची तऱ्हा पार बदललेली तिला आढळून आली होती. त्यांच्या घरीं जाऊन तिनं फार आग्रह केला तेव्हां कुठें तो तिच्याकडे फराळाला आला होता, आणि दोन दिवस राहावयास जाण्यापूर्वीं आपल्याबरोबर चलण्याचा त्याला आग्रह करावा म्हणून ती त्याच्या घरीं गेली तेव्हां त्याच्या आईनं सांगितलं होतं,

" चंद्रकांत काल सकाळींच गेला."

" म्हणजे ! कुठें गेला आहे ?"

" कुणास ठाऊक ! गांवाला जातों येवढं सांगून गेला खरा."

" परत केव्हां येईन म्हणाला ?"

" कांहीं बोलला नाही. पण आपलं सगळं सामान घेऊन गेला खरा."

आश्चर्य आहे ! मला कांहींच कसं बोलला नाहीं ?"

आणि मग सुटी संपल्यावर ती पुण्यास आली व आठ दहा दिवस होऊन गेले तरी चंद्रकांत आला नाहीं तेव्हां ती आपल्या मनाशीं अधिकच आश्चर्य करूं लागली होती.

त्याच्याबद्दल वासंतीला विचारावं असं तिला कधीं कधीं वाटलं होतं, परंतु दरवेळीं तिच्या ओठांपाशीं आलेले शब्द तिनं परतविले होते. वासंती-देखील आपल्याशीं पूर्वीसारखी मनमोकळेपणानं आणि आनंदानं बोलत नाहीं अशी शंका तिला दहादां आली होती आणि त्याचंहि तिला फार आश्चर्य वाटलं होतं.

पण आतां बोलतांना वासंती जरी एकदम गप्प झाली तरी सुरंगाच्या मनांत आलं, आपल्याला जें विचारावयाचं आहे तें विचारावंच. ती रागावली तरी हरकत नाहीं,

ती म्हणाली, " वासंती, सांग ना."

" काय सांगूं ?"

" चंद्रकांत कॉलेजांत परत न येतां कुठें गेला आहे तुला माहीत आहे?"

वासंतीनं नकारार्थी मान हालविली.

" तुला त्याचं पत्र आलं नाहीं ?"

" नाहीं."

वासंतीच्या या दोन उत्तरांपैकीं पहिलं खरं होतं, दुसरं खोटं होतं.

कारण सुटी संपून ती आपल्या गांवाहून पुण्याला यायला निघाली त्याच्या आधीं दोन दिवस चंद्रकांताचं तिला एक पत्र आलं होतं, व तें तिच्या ट्रंकमधें अजूनही होतं. तिनं वास्तविक तें नाहीसं करून टाकलं असतं, परंतु त्या पत्रानं एक प्रकारचं आव्हान तिला दिलं होतं, व 'ठीक आहे, दाखवीन' असं आपण एखाद्या व्यक्तीला म्हणतों त्याप्रमाणें त्या पत्राला उद्देशून म्हणून तिनं तें ट्रंकमधें ठेवून दिलं होतं.

चंद्रकांतानं त्या पत्रांत तिनं त्याची केवढी निराशा केली, व तिचा कायमचा वियोग पत्करतांना त्याला किती दुःख वाटलं त्याचं वर्णन तर केलं होतंच; परंतु प्रेमनिराशेनंतर तरुण मनुष्य ज्या तऱ्हेचा आपल्या शोकाचा नाटकी अविष्कार करतो तसल्या अविष्कारानं भरलेलं तें पत्र नव्हतं. त्यानं लिहिलं होतं,

"..तुझं प्रेम मला मिळवितां आलं नाहीं म्हणून मला जें दुःख होतं आहे तें आज अगदी असह्य आहे; पण मला हेंही समजतं कीं, कांहीं दिवसांनी हें दुःख मी विसरेन. जें प्रेम हवंसं वाटतं तें मिळवून जगतां आलं तर जगावं अशी माणसाची साहजिकच धडपड असते; पण तें मिळालं नाहीं तरी मनुष्याला जगण्याची धडपड केल्यावांचून सुटका नसते. तशी धडपड मीहि करीन. माझ्या प्रेमाचा तूं स्वीकार केला असतास तर तूं मला अत्यंत सुखी केलं असतंस. अर्थात् तो स्वीकार तूं केला नाहींस त्यामुळें मी दुःखी झालों. परंतु मला दुःख देण्याच्या बुद्धीनं तूं वागलीस असं मी कसं म्हणूं ? आणि तुला दोष कसा देऊं ? तुझ्याविषयीं माझ्या मनांत शुद्ध मित्रभाव ठेवावा अशी तुझी इच्छा होती हें मला माहीत होतं. एवढ्यावर मला समाधान मानतां आलं नाहीं हा माझा दोष. माझ्या मनांतल्या प्रेमाला वासनेचं स्वरूप येऊं नये म्हणून मीं मनःपूर्वक प्रयत्न केला. त्या प्रयत्नांत मीं यश मिळविलं असतं तर तुझा माझा सहवास संपला नसता; तुला सुख झालं असतं. परंतु मला तें सुख पुरेसं वाटलं नसतं; अर्थात् जें झालं त्यांत दोष सर्वस्वीं माझा आहे.

परंतु माझा दोष कबूल करतांना तुला एक गोष्ट स्पष्ट शब्दांत सांगावीशी मला वाटते. तुझ्याशीं शुद्ध मित्रभाव ठेवण्याचा प्रयोग मीं करावा अशी तुझी इच्छा होती. तो प्रयोग मला साधला नाहीं म्हणून मला तुझ्यापासून दूर व्हावं लागत आहे हें योग्यच झालं. पण ज्या तऱ्हेचा प्रयोग तूं स्वतः करीत आहेस तो माझ्या बाबतींत तुला साधला असला तरी नेहमींच

साधेल का याचा नीट विचार कर. कोणत्याच पुरुषाच्या वासनात्मक प्रेमाचा स्वीकार न करण्याचं तूं ठरविलं आहेस असा माझा तर्क आहे. तूं असा निश्चय करावास याला तुझ्याच आयुष्यांतील एखादी घटना कारण झाली आहे कीं काय मला माहीत नाहीं. कदाचित् तसं असेल; कदाचित् नसेलही. परंतु इतकं खचित कीं पुरुषाच्या वासनात्मक प्रेमाची तुला कधीं गरज भासणार नाहीं किंवा तसल्या प्रेमापासून तुला सुख होणार नाहीं, अशी मनाची कल्पना करून घेऊन तू वागत असलीस तर ती तुझी चूक आहे. असं मानण्यांत तूं स्वतःशीं प्रतारणा करीत आहेस ही गोष्ट तुला पुढें केव्हां तरी कबूल करावी लागेल......"

तूं स्वतःशीं प्रतारणा करीत आहेस...

ही गोष्ट तुला पुढें केव्हां तरी कबूल करावी लागेल...

वासंतीला स्वतःला तसं मुळींच वाटत नव्हतं. चन्द्रकांताच्या पत्रांतला तो 'प्रतारणा' शब्द वाचतांना तिनं भुंवया आकुंचित केल्या होत्या व स्वतः-शींच म्हटलं होतं, "एखादं सुख हवं असून नकोसं दाखविलं तर तिला प्रतारणा म्हणावी लागेल. तसं मीं कुठें केलं आहे?...."

तिची भूमिका प्रामाणिकपणाची होती. पूर्वी अशोकच्या बाबतींत, किंवा आतां चंद्रकांताच्या बाबतीत तिला खरोखर मनापासून केवळ मित्रभाव हवासा वाटला होता. त्याहून अधिक निकट स्वरूपाचं प्रेम त्यांनीं दर्शवितांच तिला तें नकोसं वाटलं होतं तेंही अगदीं मनापासून. तिनं त्यांच्याशीं अगर स्वतःशीं प्रतारणा केली नव्हती याबद्दल तिची खात्री होती. पुरुषापासून शुद्ध मित्रभावाची अपेक्षा करण्यांत जें साहजिक तेंच आपण मागत आहोंत अशी तिची भावना होती. त्यांत आपण एखादा निसर्गविरुद्ध प्रयोग करून पाहत आहोंत असं तिच्या मनांत कधीं आलं नव्हतं. आणि आतासुद्धां चन्द्र-कांताच्या पत्रावर ती विचार करूं लागली तेव्हां आपला स्वतःचा कांहीं प्रयोग चुकला या विचारापेक्षां, ज्या शुद्ध भावना अशोकनं आणि नंतर चंद्रकांतानं बाळगाव्या अशी तिनं अपेक्षा ठेविली त्या दाखविणं म्हणजे पुरुषाला दुःसाध्य अशा स्वरूपाचा प्रयोग तर नसेल अशी शंका तिला येऊं लागली, आणि ती आल्यावर मात्र यापुढं आपलं वर्तन कसं ठेवावं याचा ती विचार करूं लागली.

पुरुषापासून शुद्ध स्नेहाची अपेक्षा करणं म्हणजे त्याला निसर्गतः अशक्य असा प्रयोग करायला लावण्यासारखं असेल तर ती अपेक्षाच तिनं टाकावी हें उघड होतं. स्नेहाचा परिपाक कालांतरानं वासनात्मक प्रेमांत व्हावा असा जर निसर्गसिद्ध नियम असेल, व पुरुषाच्या वासनात्मक प्रेमाचं स्वरूप तिच्या स्वतःच्या वृत्तीला जर विलोभनीय वाटत नसेल तर तिनं त्या स्नेहाची आवडच टाकून दिली पाहिजे. अशोकचं प्रेम तिला अव्हेरावं लागलं होतं; चंद्रकांताची मैत्री अखेर तोडावी लागली होती. दोन वेळां तिच्या स्वतःच्या वाट्याला कमीअधिक दुःख आलं होतं दोन पुरुषांचीं अंतकरणं तिनं दुखविलीं होतीं. तीं दुखविण्याचा तिचा हेतु नव्हता; परंतु त्यांच्या दुःखाला ती कारणीभूत झाली होती. आतां असा प्रकार आपल्या आयुष्यांत पुन्हा तिसऱ्यांदा न व्हावा अशी खबरदारी तिनं घेतली पाहिजे. कुणा पुरुषाशीं आपला परिचय वाढेल व त्या परिचयांतून मैत्री निर्माण होईल असा संभवच तिनं उद्‌भवूं देता कामा नये. पुरुषाचा सहवासच तिनं टाळावा हें योग्य होतं....

सुटीनंतर कॉलेज सुरू झाल्यावर वासंती परत पुण्याला आली होती ती अशा प्रकारचे विचार व निश्चय करीत. त्यामुळें वास्तविक पुण्यास पोंचल्याबरोबर तिनं डॉ जयंतांची गाठ घेऊन त्यांना आपली प्रकृति दाखवायला हवी असूनही तिनं ती गोष्ट टाळली. सुदैवानं तिला हिवतापाची पाळी पुन्हा आली नाहीं, व त्यामुळें तिला बापूंच्या पत्रांत खुशाल लिहितां आलं. "मी औषध नियमितपणें घेत आहे. माझा ताप आतां अजिबात बंद झाला आहे. तुम्ही कांहीं काळजी करूं नका." तिचा ताप थांबला असला तरी तिला अशक्तता बरीचशी आली होती, व त्याबद्दल आपण डॉ. जयन्तांचा सल्ला घ्यायला पाहिजे असं तिच्या मनांत आल्यावांचून राहत नव्हतं. परंतु आपण त्यांच्याकडे गेलों कीं पुरुषाचा विशेष परिचय टाळण्याचा जो नवा निश्चय आपण केला आहे तो टिकणार नाहीं अशी तिला भीति वाटली. कारण निमोणीला तिच्या दुखण्यांत डॉ. जयन्त तिच्या घरीं तीनचार वेळां आले तेव्हां दुसऱ्या माणसाला आपल्या बोलण्या-चालण्यानं मोह पाडण्याची शक्ति त्यांच्या ठिकाणीं असल्याचं तिनं ओळखलं होतं. ते जरी धंद्यानं डॉक्टर होते तरी आपल्या धंद्याखेरीजकडे बाकीच्या गोष्टींचा विचार वर्ज्य समजणारे नव्हते हें तिच्या केव्हांच लक्षांत आलं होतं त्यांचं वाचन फार विस्तृत असावं, आणि आपल्या हातून कांहीं तरी उपयुक्त समाजकार्य घडावं अशी तळमळ त्यांच्या ठिकाणीं असावी ही गोष्ट

त्यांच्या संभाषणावरून चटकन् दिसून येण्यासारखी होती. निंबोणीला ते तिला दुसऱ्यांदा इंजेक्शन द्यावयासाठीं आले त्या वेळेस तिच्या उशागतीं पडलेल एक पुस्तक उचलून घेऊन त्यांनीं तिला विचारलं होतं,

" तुम्हांला आवडलं आहे काय हें पुस्तक ?"

ती म्हणाली होती, " हो, भाषा कांहीं फारशी सुबोध नाहीं, पण विचारांची मांडणी चांगली आहे."

ते किंचित् हसून म्हणाले होते, " मी तुम्हांला एक प्रश्न विचारूं ?"

" काय ?"

" एकाद्या लेखकाची भाषा सुबोध नसली तर त्याची विचारसरणी चांगली आहे असं शिफारसपत्र त्याला देतां येईल काय ?"

ती कांहीं उत्तर न करतां कात्रीनं आपलं नख साफ करीत अर्धवट दृष्टि उचलून त्यांच्याकडे पाहत राहिली होती, व मग स्वतःच्या प्रश्नाचं उत्तर त्यांनीं दिलं होतं,

" मला तर असं वाटतं, कीं एखाद्या लेखकाची भाषा बोजड असने याचं कारण त्याच्या विचारसरणींतच कुठेंतरी बोजडपणा, पुसटपणा असतो. माणसाचे विचार सुसंबद्ध, स्पष्ट अन् निश्चित असले की त्याची भाषा बोजड राहणं शक्य नाहीं. फारतर त्या भाषेंत नादमाधुर्य किंवा अलंकार सापडणार नाहींत. परंतु तिच्यांत सुगमता अन् सहजपणाचा ओघ हीं आढळलींच पाहिजेत..."

आणि मग आपल्या विधानाला आधार म्हणून त्यांनीं पांच सहा लेखकांची अन् त्यांच्या पुस्तकांचीं नांव घेतलीं होती. आणि तिचा निरोप घेतांना तेच तें पुस्तक परत उशागतीं ठेवण्याऐवजीं दूर टेबलावर ठेवीत ते म्हणाले होते,

" पण तें कांहीं असो. हें पुस्तक जरी तुम्हांला आवडलं असलं तरी माझ्या परवानगीवांचून तुम्ही तें वाचतां कामा नये."

" तें का ?"

तिच्यासमोर उभं राहून ते म्हणाले होते,

" आजारी माणसानं काय खावं किंवा खाऊं नये हें जसं डॉक्टरनं ठरवायचं असतं, तसंच त्यानं काय वाचावं अगर वाचूं नये हेंही त्यानं पाहिलं

पाहिजे, अन् त्याचं सांगणं रोग्यानं ऐकलं पाहिजे. आम्ही डॉक्टर लोक खाण्यापिण्यांतलं पथ्य रोग्याला सांगतों. परंतु आजारी मनुष्य कोणतीं पुस्तकं वाचतो, अन् अंथरुणांत पडल्या पडल्या कसले विचार करतो त्यावरही आम्हीं खरं म्हणजे लक्ष ठेवायला हवं कारण दुखणं बरं करणं हा डॉक्टरच्या अन् रोग्याच्या सहकार्याचा एक प्रकार आहे. तेव्हां तुम्हांला लवकर बरं व्हायचं असेल तर माझं सांगणं ऐका. असलीं गंभीर विषयाचीं पुस्तकं सध्या वाचू नका. इतका ताण सहन करण्याची तुमच्या मनाला ताकद नाहीं."

"पण मग मी वेळ घालवू कसा ?"

"तुमच्या या मालीला गोष्टी सांगा किंवा तिच्या गोष्टी ऐका. उत्सुक श्रोता मिळाला कीं लहान मुलं फार गमतीच्या गोष्टी सांगतात. विणकामाची तुम्हांला आवड असेल तर थोडं विणकाम करा. कागदाचीं फुलं कातरा. आणि यांपैकीं कुठलीच गोष्ट पटली नाहीं तर अगदीं स्वस्थ अंथरुणांत पडून खिडकींतून जो सुंदर देखावा दिसतो त्याकडे टक लावून बघत रहा. अशा प्रकारें स्वस्थ पडण्यांत किती मजा असेल ! मला तर कितीदा तरी वाटतं कीं अंथरुणावर स्वस्थ पडून बाहेर खिडकींतून दिसणाऱ्या आभाळाकडे तासन्तास पाहाण्याची संधि मिळावी, यासाठीं आपण एकदां चांगलं आजारी पडावं."

एवढं बोलून ते मनःपूर्वक हसले होते, व दाराकडे वळले होते. पण लगेच मागे परतून त्यांनीं म्हटलं होतं,

"अन् तुम्हांला पुस्तकच हवं असलं तर आज इकडे भोकरगांवाला येतांना मीं एक कादंबरी आणलेली आहे ती वाचा. परत गेल्याबरोबर जानबा पाटलाच्या गड्याबरोबर पाठवून देतों. तुम्हांला इंजेक्शन द्यायला पुनः तीन दिवसांनीं येईन तेव्हां ती परत दिलीत तरी चालेल."

आणि मग तीन दिवसांनीं ते आले तेव्हां त्या कादंबरीवरून बोलणं निघून ते म्हणाले होते,

"इंग्रजींत या तऱ्हेच्या कादंबऱ्या हल्लीं फार लिहिल्या जात आहेत. अन् तें अगदीं साहजिक आहे, फ्रॉइड अन् मार्क्स यांचे सिद्धांत अखेर जसेच्या तसे मान्य होतील असं कोणीच म्हणणार नाहीं. पण आधुनिक जगाच्या विविध व्यवहारांत जी मोठी क्रांति होत आहे, तिच्या बुडाशीं या दोन माण-

सांची विचारसरणीच कमीअधिक प्रमाणांत असणारच हें नाकारतां यायचं नाहीं. मी तर म्हणतों फ्राइडच्या विचारसरणीवर आधारलेल्या कादंबऱ्या आपल्या मराठींत कां लिहिल्या जाऊं नयेत ? अशी कादंबरी मराठींत असावी असं नाहीं तुम्हांला वाटत ?"

हें विचारतांना त्यांनी त्या कादंबरीचीं पानं चाळलीं, व वासंतीकडे दृष्टि लावली होती,

तिनं हसून म्हटलं होतं, " परंतु आपले डॉक्टरलोक लेखनाकडे दृष्टी वळवतील तरच अशी कादंबरी निर्माण होईल नाहीं का ?"

" खरं आहे तुमच म्हणण. " असं उत्तर देतांना त्यांच्या नजरेंत कांहीं तरी गुप्त अभिप्राय असावा अशी तिला शंका आली होती, अन् "तुम्ही लिहा ना कादबरी " अस म्हणावसं तिला वाटल होतं परंतु तिनं ते शब्द परतविले होते.

ते जायला निघाले व त्यांच्याकडून मिळालेली कादंबरी वासंतीन परत दिली तेव्हां ती हातीं घेत ते म्हणाले होते,

" या लेखिकेच्या आणखीं तीन चार कादबऱ्या माझ्याजवळ आहेत. त्याही तुम्हांला हव्या असल्या तर मी देईन. तुम्ही आतां दोन चार दिवसांत पुण्यास येणार ना ?"

वासंतीन मान हलविली.

" ठीक. मग जीं जीं पुस्तकं मला आवडलीं आहेत तीं तीं मी तुम्हांला वाचावयाला लावीन, अन् तुम्हांला आवडलीं असतील ती मला सांगा."

हें प्रकरण थोडंसं गळचांत येऊं लागलं अस वासंतीला वाटलं होतं व तिन म्हटलं होतं " माझ्याविषयीं तुमचा थोडा गैरसमज झालेला दिसतो. तुम्हांला वाटते तितकी वाचनाची गोडी मला नाहीं."

डॉ. जयंत किंचित् हसले होते " वाचनाची नसली तरी औषधाची गोडी तर कांहीं दिवस ठेवलीच पाहिजे ना तुम्हांला ? अन् तें घ्यायसाठीं तर माझ्याकडे याल ना ? तुम्हीं अजून पुरत्या बऱ्या झालां नाहीं. आणखी दहा बारा दिवस औषध घेतलं पाहिजे तुम्हांला. आज मी औषध दिल आहे तें तीन दिवस पुरेल. पुण्याला आलांत कीं तुम्हांला पुन्हा एकदां तपासीन अन् मग बदलून औषध देईन. तिकडे आल्याबरोबर माझी भेट घ्या हं."

तिनं 'हं' म्हटलं होतं. पण मनाशीं तिनं त्याच्या अगदीं उलट निश्चय केला होता.

ज्या दिवशीं ती पुण्याला यायला निघाली त्या दिवशीं बापूसाहेबांनीं तिला पुनःपुन्हा बजावलं होतं, "गेल्याबरोबर डॉ. जयंतांना तब्येत दाखव" ती बसमध्यें बसली तेव्हांसुद्धां त्यांनीं म्हटलं होतं. "डॉ. जयंताकडे केव्हां जाशील ? उद्यांच जा, अन् ते काय म्हणतात तें मला कळव."

तिनं उत्तर दिलं होतं, "कळवीन." परंतु तिनं मनांशीं ठरविलं होतं डॉ. जयंतांची भेट घ्यायची नाहीं. वेळच आली तर दुसऱ्या एखाद्या तिऱ्हाईत डॉक्टरकडे जाऊं; पण डॉ. जयंतकडे जाणं नको. त्यांच्याकडे गेल्यानं परिचय वाढण्याचा फार संभव तिला वाटत होता, आणि तो वाढावा अशी तिची इच्छा नव्हती.

त्यामुळें कॉलेज पुन्हा सुरू झाल्यावर पंधरा दिवस होत आले तरी ती डॉ. जयंतकडे गेली नव्हती. लाठीच्या वर्गांत जाण्याइतपत तिला अजून शक्ति वाटत नव्हती त्यामुळें कॉलेजच्या तासांव्यतिरिक्त ती बहुतेक वेळ खोलींतल्या खोलींतच पडून असे. संध्याकाळीं फारच कंटाळल्यासारखं वाटलं तर ती मुरंगाला घेऊन कुठें तरी जवळ फिरायला जाई, किंवा कॉलेजच्या वाचनाल्यांत जाऊन वर्तमानपत्रं चाळी.

* * *

एके दिवशीं एका साप्ताहिकाच्या वाङ्मयीन विभागांत तिला जेव्हां डॉ. जयंतांचं नाव ठळक टाइपांत छापलेलं दिसलं तेव्हां तिला मोठं आश्चर्य वाटलं. तिनं ठळक टाइपांत छापलेले सगळे मथळे पाहिले.

**डॉ. जयन्त यांची पहिली कादंबरी !**

**मराठी ललितवाङ्मयांत नव्या विचारसरणीचा प्रवेश**

**" प्रत्येकाचें गुप्त मन "**

ते मथळे वाचून वासंती मनाशीं पुटपुटली. "यांनी कादंबरी लिहिली ? आश्चर्य आहे !"

आणि मग एकीकडे, मनाशीं विस्मय करीत तिनं त्या वर्तमानपत्रांतला समग्र अभिप्राय वाचून काढला.

"....फ्राइडच्या मानसशास्त्रविषयक नवीन कल्पना इतक्या चित्तवेधक रीतीनं मराठी वाचकांपुढें ठेवण्याचं काम आजपर्यंत कुणी केलं नव्हतं, तें

केल्याबद्दल डॉ. जयंत हे खचित प्रशंसेस पात्र आहेत. त्यांच्या या पहिल्या कादंबरींत कथारचनेचे कांहीं दोष आढळतील. तंत्राच्या दृष्टीनंही सफाईची उणीव कादंबरींत कित्येक ठिकाणीं भासेल. परंतु हे दोष सरावानं नाहींसे होण्यासारखे आहेत. लेखकाची ही पहिलीच कृति आहे हें लक्षांत घेतां त्याच्या ओघवती भाषेचं कौतुक करावं तेवढं थोडं आहे असं आम्हांला वाटतं; आणि मराठी ललित-वाङ्मयांत एक नवीन दालन उघडणारी कादंबरी या दृष्टीनं मराठी वाचक व टीकाकार डॉ. जयंत यांनीं उघड केलेल्या "प्रत्येकाच्या गुप्त धना"चं मनःपूर्वक स्वागत करतील अशी आमची खात्री आहे...."

डॉ. जयंतांच्या त्या पुस्तकाचा वासंतीनं अधिक विचार केला नसता. परंतु ती दुसऱ्या दिवशीं आपल्या नेहमींच्या पुस्तकाच्या दुकानीं गेली तों डॉ. जयंतांच्या पुस्तकाच्या पांचसहा प्रती मोठ्या ऐटीनं समोरच्याच टेबलावर मांडून ठेवलेल्या तिला दिसल्या. तिला कांहीं स्टेशनरी खरेदी करायची होती ती तिनं मागितली. पण ती बांधून देतां देतां दुकानदारानं टेबलावरच्या त्या पुस्तकांकडे बोट दाखवून म्हटलं, "हें वाचलंत कीं नाहीं!"

ती म्हणाली, "मला कादंबऱ्यांचा फारसा नाद नाहीं."

"नसला तरी ही कादंबरी आवडेल तुम्हांला."

तिनं विचारलं, "तें कशावरून ?"

"वर्तमानपत्रांतले अभिप्राय वाचले नाहींत का तुम्हीं ?"

वासन्तीनं मान हलविली व हसून म्हटलं, "त्या अभिप्रायांचं नका सांगूं ! उलट ते फार स्तुतीचे असले कीं नक्की समजावं कुणी तरी मोठ्यानं ओरडल्याशिवाय न खपणारा हा माल असावा."

दुकानदार मनापासून हसला. "तुम्ही म्हणतां तें खोटं नाहीं, पण हें पुस्तक त्यांपैकीं नाहीं. मी सांगतों तुम्ही घ्या."

"अन् मला आवडलं नाहीं तर ?"

"हात्तेच्या, परत करा—त्यांत काय मोठंसं ? मग तर झालं ?" असं म्हणून त्यानं टेबलावरच्या प्रतींतली एक उचलली व ती बांधण्यासाठीं ब्राउन पेपर काढला.

वासंती म्हणाली, "अहो पण आत्तां माझ्याजवळ पैसे नाहींत. बांधूं नका. उद्यां येऊन मी घेऊन जाईन."

तिनं मनाशी खरंच ठरविलं, कीं दुसऱ्या दिवशीं जयन्तांची ती कादंबरी विकत घेऊन वाचायची.

परंतु संध्याकाळीं प्रिन्सिपलसाहेबांचा तिला निरोप आला म्हणून ती त्यांच्याकडे गेली तेव्हां एक निराळंच आश्चर्य तिच्या वांट्याला आलं. प्रिन्सिपल तिला म्हणाले,

"तुम्हांला द्यायसाठीं हें माझ्याकडे आलेलं आहे."

असं म्हणून त्यांनीं ब्राऊन पेपरमध्यें गुंडाळलेलं जें पुस्तक तिच्यापुढें केलं त्यावरील आवरण दूर करून तिनं पाहिलं तों डॉ. जयंतांच्या कादंबरीची ती प्रत होती! तिला किंचित् गोंधळल्यासारखं झालं, आणि ती गोंधळली ती मुख्यतः या विचारानं, कीं कादंबरीची प्रत भेटीदाखल पाठविण्याइतपत डॉ. जयंत आपल्याला ओळखतात हें प्रिन्सिपलना वावगं तर वाटणार नाही ना? तिच्या मनांत आलं झटकन् तिथून निघून जावं; पण प्रिन्सिपल पुढे बोलूं लागले होते.

"या पुस्तकाचा मला विशेष अभिमान वाटावा याचं कारण तुम्हांला माहीत आहे? हे आमच्याच कॉलेजचे माजी विद्यार्थी आहेत. जयंत बी. ए. झाला, अन् मग त्याच्या मनांत काय आलं कुणास ठाऊक, मेडिकल कॉलेजांत गेला. पण त्याची बुद्धीच-मोठी तीव्र अन् चौफेर. डॉक्टरीची पदवी त्यानं मोठ्या सन्मानानं मिळविली. अल्पावधीत उत्तम प्रॅक्टिसही जमवलं त्यानं. काल मला भेटला तेव्हां मीं त्याला विचारलं, 'इतका पैसा कमाविला आहेस त्याचं काय करणार आहेस?' तो म्हणाला, 'आणखी अभ्यास करण्यासाठीं इंग्लंड-अमेरिकेला जाईन म्हणतों.' मीं म्हटलं अवश्य जा. आमच्या कॉलेजला त्याचा फार अभिमान आहे; अन् तुम्ही त्याच्या कॉलेजांतल्या, तेव्हां तुम्हांलाही त्याच्याबद्दल मोठा अभिमान वाटला पाहिजे."

वासंती पुस्तक घेऊन दारापर्यंत गेली तोंच प्रिन्सिपल मोठ्यांदा म्हणाले, "थांबा, थांबा."

ती परत वळून त्यांच्याजवळ गेली. टेबलावरच्या पसाऱ्यांतलं एक पत्र उचलून तें पुढें करीत ते म्हणाले, "हें राहिलंच की तुम्हांला द्यायचं! डॉ. जयंतनं तुम्हांला द्यायसाठीं दिलं होतं.'

त्यांच्या हातून तें घेताना वासंतीच्या मनाचा गोंधळ फारच वाढला. डॉ. जयंतनीं पुस्तक दिलं तें दिलं; पण आणखी हें पत्र कशाला दिलं? त्यांनीं

असं करायला नको होतं. तिला त्यांचा अगदीं राग आला. प्रिन्सिपलना काय वाटेल ?...

ती आपल्या खोलींत आली ती काहींशा रुष्ट मनःस्थितींतच. डॉ. जयंतनी आपल्याला पुस्तक पाठवायला नको होतं असं तिला सारखं वाटत होतं, आणि त्यामुळें त्यांच्या त्या भेटीबद्दल कृतज्ञता वाटण्याऐवजीं तिला त्यांचा राग आला होता. त्यांच्याशीं परिचय वाढावा अशी तिची मुळींच इच्छा नव्हती. पुण्यास आल्यानंतर प्रकृतीच्या दृष्टीनं त्यांची गाठ घेणं आवश्यक असूनही तिनं टाळलं होतं. आपला प्रयत्न यशस्वी झाला असं तिला वाटं लागलं होतं. त्यांची व आपली पुन्हा गाठ पडण्याचा संभव नाही असं ती मानूं लागली होती. आणि अशा वेळीं हे त्यांनं पुस्तक तिच्या हातीं आलं होतं ! आतां सौजन्य दाखवून त्यांचे आभार तर तिला मानावे लागणार होते. आणि ते तिनं मानले व त्यांनीं तिची भेट घेतली म्हणजे ? ....नको तो परिचय वाढत जाणार आणि मग पुन्हा....

एखाद्या व्यक्तीवर रागावून तिला दूर लोटावं त्याप्रमाणें तिनं बरोबर आणलेलं तें पुस्तक दूर टेबलावर टाकून दिलं. जेवायला क्लबांत जायची वेळ होईपर्यंत तिनं त्याकडे पुन्हा पाहिलं देखील नाहीं. पण नंतर सुरंगा फिरून परत आली कीं तिच्या दृष्टीला तें पडेल व ती आपल्याला काही तरी प्रश्न करीत सुटेल, असं तिच्या मनांत आलं. ती कॉटवरून उठली आणि ट्रंकमध्यें ठेवून देण्यासाठीं तिनं तें पुस्तक हातीं घेतलं. तिला न कळत तिनं पहिल्या पानावरचा मजकूर वाचला—

## प्रत्येकाचं गुप्त धन

लेखकः—**डॉ. जयंत**

वासंतीच्या मनांत एकदम आलं, कादंबरी कुणाला अर्पण केली आहे ते पाहूं या. अर्थात् डॉक्टर साहेबांची ही पहिलीच कादंबरी, तेव्हां त्यांनीं ती आपल्या प्रिय पत्नीला अर्पण केलेली असणार....कांहीं दिवसांपूर्वीं लष्करांतल्या त्या दुकानाच्या पायऱ्या उतरून येतांना दिसलेली ऐटबाज पोषाक केलेली ती सुंदर तरुण स्त्री तिला एकदम आठवली. तिच्या चर्येवरून ती मोठी गर्विष्ठ असावी असं त्या वेळच्या ओझरत्या नजरभेटींत वासंतीला वाटलं होतं....आतां आपल्या पतीनं आपली कादंबरी आपल्याला अर्पण केलेली पाहून तर ती स्त्री गर्वानं अगदीं फुगून गेली असेल....

मनाशीं असे विचार करीत वासंतीनं पान उलटलं, व अर्पणपत्रिकेच्या पानावरून दृष्टि फिरविली.

"माझा आवडता दोस्त
पाशा
यास प्रेमपूर्वक अर्पण"

त्या मजकुराचं वासंतीला आश्चर्य वाटलं. डॉ. जयंतनीं आपल्या पत्नीला कादंबरी कां अर्पण करूं नये ? तिच्यावर त्यांचं प्रेम नव्हतं ? ती अतिशय सुंदर होती आणि सुशिक्षितही असली पाहिजे. मग ही अशी अर्पणपत्रिका काय म्हणून ? पत्नीपेक्षां पाशा कुत्रा डॉक्टरांना अधिक प्रिय असावा ?

परंतु या दिशेनं विचार करणाऱ्या आपल्या मनाला वासंतीनं अधिक पुढें धावूं दिलं नाहीं. डॉ. जयंत व त्यांची पत्नी यांचं एकमेकांवर किती प्रेम होतं, व तें या अर्पणपत्रिकेंत कां व्यक्त झालं नव्हतं याच्याशीं तिला काय करायचं होतं ? तिनं पुस्तक मिटविलं, आणि तितक्यांत बाहेरच्या व्हरांड्यांत सुरंगाच्या पायांतल्या चपला वाजलेल्या तिला ऐकूं आल्या तेव्हां तिनं तें झटकन ट्रंकमधें टाकून ती घाईनं बंद केली

---



कॉलेजांतील पहिला तास सुरू होण्याच्या आधीं बागेंत पोर्चमध्यें व्हरांड्यांत, वर्गांत जाण्यायेण्याच्या वाटेवर विद्यार्थी एकटे एकटे किंवा टोळक्यांनीं उभे किंवा रेंगाळत असलेले वासंतीला रोजच दिसत असत, परंतु आज विद्यार्थ्यांची विशेष धांदल चालली होती असं तिला वाटलं. बागेंत व पोर्चमध्यें तिला विद्यार्थी दिसले त्यांची बोलणीं जरी तिला नीट समजलीं नाहींत तरी त्यांच्या उच्च स्वरावरून, हसण्यावरून, एकमेकांच्या खांद्यावर हात टाकून बोलण्याच्या तऱ्हेवरून कोणत्या तरी आनंदाच्या बातमीची चर्चा त्यांच्यांत चालली होती असा तिनं तर्क केला. "ए माधव, आपण जायचं बरं का ?" "आमच्या जागा धरून ठेवशील काय ?" "जागा जागा काय, किती पाहिजेत जागा लेका तुला ?", "साध्या जागा

नकोत फर्मास जागा पाहिजेत !", " बरं बरं. फाजील कुठला !", " पण क्रिकेटचं प्रॅक्टिस बुडणार रे !" अशा प्रकारचीं उत्तरं प्रत्युत्तरं त्यांच्यांत चाललीं होतीं. ती पायऱ्या चढून वर गेली तों तेथेंही विद्यार्थ्यांची अशीच उत्साहाची गडबड चाललेली तिला दिसली व नोटीस बोर्डापुढें तर खूपच गर्दी झालेली असून जो तो टाचा उंच करून इतरांच्या खांद्यावरून वांकून वाचण्याचा प्रयत्न करीत होता असं तिनं पाहिलं. एक विद्यार्थी दुसऱ्याला विचारीत होता, " किती रे ! फाइव थर्टी ना ?" त्या दुसऱ्यानं नोटीस बोर्डकिडेच पाहतां पाहतां उत्तर दिलं, " Yes, five-thirty... Assembly Hall ...' वासंती मनाशीं म्हणाली कसल्या तरी सभेची नोटीस दिसते आहे.

ती विद्यार्थिनींच्या खोलींत गेली तों तिथेंही त्या नोटिशीची चर्चा चालू होती. खोलींत उजव्या हाताला एक लहानसा नोटीस बोर्ड होता त्या बाजूला वळून वासंतीनं पाहिलं. " कॉलेजच्या मराठी मंडळातर्फे संध्याकाळीं साडेपांच बाजतां कॉलेजच्या मोठ्या सभागृहांत डॉ. जयंत यांच्या सन्मानार्थ सभा..."

एका विद्यार्थिनीनं वासंतीला विचारलं, " तूं येणार असशीलच आजच्या या सभेला ?"

दुसरी म्हणाली, " अग हें काय तुझं विचारणं ? ती तर आजच्या सभेंत भाषण करणार असेल. विद्यार्थिनींतर्फे बोलणारं दुसरं कोण आहे हिच्यावांचून ?"

तिसरी तेवढ्यांत म्हणाली, " ए वासंती, आज अगदीं फर्स्ट क्लास भाषण केलं पाहिजेस बरं का ! तुझी गोड स्तुति ऐकून हे कोण डॉ. जयंत आहेत, त्यांना वाटलं पाहिजे दुसऱ्या कशासाठीं नव्हे तरी अशा स्तुतीचं बक्षीस मिळवायसाठीं आपली पुढची कादंबरी लवकर लिहावी."

त्यांना कांहीं तरी उत्तर देऊन बाजूकडच्या खिडकीशीं जाऊन अभ्यासाचं एक पुस्तक उघडून तें आपल्याला आधीं वाचलंच पाहिजे असं वासंतीनं सोंग केलं, पण त्या पुस्तकांतल्या मजकुराऐवजीं आजूबाजूस जीं बोलणीं सुरू होतीं तिकडेच तिचं लक्ष अधिक होतं.

" ए शरद, तूं वाचलीस डॉ. जयंतांची कादंबरी ?"

" नाहीं ग. आमच्या घरांत ती माझ्या वाट्याला येत नाहीं. पांच भाऊ असणं, अन् ते सगळे आपल्यापेक्षा वयानं मोठे असणं म्हणजे केवढं दुर्दैव आहे तुला काय सांगू ?"

" असं ? अरेरे ! कमे, तूं तरी वाचलीस का ?"

" एकदां सोडून तीनदां वाचली आहे. काय वाटेल तो प्रश्न विचार त्या कादंबरींतला."

" फारच छान आहे नाहीं कादंबरी ?"

" फारच बाई."

" काय ग, दक्षिणी माणसाचं नांव पाशा असं असतं ?"

" मला नाहीं वाटत."

" हा कोण विचित्र दोस्त काढलाय् डॉ जयंतांनीं आपलं पुस्तक अर्पण करण्यासाठी ?"

" पाशा ! गमतीदार नांव आहे नाही. त्याचा उच्चार ऐकल्याबरोबर ऐटबाज गोंड्यांची टोपी, वळविलेल्या मिशा, अन् सुरमा घातलेले मोठमोठे डोळे मला स्पष्ट दिसायला लागतात ! कोण असेल बरं डॉ. जयंताचा हा दोस्त ?"

" वासंतीचा काय तर्क आहे आपण तिला विचारूं हं "

तें ऐकतांच हातातल पुस्तक झटकन् मिटून वासंती त्या खोलींतून बाहेर पडली व आतां तासाची घंटा होण्याची वेळच झाली होती म्हणून आपल्या वर्गाकडे निघाली.

वाटेंत तिला सुरंगा दिसली.

" ए वासंती, नोटीस पाहिलीस ना ?"

वासंतीनं मान हालविली.

' आपण मिळून जायचं ना ? अं ?"

वासंतीनं पुन्हां मान हालविली.

" मी तीन वाजतां गांवांत जाणार आहे, पण साडेचारला नक्की परत येईन. माझ्यासाठीं थांब बरं का; नाहीं तर घाई होईल तुला अन् जाशील आधीं निघून."

" नाहीं जाणार."

या तिच्या बोलण्याचा सरळ तोच अर्थ सुरंगानं घेतला. वासंती मात्र अगदीं निराळ्या अर्थानं ते शब्द बोलली होती. संध्याकाळच्या त्या सभेला मुळींच न जाण्याचं ती मनाशीं ठरवीत होती.

आपला हा निश्चय कांहींसा चमत्कारिक आहे असं तिचं तिलाच वाटत होतें, पण तिच्या मनांत गेल्या कांहीं दिवसांत जो एक विचित्र हट्ट निर्माण झाला होता त्यावर तिचा इलाजच चालत नव्हता.

डॉ जयंत यांचा व तिचा परिचय वाढविण्याची संधि तिच्यापुढे पुनः पुन्हा येत गेली होती व तशी ती आली कीं वासंतीनं भीतीनं व रागानं ती दूर लोटली होती.

त्यांच्याकडून आलेल्या भेटीबद्दल त्यांना आभाराचं पत्र पाठवायला तिनं दोन दिवस उशीर केला होता. आभाराच्या पत्रांतून आणखी पत्रव्यवहार निर्माण होईल तेव्हा तें पत्रच आपण पाठवू नये असा विचार करण्यापर्यंत तिची मजल गेली होती. आपण आभार न मानले तर डॉ. जयंत आपणाला कृतघ्न ठरवतील, किंवा मनाशीं म्हणतील, ' शिष्टाचार पाळण्याची तत्परता या मुलींत नाहीं; अजागळ दिसत आहे ! ' म्हणेनात का ? परिचय वाढण्याचा संभव तर अशानं टळेल...परंतु या कल्पनेप्रमाणें वागणं तिच्यानं झालं नव्हतं. तिनं शक्य तितकं साधं पत्र त्यांना धाडलं होतं

" सा. न. वि. वि.

आपण आपल्या कादंबरीची प्रत मला पाठविली याबद्दल मी आपली फार आभारी आहे.

**वासंती पटवर्धन** "

हें पत्र रवाना केल्यावर तिनं त्यांच्याकडून पुस्तकाबरोबर आलेलं इंग्रजी पत्र पुन्हां एकदां वाचून पाहिलं होत.

" प्रिय कु. पटवर्धन,

सोबत माझ्या कादंबरीची एक प्रत भेट म्हणून पाठवीत आहें. तिचा स्वीकार कराल अशी आशा आहे. पुस्तक देण्यासाठीं तुमची भेट घ्यावी असा विचार होता. परंतु वसतिगृहरूपी गोषांत येऊन तुम्हांला भेटणं शक्य नाहीं, अन् दुसरीकडे कुठं तुमची गाठ पडेल त्याचा तर्क करतां येत नाही. म्हणून तुमच्या प्रिन्सिपलसाहेबांच्याकडे पुस्तक दिलं आहे. त्यांना कादंबऱ्या वाचण्याची आवड नाहीं, असती तरी माझी ही पहिलीच कादंबरी वाचण्याची

इच्छा त्यांना होणं शक्य नाहीं व झाली तरी त्यांच्यासाठीं एक प्रत त्यांना मी दिली आहे. तेव्हां पुस्तक तुम्हांला सुखरूप पोंचेल असं वाटतं. तुम्हीं ही माझी कादंबरी वाचण्यांत वेळेचा अपव्यय केलात तर तुम्हांला तो किती टाकाऊ वाटली तें कळविण्यास मागें पुढें पाहूं नका.

सुटी संपून पुण्यास आल्यावर तुम्ही आपल्या प्रकृतीसाठी माझी भेट घ्याल अशी कल्पना होती. त्यामुळें रोज तुमची थोडीशी वाट पहात होतों. तुम्हीं आलां नाही यावरून तुमची तापाची तक्रार आतां सरली असं समजतों. मात्र हें लक्षांत ठेवा कीं दुखणाईत माणसाप्रमाणेंच चांगल्या प्रकृतीचीं अन् ( तुमच्यासारखीं चांगल्या स्वभावाचीं ) माणसं अधूनमधून भेटलीं तर माझ्यासारख्या मानवी व्याधीशी चोवीस तास झगडणाऱ्या माणसाची प्रकृति चांगली राहायला मदत होते.

—जयंत गोखले

ना. क.–एकदां तुमची प्रकृति पाहायला आलों असताना बोलतां बोलतां तुम्हीं म्हणालां होतां, " आपले डॉक्टर लोक लेखनाकडे दृष्टी वळवतील तरच अशी कादंबरी निर्माण होईल. " तें ऐकून " माझी एक कादंबरी लवकरच प्रसिद्ध होणार आहे " ही गुप्त गोष्ट तुम्हांला सांगून टाकण्याचा मला फार मोह झाला होता. पण त्या वेळीं मी तो आवरला. कादंबरीची प्रत तुम्हाला पाठविण्याचा मोहही मी आवरावा असं एक मन सांगत होतं. पण दुसरं मन म्हणालं... पण नको. कारण तें सगळं सांगूं लागलों तर ताज्या कलमाऐवजी दुसरं स्वतंत्र पत्रच होईल.

–ज. गो. "

त्याच्या या दोन पानी पत्राला उत्तर म्हणून तिनं पुरत्या ओळीसुद्धां आपल्या पत्रात लिहिल्या नव्हत्या ! ते आपल्यावर रागावतील व पुन्हां पत्रसुद्धा लिहिणार नाहींत असं वासंतीच्या मनात आलं होतं, व तिला बरं वाटलं होतं.

परंतु तिचा हिशोब चुकीचा ठरला होता कारण दुसऱ्याच दिवशीं डॉ. जयंतांचा शिपाई एक पत्र घेऊन तिच्या खोलीवर आला होता. त्या इंग्रजी पत्रांत त्यांनीं लिहिलं होतं,—

" माझे आभार मानलेत याबद्दल मी तुमचे आभार मानतों. मी परवां सकाळीं भोकरगांवला जाणार आहें. तुमच्या वडिलांकडे मी पोंचवावा असा कांहीं निरोप असला तर सांगा; तो पोंचविण्यासाठी निंबोणीला

जाण्यांत मला आनंदच होईल. बापूसाहेबांना भेटण्यासाठीं मला कांहीं तरी निमित्त हवं आहे हें तुम्ही ओळखलंत तरी हरकत नाहीं.

**—जयंत गोखले** "

त्या शिपायाजवळ जें पत्र तिनं दिलं त्यांत तिनं पेन्सिलीनं एकच वाक्य खरडलं होतं.

" मी सुखरूप आहे असं आपण बापूसाहेबांना सांगू शकतां.

**—वा. पटवर्धन** "

ती चिठी शिपायाजवळ दिल्यावर मात्र वासंतीला वाटलं होतं कीं आतां डॉ. जयंत पुन्हा कधीं आपल्याला एक शब्ददेखील लिहिणार नाहींत.

परंतु त्या गोष्टीला चार पांच दिवस झाले नाहींत तोंच डॉ जयंतकडून पत्र घेऊन शिपाई आला. पत्रांत त्यांनीं लिहिलं होतं,

" बापूसाहेबांनीं तुमच्याकडे पोंचविण्यासाठीं एक डबा माझ्याजवळ दिला तो सोबत पाठविला आहे. त्यांत काय आहे तें पाहण्यासाठीं पाशाची सारखी धडपड चालली होती. परंतु त्याच्या आग्रहाला बळी न पडतां मी तो जसाच्या तसा तुमच्याकडे पाठवीत आहें. स्वतःचा प्रामाणिकपणा सिद्ध करण्याची संधी मी सहसा दवडीत नाहीं.

उद्यां संध्याकाळीं साडेचार वाजतां कांहीं स्नेह्यांना माझ्या नव्या कादंबरीनिमित्त मी चहा देणार आहें. तुम्हीं याल तर मला फार आनंद होईल. चांगला चहा तर प्यायला मिळेलच, परंतु आम्ही डॉक्टरमंडळी एकत्र जमलों ( अगदीं क्वचित् जमतों हें केवढं सुदैव ! ) कीं किती मूर्खासारखी बडबड करतों तें ऐकायला सांपडून तुमची करमणूकही पुष्कळ होईल.

**—जयंत गोखले** "

वासंतीनं उत्तर लिहून दिलं होतं.

" डबा सुरक्षित पोंचला. चहाच्या आमंत्रणाबद्दल फार आभारी आहें. परंतु साडेचार वाजतांची वेळ मला सोईची होईल असं वाटत नाहीं.

**—वा. पटवर्धन** "

अशा प्रकारें डॉ. जयंताशीं ती वागली होती. आपल्या तुटकपणानं आपण त्यांना मर्यादेबाहेर दुखविलं तर नाहीं असं तिला वाटल्याखेरीज राहिलं नव्हतं, व त्यामुळेंच कॉलेजांतल्या त्या दिवशीच्या सभेस आपण हजर राहूं नये हेंच बरं असं तिनं ठरविलं होतं.

" नाहीं जाणार " असं उत्तर तिनं सुरंगाला दिलं तें याच कारणानं.

* * *

रात्र पडल्यावर ती खोलींत आली तेव्हां सुरंगा आधींच आलेली होती.

" काय ग, जेवायला चलणार काय ?"

कॉटवर पडलेली सुरंगा हातांतलं वर्तमानपत्र वाचण्यांतच गढलेली राहिली.

तिच्याजवळ जाऊन तिच्या हातांतून वर्तमानपत्र काढून घेत वासंती म्हणाली, " ए फार भूक लागली आहे मला. चल जाऊं या ना क्लबांत."

" तुझ्याशीं कधीं बोलायचं नाहीं असं मी ठरविलं आहे. दे माझं वर्तमानपत्र परत, अन् जा तूं एकटी खुशाल जेवायला."

" अग बाई ! केवढा राग एका माणसाचा ? मी अगदीं भिऊन गेलं हो !" असं म्हणून तिला गुदगुदल्या करण्यासाठीं वासंतीनं तिच्या पोटावर आपलीं बोटं हालविलीं.

सुरंगानं तिचा हात दूर झटकून म्हटलं, " हं कांहीं नको लाडीगोडी. तुझं माझ्यावर प्रेमच नाहीं मुळीं, मला माहीत आहे."

वासंतीनं तिचा हात घट्ट धरला व विचारलं, " अग पण एवढं झालं तरी काय ? मी सभेला आलें नाहीं म्हणूनच इतकी रागावलीस होय ?"

" अर्थात् ! आतांशा तू मला टाळीत असतेस."

" इश्श्, कांहीं तरी काय ? तू येशील अन् मग आपण मिळून सभेला जाऊं म्हणून मी चार वाजेपर्यंत इथें खोलींत थांबलं. पण तितक्यांत निंबोणीहून बापूंकडून आमच्या घरचा एक नोकर आला. कांहीं औषधं खरेदी करून त्यांच्याबरोबर लगेच परत पाठवायचीं होतीं. मग कशी मी थांबूं तुझ्यासाठीं ? सांग."

सुरंगाला तें खरं वाटलं. तिच रागाचं अवसान पार नाहींसं झालं, अन् मग ती सभेच्या गमती सांगूं लागली. त्या ऐकतांना तिला फसविल्याबद्दल वासंतीच्या मनाला रुखरुख लागली होती, अन् उत्साहानं भाषण करणाऱ्या सुरंगाकडे पाहतांना तिच्या मनांत सारखं येत होतं, किती प्रेमळ भोळा जीव.

सुरंगानं आपलं छोटं ऑटोग्राफचं पुस्तक टेबलावरून उचलून त्यांतलं एक पान काढून पुढें धरतांना म्हटलं, " डॉ. जयंतांची सही पाहायची आहे का तुला ?"

ती पूर्वीं कधीं न पाहिल्याचं नाटक करून वासंतीनं " पाहूं पाहूं " असं उत्सुकतेन म्हटलं व सुरंगाच्या पुस्तकांतील सही पाहिल्यावर ती म्हणाली,

" अक्षर छान दिसतंय्."

सुरंगाचा आनंद वाढला व ती म्हणाली,

" अन् अक्षरासारखं त्यांचं बोलणंसुद्धा किती गोड ! "

" व्याख्यान छान दिलं ? "

" हो. अन् व्याख्यानानंतर मुलांनीं प्रश्न विचारले त्यांचीं उत्तरं देतांना तर त्यांनीं गंमत केली."

" असं ? "

" हो ना. ऐका तरी. एका विद्यार्थ्यानं विचारलं, तुमच्या या कादंबरींतलीं सारीं पात्रं तुम्हांला प्रत्यक्ष भेटलेलीं आहेत काय ? त्यांनीं उत्तर दिलं, बहुतेक सारीं, फक्त नायिका अजून भेटायची आहे त्या मुलानं धिटाईनं पुन्हा विचारलं, भेटायची कांहीं आशा ? ते म्हणाले, भेटली कीं कळवीन. हसतां हसतां आमची मुरकुंडी वळली. दुसऱ्या एकानं विचारलं, तुम्ही डॉक्टर असून कादंबरी लिहिलीत याचा परिणाम काय होईल ? ते चटकन् म्हणाले, कादंबरीलेखक डॉक्टरचा धंदा करूं लागतील. तें ऐकून केवढा तरी हशा पिकला आणखी."

पण तितक्यांत वासंतीवर खूप रागावण्याच्या आपल्या निश्चयाची आठवण होऊन सुरंगानं आपली चर्या व सूर बदलला अन् म्हटलं,

" आम्ही नाही जा सांगत कांही. मला तुझी किती आठवण होत होती सारखी. खुशाल निघून गेलीस तुला कांहीं वाटलं नाहीं ? दे आमचं वर्तमान-पत्र परत, वाचूं दे मला."

" एवढं काय वाचायचं आहे त्यातलं तुला ? ' वधू पाहिजे ' च्या जाहिराती ? "

" इश्श्, काय आहेस ग " असं म्हणून सुरंगा मोठमोठ्यान हसली व मग तिला रागाचा आविर्भाव चालू ठेवणं अशक्य झालं."

त्या दोघी जेवण्यासाठीं क्लबांत गेल्या. तिथेही डॉ. जयंतांच्या व्याख्याना-विषयींच्याच गप्पा मुलींमध्यें चालल्या होत्या. जी ती वासंतीला विचारी, तूं का आली नाहींस ग ?" आणि वासंती हसून कांहीं तरी उत्तर देई. मनांत मात्र तिचे निराळेच विचार चालू होते.

डॉ. जयंतांचा परिचय टाळण्याचा आपला निश्चय आपण पार पाडूं शकूं असा हिशेब करतांना वासंतीनं आपल्या वडिलांचा विचार कसा केला नव्हता कोण जाणे ?

पण नंतर पांच दिवसांनीं जेव्हां बापूसाहेब अकस्मात् सहज तिच्या समाचाराला म्हणून पुण्यास आले तेव्हां स्वतःची चूक तिच्या लक्षांत आल्यावांचून राहिली नाहीं. तरीसुद्धां ते फार तर एकाद दुसरा दिवस राहतील व तेवढ्यांत डॉ. जयंतांचा विषय आपल्याला टाळतां येईल अशी आशा ती मनाशीं करीतच होती.

पण आल्यानंतर दुसऱ्या दिवशींच ते तिला म्हणाले, " संध्याकाळीं निंबोणीला मी परत जाईन म्हणतों. पण जाण्यापूर्वीं एक गोष्ट आठवणीनं केली पाहिजे आपल्याला."

" ती कोणती ?"

" डॉ. जयंतांच्याकडे गेलं पाहिजे ना ? ते परवां येऊन मला भेटले तेव्हां त्यांनीं बजावलं कीं तुम्ही पुण्याला याल तेव्हां माझ्याकडे येऊन चहा घेतला पाहिजे. मी त्यांना म्हटलं, ' अवश्य येईन. केव्हां जाऊं या ? चार वाजतां ? तुझे तास संपतील कीं नाहीं तोंपर्यंत ?"

वासंतीनं तोंड फिरविलं अन् कपाळाला आठ्या घातल्या. मग ती त्यांच्याकडे पाहून म्हणाली,

" तुम्ही एकटे गेलांत तर नाहीं का चालायचं ?"

" वा ! मी एकटा कसा जाऊं ? तुला घेऊन येईन असं मी कबूल केलं आहे त्यांच्याजवळ. तुला यायला काय हरकत आहे ?"

" हरकत नाहीं, पण–"

वासंतीला कांहीं सबब सांगतां येईना. अन् शेवटीं तिला वडिलांच्याबरोबर डॉ. जयंतांच्या घरीं जाण्यावांचून गत्यंतर उरलं नाहीं.

वाटेनं ती सारखा विचार करीत होती, आतां किती चमत्कारिक परिस्थितींत त्यांची व आपली भेट होणार ? आपण त्यांच्या पत्रांना जीं उत्तरं दिलीं तीं तुसडेपणाचीं अन् अपमानकारक वाटून ते आपल्यावर रागावले असले म्हणजे ? त्यांनीं तो अपमान लक्षांत ठेवला असला, व आतां आपल्या वडिलांच्या देखत आपल्याशीं तुटकपणानं वर्तन केलं तर आपल्याला त्यांना दोष देतां येणार नाहीं. ते तसे वागतील काय ?...

डॉ. जयंतांच्या दिवाणखान्यांत ती जाऊन बसली तरीसुद्धां असेच विचार ती मनाशीं करीत होती, व त्यामुळें दिवाणखान्यांतील सजावट सामानाकडे व भिंतीवरच्या तसबीरींकडे ती बघत होती ती बऱ्याचशा गोंधळलेल्या मनानं. बाहेर बुटांचा आवाज झाला तेव्हां तिची छाती धडधडूं लागली. आतां दुसऱ्याच क्षणी डाव्या हाताच्या दारांतून डॉ. जयंत येतील. ते आपल्याकडे पाहातील तेव्हां त्यांच्या मुद्रेवर कोणता भाव दिसेल ? आपल्याला उद्देशून ते पहिलं वाक्य बोलतील तें काय असेल ? ते कांहींच बोलले नाहींत तर आपण काय बोलावं ?...

तितक्यांत दारावरचा झुलता पडदा आपल्या अंगानं ढकलीत पाशा आंत आला, व त्याच्या मागोमाग जयंत आले.

प्रथम बापूसाहेबांकडे पाहून व नंतर तिच्याकडे वळून दृष्टि स्थिर करीत ते हसत म्हणाले,

" अरे ! आपण आलांत होय ? वा वा, What a plesant surprise !"

नंतर दाराशीं परत जाऊन त्यांनीं बाहेर कुठं तरी असलेल्या नोकराला ओरडून सांगिलं, " अरे रामू, गाडी इतक्यांत काढूं नकोस म्हणून ड्रायव्हरला सांग."

ते आंत वळले व वासंतीसमोर बसत म्हणाले, " बाहेर जाणार होतों कामाला, पण तुम्ही आलांत, आतां नाहीं जात. काम सदाचंच आहे. तें टाळायसाटीं मला कांहींतरी निमित्त हवंच असतं. तुमचे वडील आठवण ठेवून आले यांत मला किती आनंद होतो म्हणून सांगूं ! अन् तुम्हीही आलांत ! Good !"

त्या अखेरच्या शब्दांतली खोच फक्त वासंतीलाच कळण्यासारखी होती. तिला वाटलं ते आतां पुढें काय बोलतात कुणास ठाऊक. पण तिलाच तेवढ कळेल अशा अभिप्रायानं ते हसले व मग घंटा वाजवून नोकराला बोलावून ते म्हणाले,

" अरे आईला म्हणावं चहा पाहिजे आहे."

आईला म्हणावं ? वासंतीला तें चमत्कारिक वाटलं.

मधांशी उजव्या हाताला दृष्टीस पडलेल्या एका फोटोकडे तिची नजर सहजगत्या वळली. लष्करांतल्या दुकानांत तिला दिसलेल्या त्या स्त्रीचा फोटो होता.

बायको घरांत असतांना 'आईला म्हणावं' असं काय म्हणून? वासंतीला तें चमत्कारिक वाटलं. जुन्या पद्धतीप्रमाणें डॉक्टरांच्या घरांत त्यांच्या पत्नी-ऐवजीं आईकडे सगळा कारभार असेल हें शक्य नव्हतं. मग 'आईला म्हणावं' असा निरोप जयंतांनीं कसा नोकराला सांगितला ?...कदाचित् त्यांची पत्नी बाहेर गेली असेल...

नंतर चहा पितांना व गप्पा मारतांना वासंती एकीकडे मनाशीं हाच विचार करीत होती. आणि सुमारें अर्धा तास बसल्यावर जेव्हां ती वडिलांना म्हणाली, "जाऊं या ना अतां ?" तेव्हां सुद्धां जयंतांनीं आपल्या बायकोला बाहेर बोलावून तिचा व आपला परिचय कसा करून दिला नाहीं याचं ती मनांतल्या मनांत आश्चर्य करीत होती.

जयंत म्हणाले, "कां, निघालांत इतक्यांत ?"

बापूसाहेब म्हणाले, "हो. तुमच्यासारख्या कामांतल्या माणसाचा किती वेळ घ्यायचा ? अन् शिवाय मीही थोडा गडबडींत आहे; संध्याकाळच्याच मोटारीनं निंबोणीला जाईन म्हणतों."

"पण एक मिनिट थांबा ना ! ड्रायव्हर गाडी बाहेर काढील अन् आपल्याला जिथें जायचं तिथें पोंहोचवील. अरे शामू, गाडी काढायला सांग रे. हं, मग काय बापूसाहेब पुन्हा केव्हां भेट ?"

बापूसाहेबांनीं हसत उत्तर दिलं,

"पुन्हा पुण्याला आलों म्हणजे."

जयंतनीं चटकन वासंतीकडे पाहिलं व विचारलं "आणि आपली ?"

वासंती गोंधळली, पण तेवढ्यांत म्हणाली, "मी तर काय इथेंच आहें!"

"हें कांहीं खरं वाटण्यासारखं नाहीं. बापूसाहेब, यांच्याबद्दल एक तक्रार आहे बरं माझी."

वासंती चपापली. ते आतां आपल्या वडिलांना सगळं सांगणार असं तिला वाटलं.

पण डॉक्टर तिच्या वडिलांशीं निराळंच बोलूं लागले.

"यांनीं आणखी कांहीं दिवस औषध घेतलं पाहिजे. यांची प्रकृति मला बरी नाहीं दिसत अजून."

"ती तर लिहिते औषध घेतें म्हणून !"

डॉ. जयंत हसले. तितक्यांत बाहेर गाडी येऊन उभी राहिल्याचा आवाज झाला व तो ऐकून तीं तिघंहि बाहेर पडलीं. गाडी सुरू होण्यापूर्वीं गाडीच्या दारावर रेलून डॉक्टर वाकले व त्यांनीं वासंतीला म्हटलं,

"माझ्या कादंबरीबद्दलचा तुमचा अभिप्राय नाहीं कळविलात मला अजून."

"छान आहे."

"अं हं, असं मोघम नको, सविस्तर पाहिजे आहे. काल एका पत्रांत सपाटून टीका आली आहे माझ्यावर. वाचलीत का ?"

वासंतीनं मान हालविली.

"वाचण्यासारखी आहे. सवडीनं याल तर दाखविन मी तुम्हांला. केव्हां येतां ? आदितवारीं ? अच्छा. जाऊं दे रे."

वासंतीनं कांहीं बोलण्यापूर्वीं गाडी सुरूदेखील झाली.

मग संध्याकाळीं निबोणीला जाण्यासाठीं निघेपर्यंत दहा वेळां बापूसाहेबांनीं म्हटलं. "डॉ. जयंत म्हणजे एक मोठा छान माणूस आहे, नाहीं ?" आणि दर वेळीं त्यांच्या त्या उद्‌गारांना दुजोरा देणं वासंतीला भाग पडलं. भाग पडलं याचा अर्थ वडिलांचं तें विधान तिला मान्य नव्हतं असा नव्हे, तर तिनं आपण होऊन तसा कांहीं उद्‌गार काढला नसता. कारण त्या वेळीं तिच्या मनांतले विचार निराळ्या दिशेनं चालले होते. तिला वाटत होतं आपले वडील डॉ. जयंतांचा परिचय वाढविण्याची इच्छा धरूं शकतात. त्यांच्याकडे जाऊन अगत्य दाखवितात. पुन्हा येण्याचं वचन देतात. आणि आपल्याला मात्र या सगळ्यापासून अलिप्त राहिलं पाहिजे....कारण काय, तर पुरुषाच्या परिचयांतून कालांतरानं कोणत्या गोष्टी अचूक निर्माण होतात त्याचा आपल्याला दोन वेळां अनुभव आला आहे, आणि आतां तो परिचयच आपल्याला वर्ज्य मानायचा आहे...

अशा विचारांत ती कांहींशी मग्न असल्यामुळें वडिलांच्या प्रश्नाला 'होय' 'नाहीं' अशीं उत्तरं देण्यापलिकडे ती बोलली नाहीं. ते अगदीं जायला निघाले तेव्हां मात्र तिला आपल्या स्तब्धपणाची जाणीव झाली व त्याची थोडीशी लाजही वाटली. मग जणूं अपराधाची भरपाई करण्यासाठीं ती खूपच बडबडत राहिली. 'मालीला सांगा मीं फार फार विचारलं आहे म्हणून,' 'पुन्हा याल तेव्हां त्या नकटीला घेऊन या कीं,' असे निरोप तिनं

पुनः पुन्हा आणि आबा कारकून व घरचीं गडी-माणसं यांच्यासुद्धां आठवणी काढून ती बोलली. अगदीं निघण्याच्या वेळीं बापूसाहेब तिला म्हणाले,

"तूं आपल्या प्रकृतीची काळजी घेत नाहींस हें कांहीं चांगलं नाहीं. मला लिहिलंस औषध घेतें अन् डॉ. जयंत म्हणतात—"

"ते कांहीं तरी सांगतात; त्यांचं काय मानतां तुम्ही ?"

"मानूं नको तर काय करूं ? मला तिकडे निंबोणीला तुझ्याबद्दल कशी काळजी लागलेली असते तुला काय ठाऊक ? आतां रविवारीं त्यांच्याकडे जाशील तेव्हां तुझी प्रकृति तपासून ते काय म्हणतात तें मला कळव.... समजलं ना ? हं."

असं पुनः पुन्हा बजावून बापूसाहेब गेले. अणि त्यामुळें डॉ. जयंतांचं रविवारचं आमंत्रण चुकविण्याचा तिनं आपल्या मनाशीं थोडाबहुत केलेला बेत तिला बदलावा लागला.

मात्र त्यांच्याकडे गेल्याबरोबर ती त्यांना म्हणाली, "मी केवळ पेशंट म्हणून आलें आहे हं !"

"ठाऊक आहे मला. पण इथें नीट खुर्चीत बसायला काय हरकत आहे पेशंटला ?" असं म्हणूत ते हसले; व मग तिच्या समोरच्या खुर्चीवर बसून ते म्हणाले "पाहूं तुमची नाडी."

त्यांनीं मग तिला कांहीं प्रश्न विचारले, टेबलावरचा एक छोटा कागद घेऊन त्याच्यावर पेन्सिलीनं कांहीं खरडलं, व तो कागद तिच्या हातीं देऊन ते म्हणाले, "सध्यां हें औषध घ्या."

तिनं कागदाची घडी आपल्या मनी बॅगमध्यें ठेवली तेव्हां त्यांनीं विचारलं, "हं, आतां चहा घेणार का कॉफी ? बोला; मी तुम्हांला लवकर सोडणार नाहीं हें लक्षांत ठेवा."

मग वासंतीला बसणंच भाग पडलं.

जयंत प्रथम आपल्या कादंबरीच्या हकीकती सांगू लागले वर्तमानपत्रांत आलेली ती टीका त्यांनीं वाचून दाखविली व मग तिच्याशीं ते इतर गोष्टी बोलत राहिले. अखेर ते म्हणाले,

"आतां मी एक नवी कादंबरी लिहायला सुरुवात केली आहे. एकच प्रकरण लिहून झालं आहे. तुम्ही पुन्हा याल तेव्हा मी तें तुम्हांला, वाचून दाखवीन."

वासंती दाराच्या चौकटींत उभी होती. मान हालवून ती म्हणाली, "अं हं. आतां नाहीं पुन्हा येणार."

"म्हणजे ?"

वासंतीच्या मनांत जोरानं आलं कीं, त्यांना स्पष्ट सांगावं, विवाहित माणसानं एखाद्या कुमारिकेशीं निकट मैत्री जोडण्याचा प्रयत्न करावा हें मला बिलकुल पसंत नाहीं. पण उघड कांहींच न बोलतां तिनं दाराबाहेर पाऊल टाकलं.

जयंत म्हणाले, "तें कांहीं चालायचं नाहीं हं यायलाच पाहिजे तुम्ही. केव्हां येतां ?"

"एका अटीवर येईन."

'कोणत्या ?' अशा अभिप्रायानं त्यांनीं हसत तिच्याकडे पाहिलं.

"पुढच्या वेळेस मी आलें कीं तुम्ही माझी आणि तुमच्या पत्नीची ओळख करून दिली पाहिजे." असं म्हणतांना दारांतून समोरच दिसणाऱ्या भिंती-वरच्या त्या फोटोकडे वासंतीनं दृष्टि टाकली.

"माझ्या पत्नीची ?" असं उद्गारून जयंत केवढ्यांदा तरी हसत सुटले व नंतर ते म्हणाले, "बरं बरं. त्यासाठीं तरी तुम्ही या म्हणजे झालं."

त्यांच्या मोटारींतून ती परत खोलीवर आली. वाटेनं आणि नंतर खोलींत शिरल्यावरही किती तरी वेळ वासंती मनाशीं म्हणत होती, जयंत असं मोठमोठ्यांदा काय म्हणून हसले ?...त्यांचे अन् त्यांच्या पत्नीचे संबंध नक्की कशा प्रकारचे असावेत त्याचा तिला तर्क करतां येईना....

आणि आपला व त्यांचा परिचय टळण्याऐवजीं अधिक वाढत जणार असंही तिच्या मनांत पुनः पुन्हा येत होतं व तें आलं कीं ती मनाशीं उद्गार काढीत होती, "पण त्यांची पत्नी ?... पुन्हा त्यांची भेट घ्यायची नाहीं !...."

---

## १०

डॉ. जयंतकडून तशी चिठी येणार अशी वासंतीची अपेक्षा होतीच. त्यामुळें तिला आश्चर्य वाटलं नाहीं. प्रतिपक्षी कोणतं मोहरं हालविणार तें आधींच ओळखणारा माणूस बुद्धिबळाच्या डावांत आपली खेळी जितकी

चटकन् व संथ मनानं खेळतो तितक्याच चट्कन तिनं त्या चिठीचं उत्तर लिहिलं, अन् तें जयंतांकडून आलेल्या शिपायाजवळ दिलं.

जयंतांनीं आपल्या चिठींत लिहिलं होत,

" तुम्ही आपण होऊन याल असं कांहीं लक्षण दिसत नाहीं म्हणून आज अखेर तुम्हांला स्मरणार्थ लिहीत आहे. माझ्या पत्नीची ओळख करून घेण्याची तुमची उत्सुकता नाहींशी झाली काय ? नसेल असं वाटतं. अन् शिवाय नव्या कादंबरीच तयार झालेलं पहिलं प्रकरण तुम्हांला पसंत पडलं तरच ती पुढं लिहायचं मी ठरवलं आहे, आतां येतां का ? गाडी पाठविली आहे."

वासंतीन आपल्या उत्तरांत लिहिलं,

" आतां मला वेळ नाहीं, केव्हां होईल तें सांगतां येत नाही. आतां मला अभ्यासाकडे फार लक्ष दिलं पाहिजे. तुमच्या पत्नीची ओळख करून घेण्याची माझी इच्छा कायम आहे; परंतु एक गोष्ट जरा स्पष्ट लिहितें त्याचा राग मानू नका. तुमच्याकडे मी वारंवार यावं हें त्यांना आवडेल काय ? अन् त्यांच्या पसंतीचा प्रश्न सोडला तरी तुम्हांला हें शोभतं काय ? मला तर वाटतं, तुमचा माझा परिचय अधिक वाढूं नये हेंच चांगल..."

तें पत्र जयंताच्या शिपायाजवळ देऊन रवाना केल्यानंतर वासंती परत आपल्या अभ्यासाच्या पुस्तकांतल्या नोट्स करूं लागली ती बऱ्याचशा निर्बंध चित्तानं. तिला वाटलं जें यापूर्वीच करायला हवं होत तें आपण करून टाकलं; बरं झालं....

मनुष्याच्या मनांत जे हट्ट निर्माण होतात त्याच्या दोन अवस्था असतात. त्यांपैकीं पहिली अशी असते कीं त्या वेळीं आपला हट्ट चुकीचा तर नाहीं अशी शंका माणसाला अधून मधून येत असते, व त्यामुळें हट्ट थांबण्याचा संभव असतो परंतु तो या अवस्थेंत सुटला नाहीं तर मग आपण जी गोष्ट हट्टानं ठरविली ती बरोबरच आहे असं मानण्याचा एक नवीनच हट्ट निर्माण होऊन त्यामुळें पहिला हट्ट दृढमूल होतो. झाडाला पारंब्या फुटून त्या जमिनीला लागल्या कीं मूळ झाडाला दृढता यावी तसाच कांहींसा प्रकार मनुष्याच्या मनांतल्या हट्टांचा होत असतो. वासंतीच्या बाबतींत असच झाल असावं.

डॉ. जयंतांचा व आपला परिचय वाढूं न देण्याचं तिनं प्रथम ठरविलं त्या वेळीं आपण विनाकारण तर हा दुराग्रह चालविला नाहीं, असं एखादे वेळीं तिच्या मनांत येत असे; परंतु तिच्या निश्चयावर आघात करणाऱ्या

लहानसहान गोष्टी जेव्हां एका मागोमाग एक अशा घडत गेल्या तेव्हां आपल्या दुराग्रहाला चिकटण्याचा एक नवीनच दुराग्रह तिच्या ठिकाणीं उत्पन्न झाला, आणि मग आपल्या हट्टाचं समर्थन ती निराळ्याच प्रकारे करूं लागली, विवाहित पुरुषानं एकाद्या कुमारिकेशीं निकट स्नेह जोडण्याची इच्छां करणं वावग आहे या सामान्य सिद्धांताचं पांघरूण आपल्या मनांतल्या दुराग्रहावर घालायला तिला मिळालं तेव्हां तिनं तें मोठ्या तत्परतेनें त्यावर घातलं. पुरुषाचा परिचय टाळण्याची आपली इच्छा कितपत नैसर्गिक व वाजवी आहे तें तपासण्याची आवश्यकता त्यामुळें नाहींशी झाली व आपला हट्ट योग्यच आहे अस समाधान तिला घेतां आलं...

या नव्या समाधानामुळेंच जयंताच्या पत्राला तें स्पष्ट व तुटक उत्तर धाडतांना तिला वाटत होतं, आपण जें करीत आहोंत तें योग्य आहे इतकंच नव्हे याच्या आधींच ही गोष्ट आपण करून टाकायला हवी होती. आपल मन व्यग्र करूं पाहणारी एक गोष्ट आतां दूर झाली अशा जाणीवेनं ती आपल्या अभ्यासाच्या पुस्तकाकडे उत्साहानं वळली.

परंतु तिनं पुस्तकांतल्या दहा ओळीही पुरत्या वहीवर उतरल्या नसतील तोंच सुरंगा धाडकन् खोलीचं दार लोटून आंत आली, व ' हें काय ? ' असं वासंती तिला विचारणार तोंच ती जवळ येऊन म्हणाली,

" काय वस्ताद आहेस ग तूं ! मला दादसुद्धां लागूं दिली नाहींस काय ?"

" कसली दाद ?"

" आहा, काय सोंगाडी आहेस ? जसं कांहीं मी काय म्हणतें तें कळलच नाहीं तुला ? पण आतां तूं किती लपविणार ? रेसिडेंसींतल्या सगळ्या मुलींना माहीत झालं आहे !"

भुंवया आकुंचित करून वासंतीनं विचारल, " अग पण काय ?"

" तुझं अन् डॉ. जयंतांचं—"

" हं ?.."

" हं काय ? प्रेम आहे कीं नाहीं, बोल. आत्तां त्यांचा शिपाई तुझं पत्र घेऊन गला कीं नाहीं, सांग. गॅलरींत मुली जमल्या होत्या पाहाय्साठीं. खालीं त्यांची मोटार उभी होती ती मी पाहिली लांबून. वर येतें तों साऱ्या मुलींनीं मला गाठलं अन् त्या मला विचारायला लागल्या. वासंतीशीं डॉ. जयंतांनीं कितपत सूत जमवलं आहे सांग. मी म्हटलं मला नाहीं बाई

माहीत. त्या म्हणाल्या, नको सांगूस, पण परवांपासून दोनदां त्यांच्या गाडींतून वासंती आलेली आम्हीं पाहिली. मीं म्हटलं काय जणं. पण आतां तुला विचारतें, खरंच येते त्यांची गाडी तुझ्यासाठीं ? त्यांचं तुझं असं कांही असेल अशी शंकासुद्धां येऊं दिली नाहीस काय मला ? इंदु कुळकर्णी तर म्हणत होती कीं—"

पण वासंतीच्या मुद्रेवर येवढं गांभीर्य अन् इतकी रुष्टता सुरंगाला दिसली, की ती चपापून एकदम गप्प झाली.

वासंती म्हणाली, " सुरंगा, तूं इतकी मूर्ख असशील असं मला वाटलं नव्हतं. मला या नोट्स काढायच्या आहेत. मला. Disturb करू नकोस...."

अन् ती लिहूं लागली.

सुरंगा अगदीं गोंधळून जाऊन क्षणभर तिच्या टेबलाजवळ उभी राहिली व मग वाईट चेहरा करून दूर होऊन खिडकीकडे गेली. तिला वाटलं होत आपण वासंतीची चेष्टा करूं अन् मग खूप गंमत होईल. पण तिनं पाहिलं तों वासंतीनं अगदीं चिडकेपणा दाखवून तिला गप्प बसविलं होतं. प्रेमांत सांपडलेलीं माणसं अशी वागतात ? तिला कांहीं कल्पना नव्हती...

तिनं वळून पाहिलं असत तर तिला दिसलं असतं, कीं मघाशी जरी वासंती अगदीं जोरजोरानं लिहूं लागली होती तरी आतां ती लिहीत नव्हती. तिची दृष्टि खालीं वळलेली होती. पण पेन्सिलीचं टोक ओठाला लावून ती कसल्या तरी विचारांत मग्न झालेली स्तब्ध बसली होती.

डॉ. जयंतांच्या गाडींतून ती दोन वेळां खोलीवर आली होती. त्यांचा शिपाई त्यांचीं पत्रें घेऊन तीन चार वेळां आला होता. परंतु या गोष्टी लोकांच्या विशेष लक्षांत येण्यासारख्या असतील व लोक त्याचा कांहीं एक विशेष अर्थ करूं लागतील अशी तिला अगदीं कल्पना नव्हती...आणि आतां सुरंगा सांगत होती कीं वसतिगृहाच्या मुलींच्या तोंडी....

ज्या वहींत ती नोट्स काढून घेत होती तिच्यांतला एक कागद फाडून घेऊन वासंतीनं त्यावर घाईघाईने लिहिलं:

" मघांच्या पत्रांत एक गोष्ट लिहावयाचा राहिला. पुन्हा कधीं तुमची गाडी इकडे पाठवूं नका. किंवा शिपाईदेखील..."

एवढंच लिहून चिठीची घडी करून ती तिनं पाकिटात घातली; पण तितक्यांत तिला वाटलं एवढ्या दोनच ओळी लिहिल्या तर तें फारच

कठोरपणाचं दिसेल. डॉ. जयंतांचा परिचय तिला नको असला तरी एखाद्या माणसाला व्यर्थ दुखविण्याची जाणीव तिच्या मृदु हृदयाला सहन होण्या-सारखी नव्हती. तिनं कागद पुन्हां बाहेर काढला, अन् पहिल्या मजकुराखालीं लिहिलं;

" वसतिगृहांतल्या मुली किती फाजील असतात, अन् राईचा पर्वत करून बेजबाबदारपणानं वाटेल तें कसं बडबडत सुटतात हें तुम्हांला कदाचित् माहीत नसेल म्हणून असं लिहिलं. माझं काम असेल तेव्हां मीच येऊन तुम्हांला भेटेन."

कॉलेजांत जायला निघतांना तिनं तें पत्र बरोबर घेतलं. ती आधीं पोस्टांत गेली, आणि तिथल्या पेटींत तें पत्र टाकून कॉलेजांत गेली. पहिल्या तासाचं व्याख्यान ऐकतांना तिच्या मनांत सारखं येत होतं, ' सुटलें ! '

तिसऱ्या तासाचे प्रोफेसर मुंबईला गेले असल्यामुळें तिला लवकर सुटी झाली म्हणून ती रीडिंग रूममध्यें गेली. तिनं प्रथम एक दोन वर्तमानपत्र चाळून पाहिलीं व मग 'स्त्री' मासिकाचा ताजा अंक स्टॅंडवर लागलेला दिसला त्याकडे ती वळली. अंकाचीं पानं चाळतां चाळतां ती एकदम चपापली. चांगला पाव पान आकाराचा एक ठसठशीत फोटो तिच्या नजरेपुढें होता. " एका महाराष्ट्रीय महिलेची परप्रांतांतील कामगिरी " असा मथळा त्या पानावर तिला दिसत होता. परंतु त्या जाड ठशांतल्या मथळ्यापेक्षां त्या फोटोकडेच वासंती अधिक लक्षपूर्वक पाहूं लागली. किती देखणी आणि अगदीं आधुनिक तऱ्हेचा ऐटबाज पोषाक केलेली स्त्री होती ती ! वासंतीनं तो ताबडतोब ओळखला. डॉ जयंतांच्या पत्नीला प्रत्यक्ष असं तिनं एकदांच पाहिलं होतं. परंतु तिचा फोटो तिनं त्यांच्या घरच्या दिवाणखान्यांत दोनदां पाहिला होता. जयंतांच्या दिवाणखान्यांतल्या फोटोंत व या मासिकांतल्या फोटोंत तिची वेशभूषा वेगवेगळी होती. परंतु अभिमान—नव्हे कांहींसा गर्विष्ठपणा—दर्शविणारी मानेची ती ठेवण, आणि कांहींशा बेपर्वाईनं खोंचून पाहणारी ती नजर याही फोटोंत होतीच. आणि शिवाय फोटोखालीं नांवही छापलं होतं, " सौ. उषा गोखले, एम्. ए. "

नांवापुढची ती पदवी वांचून वासंतीच्या मनांत आलं, इतकी शिकलेली आहे, आणि तरी मी गेलें तेव्हां जयंतानीं तिची माझी ओळख करून दिली नाहीं ? आश्चर्य आहे !

ती पान उलटणार तोंच, जाड ठश्यांतल्या त्या मथळ्याकडे तिचं पुन्हा लक्ष गेलं आणि आतां तिनं लक्षपूर्वक वाचलं तेव्हां तिला तो जरा चमत्कारिक वाटला. परप्रांतांतील कामगिरी ? असं कसं ? जयंताची बायको तर इथें पुण्यासच राहणारी ोती की ! ती परप्रांतांतील कशी झाली ?... का कुठें दौऱ्यावर गेली होती ?...

लेखाच्या आरंभीं कंसांत संपादकीय मजकूर होता तो वाचण्यास वासंतीनं प्रारंभ केला.

" महाराष्ट्राबाहेर परप्रांतांत राहावयास गेलेल्या ज्या कित्येक महाराष्ट्रीय महिलांनीं आपल्या बुद्धीच्या जोरावर व सुस्वभावामुळें मोठी लोकप्रियता मिळविली आहे, त्यांमध्यें सौ. उषा गोखले यांची गणना अवश्य करावी लागेल. गेलीं पांचदहा वर्षं त्या बिहारप्रांतांत राहत आहेत. त्यांचे पति तिकडे मोठ्या हुद्यावर आहेत. ज्यांचा पहिल्याच कादंबरीचा मराठी वाचकवर्गांत मोठा गाजावाजा झाला ते डॉ. जयंत व सौ. उषाबाईंचे पति बाळासाहेब गोखले, आय्. एम्. एस्. हे सख्खे बंधु होत..."

वासंतीनं पुढला मजकूर वाचलाच नाहीं. जेवढा तिनं वाचला तेवढ्यानंच तिला विस्मयाचा इतका मोठा धक्का बसला होता कीं तो ओसरेपर्यंत स्वस्थ उभं राहणं तिला भाग होतं.

दुसऱ्याला अपराधी ठरविण्यासाठीं मनाशी केलेली एखादी कल्पना अकस्मात् पार ढासळून पडली कीं माणसाचा नुसता तोल जात नाहीं; तर मनांत एक प्रकारची शरम उत्पन्न होऊन मनुष्य स्वतःवरच चरफडूं लागतो. वासंतीची अवस्था अशीच झाली. डॉ. जयंतांचा स्नेह टाळण्याची तिची इच्छा होती. ते विवाहित असून आपल्याशीं निकटपणा जोडण्याचा जो प्रयत्न करतात तो गैर आहे या विचाराचा त्या इच्छेला मोठा आधार सापडल्यासारखं तिला वाटलं होतं. त्यामुळें तिचा स्वतःचा हट्ट समर्थनीय ठरत होता, व त्या सबबीवर डॉ. जयंतांशीं आपण कितीहि कठोर वर्तन केलं तरी त्यांना तें क्षम्यच मानावं लागेल अशा समाधानांत ती होती. त्यामुळें ज्या स्त्रीला ती डॉ. जयंतांची पत्नी समजत होती ती त्यांची भावजय आहे, हें आतां समजल्याबरोबरच तिचं मन अगदीं गोंधळून गेलं. तिचा व जयंताचा परिचय वाढतां वाढतां अशा स्वरूपाचा झाला होता कीं, तो आतां अजीबात बंद करणं कठीण होतं. परंतु त्यांच्या पत्नीचं

निमित्त केल्यास आपल्याला ती कठीण गोष्ट सहज साधतां येईल असं वासंतिला वाटूं लागलं होतं. त्यामुळें ते अविवाहित असल्याचं समजून येतांच, स्वतःच्या संरक्षणासाठीं उभी केलेली एखादी भिंत अकस्मात् पडली म्हणजे मनुष्याला जसं भांबावल्यासारखं वाटतं तसं वासंतीला वाटलं आतां तिच्या लक्षांत आलं कीं लष्करांतल्या त्या दुकानदारानं चंद्रकांताला माहिती देतांना, "त्या होय ? मिसेस गोखले, इथें डॉ. जयंत आहेत ना, त्यांच्या..' एवढंच म्हटलेलं आपण ऐकलं होतं. त्याचे पुढचे शब्द आपण ऐकले नव्हते. ती आपल्या वडिलांबरोबर जयंतांच्या घरीं गेली तेव्हां, किंवा नंतर ती एकटी गेली तेव्हां, परिचय करून देण्यासाठीं त्यांनीं आपल्या पत्नीला बाहेर बोलाविलं नाहीं हेंहि तिला आतां सुसंगत वाटलं. त्यांची पत्नी नव्हतीच तर ती बाहेर कुठून येणार, असा विचार मनांत येतांच आत्तांच्या किंचित् त्रासलेल्या व गोंधळलेल्या मनःस्थितींतसुद्धां तिच्या तोंडावर क्षण-भर हास्य दिसलं. परवां तिला निरोप देतांना डॉ. जयंत म्हणाले होते, "माझ्या पत्नीची ? बरं बरं..", अन् असं म्हणून ते हंसले होते. त्या वेळीं ते तसे कां हसले तें आतां वासंतीला पुरतं कळलं. त्यांचा विवाह झाला नव्हता यांत संशयच नव्हता. मग ती आतां कोणत्या सबबीवर त्यांचा वाढता परिचय बंद करणार ? ती त्यांस असं सरळ म्हणूं शकत होती काय, कीं पुरुषांचा मला खेदजनक अनुभव आला आहे, आतां पुन्हा त्याचे परिणाम पाहत बसण्याची माझी इच्छा नाहीं ? असं करणं सोपं नव्हत... जी अडचण दूर झाल्याचं समाधान ती उपभोगूं लागली होती त्या अड-चणींत आपण पुन्हा चांगल्याच पडलों या जाणिवेनं वासंतीला परिस्थितीचा संताप आला.

परंतु या संतापापेक्षांही अधिक जोरानं जो विचार तिच्या मनांत त्या वेळीं आला तो निराळा होता. जें पत्र तिनं सकाळीं पोस्टांत टाकलं होतं तें वाचल्यावर डॉ. जयंत काय म्हणतील ? त्यांना काय वाटेल ? तिची वेडी समजूत केवळ हसण्यावारी ते नेतील ? कीं चुकीच्या कल्पनेनं तिनं त्यांच्या वर्तनाचा जो प्रच्छन्न धिक्कार केला होता त्याचा ते राग धरून बसतील ? त्यांना राग आला तर त्यांना दोष देतां येण्यासारखा नव्हता. तिच्या पत्रांतला जो मजकूर तिला सकाळीं उचित वाटला, तो जयंतांना अगदीं मर्मघातक वाटेल असं कबूल करणं तिला आतां भाग होतं.. तिनं जयंतांचा अगदीं मोठा अपराध आणि उपमर्द केला होता... शक्य असतं

तर धावत जाऊन तिनं तें पत्र पोस्टाच्या पेटींतून काढून परत घेतलं असतं...

पण तें शक्य नव्हत, व आतां पुढें काय करावं असं पुन्हः पुन्हा मनाशीं घोकीत त्याच त्याच विचारांच्या मालिकेंत घोटाळत राहाण्यावांचून वासंतीला गत्यंतर नव्हतं.

दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं वसति-गृहाच्या क्लबाची एक नोटिस प्रिन्सिपलसाहेबांची सही तिच्यावर घेऊन बोर्डावर लावायची होती, म्हणून ती त्यांच्याकडे गेली. बगल्याच्या पायऱ्या चढून ती दारावर कडी खडखड-विणार तोंच खडावांचा आवाज आंतल्या खोलींतून दाराकडे आल्या-सारखं तिला वाटलं. आणि येतां येतां प्रिन्सिपल कोणाशीं तरी बोलत असावेत....

तुम्हीं संकोच अगदीं धरू नका. लायब्ररी तुमची आहे. आणि शिवाय तुम्ही आमचे सन्माननीय माजी विद्यार्थी ना ? " प्रिन्सिपल हसले असावेत. आणि दुसऱ्याच क्षणीं दुसरं कुणी तरी हसल्याचा जो आवाज झाला तो ऐकतांच वासंती एकदम चपापली. प्रिन्सिपल ज्यांच्याशीं बोलत दाराकडे येत होते ते दुसरे कोणीं नसून डॉ. जयंत होते खास !

तिला वाटलं एकदम वळावं अन् पायऱ्या उतरून धूम ठोकावी.

तितक्यांत दार उघडलं गेलं आणि डॉ. जयंत उबऱ्यापाशीं उभे असलेले तिला दिसले. वासंतीला पाहतांच ते उद्गारले "अरे ! ". तो उद्गार काढतांना त्यांची चर्या कशी होती तें पाहण्याचा तिला धीर होणं शक्यच नव्हतं. पाठीमागें प्रिन्सिपल उभे होते. त्यांनीं न कळत तिचा बचाव केला. त्यांनीं विचारलं, " काय हो ? कांहीं काम होतं काय ? " तिनं कसंबसं उत्तर दिलं, " होय, या नोटिशीवर सही पाहिजे होती." प्रिन्सिपलनीं तिचं फाउन्टनपेन मागून घेऊन तिनं पुढं केलेल्या कागदावर सही केली.

प्रिन्सिपलसाहेबांच्या हातांतून तिनं कागद परत घेतला तेव्हां डॉ. जयंत तिला म्हणाले,

" तुमचं काम आटोपलंस दिसतं. मग आपण आतां मिळूनच जाऊ मीं आपली गाडी कांहीं कामासाठीं पाठविली आहे, ती येईलच इतक्यांत."

प्रिन्सिपल तिथें नसते तर वासंती कशी वागली असती व तिनं काय उत्तर दिलं असतं कोण जाणें. परंतु जयंतांची व तिची ही भेट विलक्षण परिस्थितींत झाली होती. गैरसमज, राग इत्यादि साऱ्या गोष्टी विसरून

परस्परांचा पुष्कळच परिचय आहे अशी भूमिका पत्करून हसत बोलणं चालणं दोघांनाहि भाग होतं.

आपल्या त्या कालच्या पत्राबद्दल दिलगिरी प्रदर्शित करण्यासाठीं जयंतांची भेट घ्यावी कीं त्यांना नुसतं एक पत्र लिहावं याबद्दल विचार करण्यांत वासंतीनं कालच्याप्रमाणेंच आजचाहि सबंध दिवस घालविला होता. तिच्या मनाचा कांहीं केल्या निश्चय होत नव्हता. आणि आतां तिला जयंत अकस्मात् आणि या ठिकाणीं–प्रिन्सिपलसाहेबांच्या समोर–भेटले होते! आणि आपल्या गाडींत चलण्याबद्दल ते सुचवित होते! ...वासंती इतकी गोंधळून गेली कीं उत्तरादाखल एक शब्दसुद्धां तिच्या तोंडावाटे निघेना.

तितक्यांत जयंतांची गाडी आली व जयंत प्रिन्सिपलना म्हणाले, " मग जाऊं तर? Thanks very much. " आणि वासंतीकडे वळून त्यांनी हलकेंच म्हटलें " चला. "

कुणी हातपाय बांधून नेलं असतं तरी वाटली नसती इतकी असहायता तिला त्या क्षणीं वाटली. एकीकडे पायऱ्या उतरत असतांना ती अगदीं रडायच्या घाईला आली होती.

शोफर आपण होऊन मागच्या सीटवर बसला व मग तिला पुढच्या बाजूस जयंताच्याजवळ बसण भाग पडल. एखाद्या कटांत सामील असलेल्या माणसाचा यावा तसा वासंतीला त्या शोफरचा राग आला.

गाडी सुरू होऊन प्रिन्सिपलचा बंगला जरासा मागें पडला त्याबरोबर ती म्हणाली,

" मी ग्राउंडच्या त्या कोपऱ्यावर उतरतें, तिथें उभी करा. "

" तें कां? जयंतांनीं तिच्याकडे न पाहतांच विचारलं.

" मला ही नोटिस लावायची आहे ना. "

" इतकी तातडीची आहे काय ती? "

" तर! "

" छे. आणखी एक तासान ती लावली तरी कांहीं बिघडत नाही. मला माहीत आहे. "

वासंतीनं कपाळाला आठी चालून त्यांच्याकडे चटकन् पाहिलं. त्यांची दृष्टि समोर रस्त्याकडे होती. जणू आपल्या बोलण्यांचा तिच्यावर काय परिणाम होणार तें तिच्याकडे न पाहतांच त्यांना कळत होतं. मुद्दाम खोडी काढल्याप्रमाणें ते मनाशीं हसत असावेत असं वासंतीला वाटलं. गाडी कॉले-

जच्या आवारांतून बाहेर पडून रहदारीच्या रस्त्यानं केव्हांच जाऊं लागली होती. मधेंच रस्त्यांतून कोणी नमस्कार केला कीं, जयंत मोटार हाकण्याच्या चाकावरचा उजवा हात एटीनं उचलीत व चटकन् हसत. ते चेहऱ्यावर हास्य आणीत व मग ते ओसरूं देत त्या वेळीं त्यांच्या ओठांची हालचाल मोठी पाहण्यासारखी होती असं वासंतीला वाटलं, व त्यांच्यातली ही विशेष गोष्ट आपल्या लक्षांत यापूर्वींच कशी आली नाहीं याचं तिला जरा नवल वाटलं. मात्र आतां त्यांचं तें हास्य पुन्हा दृष्टीला पडावं असं तिला मुळींच वाटलं नाहीं. किंबहुना तें पुन्हा दृष्टीस पडूं नये या हेतूनं तिनं आपली मान डाव्या हाताला वळविली. तिनं ती तशी वळवायला आणि तिच्या कॉलेजांतले सात आठ विद्यार्थी समोरून यायला एकच गाठ पडली. तिला पाहतांच त्यांनीं एकमेकाला कोपरानं खुणविलं तें वासंतीला स्पष्ट दिसलं. त्यांची तेवढ्या क्षणार्धांत एकमेकांत जी नेत्रपल्लवी झाली तिचा अर्थ वासंतीला कळणं अवघड नव्हतं. पुढें गेल्यावर ते विद्यार्थी आपआपसांत काय बोलले असतील तेंही तिला माहीत होतं. तिनं पुन्हा मान वळवून जयंतांकडे पाहिलं. त्यांच्या तोंडावर अजूनही तें सूक्ष्म हास्य होतं तिला वाटलं रागानं त्यांना विचारावं—पण मागच्या बाजूस शोफर बसला होता हें तिला विसरतां येत नव्हतं. जयंतांनीं आपल्याला सापळ्यांत पकडल्यासारखं तिला वाटलं. या गोष्टीची जाणीव असल्यामुळेंच ते हसत होते काय?... मनांतला राग व चीड आवरणं तिला कठीण झालं. शोफरला समजूं नये म्हणून तिनं इंग्रजींत विचारलं,

"वसतिगृहाच्या जवळ मला सोडा असं मीं म्हटलं तें तुम्ही ऐकलं नाहीं काय?"

"ऐकलं कीं."

"मग?"

"तुम्हांला घाई नाहीं, मला ठाऊक आहे. मी तुम्हांला आमच्या घरीं नेणार आहे."

वासंतीला वाटलं, 'हा जुलूम काय म्हणून?' असं त्यांना विचारावं, परंतु मागं बसलेल्या शोफरला इंग्रजी कळत नसलं तरी रागाचा स्वर कांहीं त्याला इंग्रजी वाटणार नव्हता. आपल्या मनांतला राग आवरून ती मग स्वस्थ बसली.

घरीं पोंचून दिवाणखान्यांत शिरल्याबरोबर जयंत म्हणाले, "खूप रागावला असाल तुम्ही ?"

"अन् तुम्ही हसतां आहांत !"

"उगीच रागावलांत त्याचं हसू येतं. मीं तुम्हांला कां आणलं माहीत आहे ?"

"सांगाल तर कळेल."

"पण बसाल तर खऱ्या...असं काय ? बसा ना. एवढा काय मीं तुमचा अपराध केला ?"

खरंच, नीट विचार केला तर त्यांनीं तिचा एवढा काय गुन्हा केला होता? तिला त्यांनीं आपल्या गाडींत घेऊन घरीं आणलं होतं एवढंच ना?...

असं तिच्या मनानं विचारल्याबरोबर वासंतीच्या रागाच्या निखाऱ्यावर एकदम पाणी पडल्यासारखं झालं. गाडींतून येतांना वाटेनं तिनं जी स्तब्धता धारण केली होती ती शांतपणाची नव्हती तर रागाची उसळी बाहेर पडूं देण्यासाठीं थोडं थांबलं पाहिजे अशा नाईलाजाच्या संयमाची होती. जयंतांच्या घरीं पोंचल्याबरोबर त्यांना रागानं खूप बोलायचं तिनं ठरविलं होतं. पण, 'एवढा काय मीं तुमचा अपराध केला ?' हे त्यांचे साधे शब्द ऐकल्याबरोबर मनाशीं ठरवून ठेवलेलीं रागाचीं बोलणीं ती एकदम विसरली. तिची चर्या पालटली. ती हलकेच खालीं बसली.

टेबलावरचं एक पत्र उचलून जयंत म्हणाले, "हें तुमचं पत्र—"

"हो, त्याबद्दल तुमची क्षमा मागण्यासाठीं मी तुम्हांला केव्हां तरी भेटणारच होतें. माझा कसा गैरसमज झाला तें मी सांगत बसत नाहीं. परंतु या भिंतीवरचा हा फोटो तुमच्या पत्नीचा आहे असं मी समजत होतें. त्या तुमच्या—"

"कोण ? उषावहिनी ?" असं म्हणून जयंत मोठमोठ्यानं हसूं लागले, व पुढें म्हणाले, "वा ! अगदीं एखाद्या कादंबरींत घालण्यासारखी ही 'सिच्युएशन' आहे खरी."

वासंतीनं कांहीं वेळ मान दुसरीकडे ठेवून त्यांची दृष्टि टाळली, पण मग त्यांची तिची नजरानजर होतांच तिला हसूं येऊं लागलं.

जयंत म्हणाले, "परंतु मी कांहीं खुलासा न करतांच तुमचा गैरसमज नाहींसा कसा झाला ?"

"काल 'स्त्री' मासिकाच्या अंकांतला त्यांचा परिचय वाचला तेव्हां--"

"Oh! I see." ते हसले. "मासिकांचे संपादक कधीं न कळत अपकार त्याप्रमाणेंच कधीं नकळत उपकारही करतात ते असे. पण तें जाऊं दे. आतां तरी माझ्यावरचा राग गेला कीं नाहीं?

वासंतीनं मान हालविली, पण एकीकडे मानेनं नाहीं म्हणतांता दुसरीकडे हसूं आलं तें तिला आवरतां आलं नाहीं.

आणि मग त्यांच्याशीं बोलतां बोलतां अर्धापाऊण तास झाला तरी ती फक्त एकदांच मध्यें म्हणाली, "आतां जाऊं द्या मला." आणि जयंतांनीं हसून, "जाल हो; बसा कीं जरा" असं म्हटलं तेव्हां तिनं त्यांचं म्हणणं ऐकलं.

---

# ११

पांच सहा दिवसांनीं नाताळची सुटी झाली, व वासंती आपल्या गांवीं आली. दिवाळीच्या सुटींत सुरू केलेला रात्रीचा वर्ग पुन्हा आठ दहा दिवस चालविण्याचा तिनं मनाशीं बेत केला होता, व त्याप्रमाणें आल्या दिवशीं रात्रींच तिनं कामाला प्रारंभ केला.

परंतु दुसऱ्याच दिवशीं तिला वर्ग बंद ठेवावा लागला. तिच्या वडिलांच्या कुळांपैकीं एका शेतकऱ्याची तरणी ताठी मुलगी अकस्मात् मेली. ती नित्याप्रमाणें तंबाखूच्या मळ्यांत कामावर गेली होती, परंतु तिथेंच तिला पटकीचीं लक्षणं होऊन रात्रीच्या सुमाराला तिचा अंतही झाला होता. दुसऱ्या दिवशीं आजूबाजूच्या खेड्यांतील चारपांच माणसं, अन् तिच्या स्वतःच्या मळ्यांतील एक बाई दगावल्याचं तिनं ऐकलं. कॉलऱ्याची सांथ उद्‌भवणार अशीं स्पष्ट चिन्हं दिसूं लागलीं. शेतकऱ्यांना साक्षर व सज्ञान करण्याऐवजीं त्यांचे प्राण वांचविण्याची ही वेळ होती. निबोणी बऱ्यापैकीं गांव असलं तरी तिथें डॉक्टरी इलाजांची व्यवस्था यथातथाच होती, आणि भोंवतालच्या लहान लहान खेड्यांत तर मृत्यूला मन मानेल त्याप्रमाणें वावरायला कसलाच प्रतिबंध नव्हता. वासंती अगदीं घाबरून गेली. शेतक-

त्यांचे प्राण वाचविण्यासाठीं पराकाष्ठेचे प्रयत्न करणं आवश्यक होतं. पण ती स्वतः काय करूं शकत होती ? ती श्रीमंत होती, शिकलेली होती, दारिद्र्याच्या मीमांसेचे ग्रंथ तिनं वाचले होते, भांडवलशाही, लोकशाही, कामकऱ्यांचं राज्य इत्यादि शद्बांवर ती व्याख्यानं देऊं शकत होती; परंतु या ज्ञानाचा, इतकंच नव्हे तर तिच्या अंतःकरणांतल्या शेतकऱ्यांच्या कैवाराचा या विचित्र संकटांत काय उपयोग होता ? आपण किती दुर्बल आहों असं तिला वाटूं लागलं आणि करावं तरी काय असं तिला होऊन गेलं.

आणि मग एकदम तिच्या मनांत आलं, डॉ. जयंतना बोलावून घेतलं तर ?....पण---

तिनं आपल्या खोलींतल्या कॅलेंडरकडें पाहिलं. डिसेंबरची २७ तारीख होती.

डॉ. जयंत अजून पुण्यास असतील ? ते मुंबईला मेडिकल कॉन्फरन्ससाठीं जाणार होते. केव्हां बरं होणार होती ती कॉन्फरन्स ? डिसेंबरच्या अठ्ठावीस तारखेला काय ? ती इकडे यायला निघाली त्या दिवशीं त्यांच्याशीं तिचं झालेलं बोलणं ती आठवून पाहूं लागली.

"आतां दहा दिवस तुमची आमची भेट नाहीं." जयंत म्हणाले होते, अन् तें म्हणतांना जणूं एखादा प्रश्न विचारल्याप्रमाणें त्यांचा स्वर होता.

ती म्हणाली होती, "होय, अन् सुटी संपल्याबरोबर तरी बापू मला कुठले निघूं द्यायला ?"

"ठीक आहे. बापूसाहेबांना माझा नमस्कार सांगा. त्यांना म्हणावं तुमचं आग्रहाचं आमंत्रण पोंचलं. पण पुढें केव्हां तरी येईन. नाताळांत अगदींच शक्य नाहीं. आमची मेडिकल कॉन्फरन्स आहे. तिला जायलाच पाहिजे."

"कां ? गेलं नाहीं तर काय होईल ?"

"नसतोंहि गेलों. पण मीं एक निबंध लिहून पाठविला आहे, आणि त्याच्यावरची चर्चा कार्यक्रमांत दाखल केली गेली आहे."

"निबंध कशावर लिहिला आहांत ? मला कांहीं दादसुद्धां लागूं दिली नाहींत काय ?"

"तुम्ही नुसता निबंधाचा मथळा वाचलांत तरी त्यांतले लॅटिन शद्ब वाचून तुमच्या अंगावर शहारे येतील इतका शास्त्रीय चिकित्सेचा आहे तो निबंध. म्हणून तुम्हांला दिला नाहीं तो वाचायला. एवढे कांहीं डोळे वटारावयाला नकोत."

" तें कां ? निबंधाचा विषय मला समण्यासारखा नाहीं असं एकवेळ गृहीत धरलं तरी ज्यामुळें एवढ्या मोठ्या कॉन्फरन्समधें तुमचं नांव होईल असं कांहीं तरी तुम्ही लिहिलं आहे एवढं तर मला कळलं असतं कीं नाहीं ? तुम्ही दादसुद्धां लागू दिली नाहीत काय ? समजलं !"

" उगीच काय रागावण्यासाठीं निमित्त शोधायचं ?"

असं म्हणून त्यांनी नंतर जो विनोद करून तिला हसायला लावलं होतं तोच आतां वासंतीला इतक्या स्पष्टपणें आठवू लागला, कीं नंतरच्या त्यांच्या व आपल्या बोलण्यांत कॉन्फरन्सचा पुन्हा उल्लेख झाला कीं नाहीं तें वासंतीला आठवेना.

पण बहुतेक अठ्ठावीस तारखेलाच ती परिषद असावी....म्हणजे उद्यांच कीं. आणि उद्यांच असेल तर जयंत मुंबईला गेलेहि असतील !....

पण प्रयत्न करून पाहायला काय हरकत आहे अशा विचारानं आबा कारकुनांना त्यांना बोलावण्यासाठीं पुण्याला धाडण्यास तिनं बापूसाहेबांची संमति मिळविली आणि त्यांच्याबरोबर देण्यासाठीं डॉ. जयंतना पत्र लिहिलं,

"तुम्ही कदाचित् कॉन्फरन्सच्या कामासाठीं मुंबईला अजून गेला नसाल अशा कल्पनेनं तुम्हांला हें पत्र लिहितें आहे. तुम्हांला एक विनंति करायची आहे. ती विनंति नव्हे तर अगदीं हात जोडून केलेली कळकळीची प्रार्थना आहे असं समजा. इकडे तावडतोब निघून याल काय ? मला तुमचा सहवास हवा म्हणून मीं तुम्हांला बोलावितें आहे अशी समजूत करून घेऊं नका. मला तुमची भेट केव्हांहि फार हवीशी वाटेलच; परंतु आत्तां मी तुम्हांला बोलावीत आहे ते माझ्यासाठीं नव्हे, तर सार्वजनिक हिताच्या एका तात-डीच्या कामासाठीं. आमच्या गांवांत अन् विशेषतः भोंवतालच्या खेड्यापा-ड्यांत कॉलऱ्याची सांथ जोरांत सुरू होणार अशीं चिन्हं दिसतात. दहा-वीस मृत्यु झाले. वेळेवरच इलाज केले नाहीं तर शेंकड्यावारी लोक पटापट मरतील. इथले डॉक्टर खिशांत स्टेथॉस्कोपची नळी ठेवतात म्हणूनच त्यांना डॉक्टर म्हणायचं. त्यांचा कांहीं उपयोग नाहीं. सगळ्या खेड्यापाड्यांत हिंडून स्त्रीपुरुषांना अन् मुलाबाळांना टोंचून टाकलं तरच हाहाःकार टळेल असं वाटतं. आणि ही गोष्ट तुम्ही आलांत, अन् तुम्ही व मी मिळून हिंडलों तरच होण्यासारखी आहे. म्हणून म्हणतें तुम्ही यायलाच पाहिजे. तुम्ही आधींच मुंबईला निघून गेला असाल तर हें पत्र तुम्हांला दोन दिवस उशिरां

मुंबईला मिळेल. तसं झालं तर तिथलं काम आटोपल्याबरोबर निघून या. तुम्ही पुण्यासच असाल तर माझं अन् इकडल्या हजारों गरीबांचं भाग्य म्हणायचं. पत्रदेखत निघून याल ? मी तुम्हांला अगदीं विचित्र पेचांत टाकतें आहे. पण मी तरी काय करूं ? मी एकटी इथें किती दुबळी आहे. हें तुम्हांला सांगायला नको. याल ना ? माझ्यासाठीं !

तुमची
**वासंती**"

तें पत्र देऊन तिनं आबांना रवाना केलं, आणि मग मात्र तिला वाटू लागलं, आपण उगीच तें पत्र पाठविलं. त्या पत्राप्रमाणें जयंत आले तर प्रश्नच नव्हता. पण न आले तर ? तिला एकदम भीति वाटू लागली कीं ते येणार नाहींतच. आधीं मुळीं ते आबांना पुण्यास सापडणार नाहींत. अन् जरी सापडले तरी पत्र पोहोंचतांच ते खुशाल मुंबईची परिषद टाकून इकडे येतील हें कसं शक्य आहे ? उलट आपलं पत्र वाचून ते मनाशीं म्हणतील, 'हिला कांहीं कळतं कीं नाहीं ?' त्यांनीं तिला सांगितलं होतं कीं, ते जो निबंध वाचणार होते त्याचा विषय फार महत्त्वाचा समजला जात होता, व हिंदुस्थानांतल्या दूरदूरच्या ठिकाणांहून आलेले डॉक्टर त्यावरील चर्चेत भाग घेऊन आपापलीं मतं सांगणार होते. इतकं महत्त्वाचं काम ऐन वेळीं रहित करून तिच्या पत्राप्रमाणें ते इकडे निघून येतील ही कल्पना आपण केली तरी कशी असं वासंतीला वाटू लागलं. आपण आपल्या मनांतल्या कोणत्या कल्पनेवर एकदम इतकं विसंबलों, आणि सकृत्दर्शनीं वेडेपणाचं वाटणारं तें पत्र लिहिलं, याचा आतां पश्चात्तापाच्या क्षणीं ती शोध करूं लागली; आणि वाजवीपेक्षां जास्ती कांहीं तरी आपण गृहीत धरीत नाहीं ना असा प्रश्न ती स्वतःला करूं लागली......

ज्या दिवशीं तिची व जयंतांची प्रिन्सिपलच्या बंगल्याच्या दारांत अचानक गाठ पडली, अन् त्यांनीं तिला आपल्याबरोबर मोटारींत नेलं त्या दिवसानंतरच्या पांचसहा दिवसांत घडलेल्या गोष्टींच्या आठवणी तिच्या मनांत आल्या. ज्याप्रमाणें त्या दिवशीं त्यांच्या गाडींतून जाण्याबाबत तिचा नाइलाज झाला होता, त्याप्रमाणेंच नंतरच्या गाठीभेटींच्या बाबतींतही झालं होतं. आणि आपल्या मनांतल्या विरोधाचा कांहीं उपयोग होत नाहीं याचा पुनःपुन्हा प्रत्यय आल्यावर तो विरोधच सोडून देण्याचं तिच्या मनानं ठरविलं होतं. स्वतःच्या मनाची ही नवी वृत्ति तिच्या लक्षांत यायला थोडा

वेळ लागला ; परंतु ती लक्षांत आली तोंपर्यंत जयंतांचा सुस्वभाव, त्यांची बुद्धिमत्ता, त्यांचीं स्वतंत्र मतं, उद्योगाची आवड, महत्त्वाकांक्षा इत्यादि गोष्टींचा मोह तिच्या मनावर केव्हांच पडला होता, व सामान्यतः पुरुषांच्या बाबतींत जी वृत्ति स्वीकारण्याचं तिनं मनांत आणलं होतं ती त्यांच्या बाबतींत तिला धारण करतां येण्याची शक्यता केव्हांच संपली होती. तिचा हट्ट गुटत गेला होता. तिला आपल्या सहवासांतील प्रत्येक क्षण अतिशय सुखाचा व्हावा यासाठीं जयंत चतुराईनं अनेक गोष्टी करीत, त्यांचं चातुर्य आपण ओळखलं असं वासंती स्पष्ट न बोलतां त्यांना सुचवी, व परस्परांच्या भावना परस्परांकडून गुपचिप ओळखल्या जात.

या भावनांवर विसंबून वासंतीनं आजचं तें पत्र जयंतांना लिहिलं होतं. त्यामुळें तें पत्र रवाना केल्यावर जयंतांच्या आपल्याविषयींच्या भावनांची त्या पत्रामुळें परीक्षा होणार आहे हें कांहीं बरं नव्हे असं तिला वाटलं. कदाचित् परिषदेला जाण्याचा बेत रहित करणं अगदी अशक्य असेल म्हणून ते येणार नाहींत. परंतु तसं झालं तर आपल्याला मात्र वाटत राहील कीं, जयंतांनीं आपल्या शब्दापेक्षां दुसऱ्या गोष्टी अधिक महत्त्वाच्या मानल्या.. आणि त्यांच्या कामाचं महत्त्व न ओळखतां आपण त्यांना केलेली विनंति त्यांना खरोखरीच असमंजसपणाची वाटली म्हणजे ? ते न आल्याचं एक वेळ दुःख नाहीं, परंतु आपल्यावर अप्रबुद्धपणाचा आरोप त्यांनीं केला तर..

एखादी नको असलेली गोष्ट कदाचित् घडेल अशी शंका मनुष्याच्या मनानं एकदां पकडली कीं ती घडण्याचाच संभव अधिकाअधिक वाटूं लागतो. वासंतीचं असंच झालं. जयंत येणार नाहींत, व त्यांच्या दृष्टीनं आपलं तें पत्र अगदीं मूर्खपणाचं ठरेल याबद्दल तिला जास्तजास्त खात्री वाटूं लागली. ते विवाहित आहेत अशा समजुतीनं भलत्याच कठोरपणाचं तें पत्र त्या दिवशीं लिहून तिनं पोस्टांत टाकलं होतं ; आणि आतां भलतीच मूर्खपणाची विनंति करणारं हें पत्र ती आबांबरोबर रवाना करून बसली होती. असे कसे वेडेपणाचे झटके तिला येतात, अन् त्या भरांत ज्याचा पश्चात्ताप वाटावा अशीं पत्रं ती लिहिते ? त्या दिवशीचं तें पत्र पोस्टाच्या पेटींतून काढून परत आणावं असं तिला वाटलं होतं, त्याप्रमाणेंच आबांच्या हातीं धाडलेलं आजचं तें पत्र मागवावं असं तिला वाटूं लागलं. पण ही गोष्ट आतां तिच्या हातची नव्हती. आबा परत येईपर्यंत स्वस्थ बसणं तिला भाग होतं. तिला अगदीं खात्री वाटूं लागली कीं आबा परत येतील व त्यांच्या-

बरोबर जयंतांकडून जें पत्र येईल त्यांत लिहिलेलं असेल, "अशी कशी भलतीच विनंति तुम्हीं केली ?..." आणि मग आपल्याला किती दुःख होईल ! त्या दुःखाच्या नुसत्या कल्पनेनंच तिचा तो सारा दिवस अगदीं अस्वस्थतेंत गेला.

संध्याकाळ झाली तेव्हां तिला वाटलं बाहेर पडून हिंडायला जावं. परंतु लगेच तिच्या मनांत आलं, नको. जयंतांचा निरोप घेऊन आबा केव्हां येतील त्याचा नियम नव्हता. म्हणून ती बाहेरच्या ओटीवरच एक पुस्तक घेऊन वाचीत बसली. पण तिचं वाचण्याकडेही लक्ष नव्हतं, किंवा धाकटी माली तिला जे प्रश्न करीत होती त्यांकडेही नव्हतं. मालीनं तिसऱ्यांदा प्रश्न केला—

"हें काय ग ताई ? फिरायला जाऊं म्हणालीस ना ? मग चल कीं."

तिनं त्रासून म्हटलं "अग काय म्हणतेस ?"

"फिरायला चलतेस ना? केव्हां, रात्र पडल्यावर येणार आहेस वाटतं ?"

"मी आज जाणार नाहीं ग फिरायला."

"मग मघाशीं कशाला म्हणालीस, चल जाऊं म्हणून ? तुझं नेहमींचं असं आहे. चल ना ग. असं काय करतेस ? बाबू वाण्याच्या दुकानांत चॉकोलेट घेऊन देईन म्हणालीस तें आतां विसरलीस वाटतं ?"

"अस्सं ! चॉकोलेटसाठीं तुला बाहेर जायचं आहे होय ? मग तूं महादूबरोबर जा ना, अन् घेऊन ये. मी पैसे देतें त्याच्याजवळ. अरे महादू—"

परंतु नेहमीं पडवीच्या जवळपास वावरणारा महादू तिला कुठें दिसेना. वासंतीनं इकडे तिकडे दृष्टि टाकली अन् मग डाव्या हाताच्या सोप्यांत दिवे पुशीत भरीत बसलेल्या बापू गड्याला तिनं विचारलं.

"महादू कुठें दिसत नाहीं रे ? वर किंवा अंगणांत कुठें असला तर बोलावून आण पाहूं. त्याला म्हणावं या मालीला—"

बापूनं हातांतल्या कंदिलाची चिमणी पक्की करीत विचारलं, "म्हादूला बोलाव म्हनालांत ताईसाहेब ?"

"होय रे ! त्याला सांग कीं, मालीला घेऊन—"

रॉकेलनं घाण झालेलीं बोटं एका मळकट फडक्यावर उलटीं सुलटीं करून पुशीत बापू जवळ आला व अगदीं हलक्या आवाजांत म्हणाला,

"म्हादू इच्यारलात न्हवं का ? तुमास्नी कळलं न्हाई ?"

त्याची चर्या कांहीं विलक्षणच दिसली व त्यानं आवाजही अगदीं चमत्कारिक काढला होता. वासंतीनं विचारलं, " काय ? "

आवाज आणखी हलका व कांहींसा रडवा करून बापू म्हणाला,

" त्येची नात आजारी झालिया ना ! तिसऱ्यापारीं त्येची सून रडत धावत आली त्येला बोलवाया. त्ये ऐकल्याबराबर त्येनं कपाळावर हात मारूनशान् ' अर राम ' म्हून बैटकच मारली. पर मंग त्यो कसाबसा उटला अन् आपल्या सुनबराबर धावतपळत घरीं ग्येला... "

तें ऐकतांच वासंतीचा श्वास अवरोधल्यामारखा झाला.

महादूची नात तिनं पाह्यली होती. मोठ्या नवसासायासांनीं तें मूल झालं होतं महादूच्या सुनेला. काळीसावळीच पण मोठी चुणचुणीत पोर होती ती. तिच्या डोक्यावरची एक बट सदा पुढं येऊन वाऱ्यावर उडत असे. तिचं नांव रखमा होतं पण तिचा आजा तिला लाडानं ' रखू ' म्हणून हाक मारी.

आणि आतां तो चिमणा जीव मृत्युमुखीं पडणार होता ! ..

ती स्वत: या बाबतींत किती असहाय होती ? .. तिला जयंतांची फार आवेगानं आठवण झाली——नव्हे तिनं ती मनांतल्या मनांत मुद्दाम केली. तिच्या मनाचा तो एक मूर्खपणाचाच चाळा खरा, पण तिला वाटलं एखाद्या व्यक्तीचा अगदीं मनापासून विचार केला, कीं त्या व्यक्तीच्या मनापर्यंत तो पोंचतो या समजुतींत कदाचित् कांहीं तथ्य असेलहि.....

तिनं बापूला विचारलं, " महादूचं घर किती लांब आहे रे ? "

" असल मैल दीड मैल. पिरंगाईच्या वढ्याच्या पल्याड ती एक इहीर न्हाइका ? हां, तथंच....... "

वासंतीच्या मनांत आलं आपण असंच्या असच तिकडे जावं ? पण आपण जाऊन काय करूं शकूं ?

इतक्यांत दाराशीं मोटार थांबल्याचा आवाज तिला ऐकूं आला. तिला वाटलं, तो निव्वळ भास असेल. इतकी चांगली गोष्ट कुठली घडायला ? पण तिनं दाराकडे लक्षपूर्वक पाहिलं तों ती घडली होती. दारापाशीं जयंतांची गाडी उभी राहिलेली होती. आबा कारकून पुढच्या दाराच्या पायऱ्या चढत होते ; आणि गाडीच्या पुढच्या बाजूस..होय जयंतच होते ते. आपली विनंति मान्य करून ते आले होते तर ! क्षणमात्रच पण लोकांवर गुदरलेल्या

आपत्तीचा विचार नाहींसा होऊन आपल्या स्वतःच्या भावनांचं समाधान झाल्याची जाणीव वासंतीच्या मनांत स्पष्टपणें उठली. ती अतिशय आनंदानं अंगणांत उतरून दाराकडे निघाली. जयंत जवळ आले तेव्हां "आलात ? किती बरं झालं !" येवढेच शब्द तिच्या तोंडून बाहेर पडले, परंतु त्यांचा समग्र अभिप्राय ध्यानांत आल्याप्रमाणें हास्य करून जयंत म्हणाले "आलों ना !"

✡ ✡ ✡

सकाळीं उठल्याबरोबर वासंती आपल्या खोलींतून दिवाणखान्यात गेली. परंतु बापूसाहेब तिला तेथें दिसले नाहींत. खालच्या ओटीवर ती गेली तेथें मात्र ते तिला आढळले. तिनं त्यांना विचारलं.

"रखमाची काय बातमी ?"

ते म्हणाले, "आत्तांच बापू आला. त्यानं सांगितलं रखमाला आतां पुष्कळ आराम पडला आहे. आतां भ्यायचं बिलकुल कारण नाही. जयंत म्हणालेच होते ना तिला सकाळपर्यंत अगदी बरं वाटेल म्हणून ?"

होय, तसा धीर त्यांनीं दिला होता खराच. परंतु तिच्या मनाला तो कुठें पुरेसा वाटला होता ! जयंत आपल्या बोलावण्याप्रमाणें आले या गोष्टीचा तिला आनंद झाला होता खरा, परंतु आपण त्यांना घेऊन महादूच्या झोपडीवर पोंचेपर्यंत रखमाचं दुखणं इलाजापलीकडे तर गेलेलं नसेल अशी धास्ती तिला वाटली होती. जयंत आल्यावर त्यांना कसाबसा चहा देऊन महादूच्या मुलीला पाहायसाठीं घाईनं नेणं वावगं तर दिसणार नाहीं असा विचारसुद्धां तिनं केला नव्हता. वाटेनं ती कांहींशी स्तब्धच होती. तिनं आपणहून फक्त एकच प्रश्न विचारला होता.

"तुमची परिषद सोडून तुम्हाला मीं इकडे यायला लावलं म्हणून माझा राग आला असेल, नाहीं ?"

आणि यावर सरळ उत्तर देण्याऐवजी जयंत म्हणाले होते,

"मी आलों नसतों तर तुम्ही किती रागावलां असतां तें सांगा मला."

तिनं म्हटलं होतं, "मी होय ? मीं रागावलें नसतें, पण...पण वाईट वाटलं असतं फार..."

आणि या उत्तरांतही जी एक कबुली होती ती छपविण्याच्या हेतूनं ती लगेच म्हणाली होती, "वाईट वाटलं असतं तें माझ्या स्वतःसाठीं नव्हे, तर इथल्या गरीब लोकांवर आलेली आपत्ति मी दूर करूं शकत नाहीं या विचारानं."

जयंतांनीं तिच्याकडे झटकन् एक अर्थपूर्ण कटाक्ष टाकला होता, व मग हसत इतर गोष्टी बोलायला सुरवात केली होती. कॉलरा कशामुळें उत्पन्न होतो, तो कोणत्या कारणांनीं पसरतो, त्यावरच्या उपायांचं संशोधन आज-पर्यंत किती झालेलं आहे, आज जो उपाय उपलब्ध आहे त्यांत अजून कोणती कमतरता आहे इत्यादि विषयांबद्दल ते बोलत राहिले होते. त्यांच्या बोलण्याकडे वासंतीचं लक्ष अर्थातच होतं; परंतु ती स्तब्ध व गंभीर होती. जयंत आले खरे, परंतु रखमाचे प्राण वांचविण्याइतके लवकर आले कीं नाहीं तिला कळत नव्हतं. ती मुलगी मृत्युमुखांतून परत काढली गेल्या-खेरीज तिचा आनंद पूर्ण होणार नव्हता.

गोधडीवर पडलेल्या रखमाकडे जयंत पहात होते तेव्हां त्या विव्हल जीवाकडे ते पाहत नसतील इतक्या शोधक नजरेनं वासंती त्यांच्याकडे पाहत होती. त्यांच्या मनांतले विचार समजावेत म्हणून ती अगदीं अधीर झाली होती. ते जेव्हां वळले तेव्हा तिला अगदीं राहवेना. त्यांच्या कोटाचं टोक धरल्यासारखं करून तिनं विचारलं होत,

" रखमा वांचेल ?....."

त्यांनीं नुसती होय म्हणून मान हलविली होती. त्यांची चर्या गंभीर नव्हती. थोडंसं हास्यहि त्यांच्या तोंडावर दिसलं होतं. पण ते स्पष्ट "होय, वाचेल " असं का म्हणाले नाहींत अशा शंकेनं वासंतीचं मन कष्टी झालं.

नंतर इंजेक्शन दिल्यावर काही वेळ जयंत रखमाकडे पाहत राहिले; पण त्यांनीं नजर वर केली तेव्हा वासंती आपल्याकडे अगदीं चिंतातुर दृष्टीनं पहात आहे हें दिल्याबरोबर ते म्हणाले,

" आतां रखमा खचित वांचेल ! सांग तिच्या बापाला—सांगा..."

त्यांच्या त्या एकेरी शब्दानं वासंती क्षणमात्र चमकली, परंतु तो प्रसंग असा होता कीं त्या विस्मयाचं कोडकौतुक करण्याला अवकाश नव्हता. त्यांचा एकेरी शब्द ऐकून आपल्याला राग आला कीं सुख झालं हें स्वतः-शींच ठरविण्याची देखील त्या प्रसंगीं सवड नव्हती. मग ओझरत्या दृष्टिक-टाक्षानं आपला अभिप्राय जयंतांना कळविण्याची गोष्ट तर दूरच. वासंती चटकन् महादूकडे वळली व म्हणाली,

" महादू, तुझी रखमा तुला परत मिळाली. यांनीं दिली."

महादूनं नुसती मान हलविली. तो इतका गहिंवरला होता कीं त्याच्या तोंडून शब्द फुटणं शक्य नव्हतं. तो चटकन् वाकला, व जयंतांच्या पायांवर मस्तक ठेवूं लागून तो म्हणाला,

"पांडुरंग तुमच्या रूपानं आज माझ्या घरीं आला, अन् माझी नात---माझी रखू--"

तें वाक्य त्याला पुरं करतां आलं नाहीं. जयंतानी त्याचं मस्तक अलगद वर धरलं, अन् ते म्हणाले,

"छे, छे, माझ्या कसलं पायां पडतां? तुम्हांला पाया पडायचंच असेल, तर ज्या महात्म्यानं हें औषध शोधून काढलं त्याचे पाय धरले पाहिजेत तुम्ही."

पण महादूनं तें मानलं नाहीं. त्यानं त्यांच्या पायांवर मस्तक ठेवलं, इतकंच नव्हे तर आपल्या लेकाला व सुनेलाही तसं करायला लावलं, आणि रखमाच्या कानाजवळ तोंड नेऊन तो सद्गदित स्वरांन म्हणाला,

"रखू, बाळ रखू, हा परमेश्वर आपल्या घरीं आला पाहिलास काय ?...."

त्या भोळ्या जीवाचा तो आनंद पाहून वासंतीचाही कंठ भरून आला. दु:खाप्रमाणेंच सुखाचेही कढ अंत:करणांत उठले कीं ते किती असह्य होतात त्याची तिला कल्पना आली. निर्मळ, सात्त्विक सहानुभूतीच्या आनंदानं अंत:करण दाटल्याचा हा अनुभव ती आयुष्यांत प्रथमच घेत होती.

कांहीं वेळानं ती जयंतांच्या बरोबर महादूच्या झोपडींतून बाहेर पडली तेव्हां तिचा आनंद पुरता ओसरला नव्हता, व येतांना ती जितकी स्तब्ध व गंभीर होती तितकीच आतां ती प्रसन्न व उल्हसित होती. जयंतांशीं खूप खूप बोलावं असं तिला वाटत होतं.

सगळ्या खेड्यापाड्यांत फिरून प्रतिबंधक उपाय योजावयाचे झाल्यास कशी व्यवस्था केली पाहिजे त्याबद्दल जयंत बोलत होते. वासंती हुं हुं करीत होती. पण मग तिनं एकदम विचारलं, "पाशाला कां आणला नाहीं ?"

जयंत हसले. "शेवटीं झाली म्हणायची बिचाऱ्याची आठवण ! मी किती वेळ वाट पहात होतों तुम्ही विचाराल म्हणून."

"खरं सांगू ? इतका वेळ मी नीटशी भानावरच नव्हतें. महादूची नात आपल्याला वांचवितां येईल कीं नाहीं ही चिंता, अन् तुम्ही आलांत याबद्दलचा आनंद, यापलीकडे मला कांहीं कांहीं सुचत नव्हतं."

" होय ? मग आतां काय काय सुचतं आहे ?"

" आतां किती तरी गोष्टी सुचताहेत. त्यांपैकीं कांही तर इतक्या क्षुल्लक आहेत, कीं त्या तुम्हांला सांगितल्या तर तुम्ही हसायला लागाल."

" उदाहरणार्थ ?"

" घरीं भाजी कसली केली असेल अन् ती तुम्हांला आवडेल कीं नाहीं..." असं म्हणून वासंती हसून त्यांच्याकडे पहात राहिली.

जयंत हसले पण लगेच म्हणाले, " पण आत्तां मी तुमच्याकडे जेवायला येणार नाहीं."

" म्हणजे ?"

" म्हणजे काय ? तुम्हीं मला बोलावलंत ते लोकांना वांचविण्यासाठीं. तुमच्या पत्रांत जेवण्याचं आमंत्रण नव्हतं बुवा !"

" पण आमंत्रण द्यायला का पाहिजे ? अन् तें आतां दिलं तर नाहीं का चालायचं ?"

जयंतांनीं हसून मान हालविली व म्हटलं, " No, too late ! तुम्हांला मी घरीं पोंचविणार अन् जानबा पाटलांच्याकडे जाणार."

" तर--तर ? आम्हीं जाऊं दिलं पाहिजे ना ? बापूंच्याकडून तुम्हांला असा आग्रह करवीन कीं--"

" बापूंच्याकडून ? मग काय...."

त्या उद्गारांतील अभिप्राय वासंतीला फारच गमतीचा वाटला, व तित-क्यांत सिगारेट पेटविण्यासाठीं त्यांनीं गाडी क्षणभर उभी करून काडी ओढून मान खालीं वर केली तेव्हां तिच्या प्रकाशांत दिसणाऱ्या त्यांच्या चेहऱ्याच्या भागाकडे ती कौतुकानं पाहत राहिली होती.

आतां बापूसाहेबांचं ' रखमा बरी आहे ' हें उत्तर ऐकून ती ओटीवरून न्हाणीघराकडे गेली तेव्हां तिच्या मनांत या साऱ्या आठवणी आल्या, आणि नंतर वर आपल्या खोलींत जाऊन कपडे बदलतांनाही त्याच आठवणी फिरून फिरून काढून ती आपल्या वृत्तीची प्रसन्नता वाढवूं लागली. ती पुनः पुन्हा घड्याळाकडे पाहत होती. आठ वाजतां जयंत येणार होते, व ते आणि ती मिळून खेड्यावर जाणार होतीं.

# १२

वास्तविक वासंती दिवसभरच्या श्रमानीं इतकी दमली होती, आणि दुसऱ्या दिवशींबद्दलचे इतके बेत तिला करायचे होते कीं, अंथरुणावर पडण्यापूर्वी तें पुस्तक हातीं घेतांना तिचं तिलाच वाटलं, आपण हें वाचणार आहोंत काय ?

तिचं शरीर अगदीं थकून गेलेलं होतं. जयंत पुण्याहून आल्यापासून आज पांच दिवस तिनं फार थोडी विश्रांति घेतली होती. जवळजवळ दिवसभर तीं दोघं हिंडत असत. त्यांनीं असे परिश्रम केले म्हणूनच कॉलऱ्याची साथ त्यांना थांबविता आली. पण एक अतिशय लोकोपयोगी कार्य करण्यांत गुंतलों आहों ही निःशंक जाणीव मनाशीं असली, कीं शारीरिक श्रम कसे सुसह्य होतात याचा अनुभव वासंतीला प्रथमच येत होता. एकीकडे तो अनुभव घेतां घेतां तिच्या मनात अनेकदां आलं होतं कीं दिवसभर कष्ट करूनही न थकणाऱ्या मोठमोठ्या लोकसेवकांचीं उदाहरणं आपण ऐकतों. त्यांच्या उत्साहाची गुरुकिल्ली हीच असेल. जयंतांच्या सतत सहवासामुळें आणि त्यांच्या आनंदी, उत्साही बोलण्याचालण्यामुळें आपल्या श्रमांचा सहज परिहार होत आहे हें तिला कळत नव्हतं असं नाहीं; परंतु तें तिला स्पष्ट-पणें कबूल करायचं नव्हतं. उदाहरणार्थ, परवांच दुपारीं ती जयंतांना घेऊन सगळ्यांत लांबच्या ' तिनवली ' गांवीं गेली. तिथलं काम आटोपून परत यायला त्यांना कल्पनेपलीकडे उशीर झाला. गांवापासून सुमारें एका मैलाच्या अंतरावर मोटार उभी करावी लागली होती, आणि तेथपर्यंत शेतांच तुडवीत पायीं जाणं भाग होतं. सूर्य अगदीं डोक्यावर आला होता, आणि ऐन थंडींत-सुद्धां भर दुपारचं ऊन कसे चटके देतं तें वासंतीच्या अनुभवाला येत होतं. एकदोन फर्लांग चालल्याबरोबर तिच्या कपाळावरून घामाच्या धारा ओघळूं लागल्या आणि तिचा चेहरा अगदीं लाल झाला. जयंत तिच्यासाठीं मुद्दाम सावकाश चालत होते तरीसुद्धां त्यांच्या जोडीनं पावलं टाकणं तिला कठीण जात होतं. तिची ती धांदल जयंतांच्या लक्षांत आल्यावांचून राहिली नव्हती. किंचित हसून ते म्हणाले होते,

'' हीं कामं बायकांचीं नाहींत, ''

" पुरुष नेहमीं असंच म्हणत आले आहेत !" असं म्हणून वासंतीनं अगदीं झपाट्यानं पावलं टाकायला प्रारंभ केला होता; पण तितक्यांत एका भल्या मोठ्या ढेकळावर पाऊल चुकून पडून तिचा तोल गेला होता.

जयत हसून म्हणाले होते, " तरी मी रोज सांगतों आहें कीं, छत्री बरोबर घ्या; पण तुम्हीं मुळी माझं ऐकनच नाहीं. निसर्गाशीं भांडण्यांत काय अर्थ आहे ?"

निसर्गाशीं भांडण्यात काय अर्थ आहे ! त्याच्या त्या शद्बांतील प्रासंगिक अर्थाहूनही अधिक खोल अर्थ वासंतीच्या मनांत आला होता, व ती स्वतःशींच विचार करूं लागली होती, यांचा सहवास मला खरोखरच सुखाचा होत असतांना तें सुख न मानण म्हणजे निसर्गाशींच भांडण नव्हे काय ?...

पण जयंत म्हणत होते, " आतां तरी माझं एक म्हणणं ऐकणार का तुम्ही ?"

" काय ?"

जयंत थबकून उभे राहिले व खिशातला मोठा रुमाल काढून म्हणाले, " हा तुम्ही आपल्या डोक्यावर घ्या म्हणजे—"

" अंहं " असं म्हणून तिनं मान हलविली होती व पुढें पाऊल टाकलं होतं.

ते म्हणाले होते, " वेड्यासारखा नाहीं का तुमचा हा हट्ट ? तुम्हांला किती त्रास होत आहे हें स्पष्ट दिसत असतांना—"

वासंतीला वाटलं त्यांना स्पष्टच सांगावं, तुमच्याबरोबर असं हिंडतांना मला किती सुख होत याची तुम्हांला काय कल्पना ? पण ती उघड इतकंच म्हणाली,

" उगीच काय सारख त्रास त्रास. मला या उन्हाचं कांहीं वाटत नाहीं. किती झालं तरी इथें जन्मलेली खेड्यांतली मुलगी आहे मी."

" होय का ?" असं म्हणून जयंत खूप झपाट्यानं पावलं टाकूं लागले होते; मग ती अगदीं दीनवाणीनें म्हणाली होती, "असं काय ? जरा सावकाश चाला कीं ! वाघ मागं लागलाय वाटतं ?"

जागच्या जागीं थबकून मान वळवून तिच्याकडे पाहून त्यांनीं हसत म्हटलं होतं,

" छे, छे, वाघ कुठला ? एक थकलेलं कोंकरूं."

आणि मग ते तिच्या अगदीं जवळ आले होते.

अशा प्रकारें जयंतांच्या संगतींत तिचं अंतःकरण सारख प्रसन्न राहिलं होतं, व शारीरिक श्रम ती विसरतच गेली होती. तथापि शरीराच्या कष्टांची गोष्ट अशी आहे कीं त्यांचा शीण केव्हां ना केव्हां तरी कबूल करावा लागतो. रोज रात्रीं अंथरुणांत पडल्यावर आपल्या देहाला किती थकवा आलेला आहे तें वासंतीच्या ध्यानांत आल्यावांचून राहत नसे. आजही तसंच झालं. तिचा सबंध दिवस जयंतांच्या सहवासांत गेला होता; आणि शिवाय खेड्यापाड्यांत हिंडून लोकांना टोचण्याचं काम आज संपलं होतं त्यामुळें एक प्रकारचं समाधान तिला वाटत होतं. परंतु यामुळें तिच्या मनावर प्रफुल्लता असली तरी तिचा देह श्रांतच झालेला होता. तिला गाढ निद्रेची फार जरूरी होती. शिवाय उद्यांचा दिवस तिला जरा धांदलीचा जाणार होता. इतके दिवस जयंत तिच्या घरी जेवायला एकदांही थांबले नव्हते, पण उद्यां दुपारीं ते येणार होते. त्याच्याबरोबर जानवा पाटीलही येणार होते व त्यांच्या पंक्तीला चांगली मंडळी असावीत म्हणून बापूसाहेबांनी हेडमास्तरांना, देशपांडे वकिलांना व आणखी इतर चारपांच प्रमुख मंडळींना बोलाविलं होतं. उद्यांच्या साऱ्या बेतावर स्वतः देखरेख करायचं वासंतीनं ठरविलं होतं व त्यासाठीं ती लवकर उठणार होती.

सारांश, लवकर झोपीं जाण्याचा तिचा विचार होता. पण असं असूनही कांहीं वेळ तें पुस्तक चाळण्याचा मोह तिला आवरतां आला नाहीं. तिनं तें कालच जयंतांकडून मागून घेतलं होतं. त्या पुस्तकाचं नांव " Some Cases and Conclusions of Abnormal Psychology " ( विकृत मनोव्यापारांचीं कांहीं उदाहरणें आणि सिद्धांत. ) ती जयंतांना म्हणाली होती, " एखादी नवी कादंबरी आणली असलीत पुण्याहून तर द्या ना मला वाचायला."

" Sorry " असं म्हणून त्यांनीं मान हलविली होती व दोन्ही ओठ जुळविले होते. त्यांची ओठ जुळविण्याची ती तऱ्हा आतां वासंतीच्या बरीच परिचयाची झाली होती, व तिला ती आवडूं लागली होती.

तिनं म्हटलं होतं, " कादंबरी नाहीं तर दुसरं कांहीं पुस्तक द्या ! "

"एक देतों. पहा तुम्हांला आवडलं तर. मला स्वतःला तें कादंबरीइतकंच चित्तवेधक वाटलं आहे."

" मग द्या तर. केव्हां देतां ?"

" उद्यां सकाळीं येतांना घेऊन येतों. "

" अं हं. आत्तां परत गेल्याबरोबर जानबांच्या गड्याबरोबर पाठवून द्या. "

" किती घाई तुमची !" असं हसत म्हणून त्यांनीं तिची चेष्टा केली होती, परंतु पुस्तक पाठवून द्यायला ते विसरले नव्हते.

या सान्या गोष्टी एकीकडे आठवतां आठवतां वासंती आज अंथरुणावर पडून त्या पुस्तकाचीं पानं चाळूं लागली.

पुस्तकाचे दोन भाग होते. एकाला 'Man' असं नांव दिलं होतं, दुसऱ्याला 'Woman.' पहिल्यापेक्षां दुसऱ्या भागाविषयीं तिला अधिक जिज्ञासा वाटली व त्याच्याच एकेका प्रकरणावर ती नजर टाकून पाहूं लागली. दुसऱ्या प्रकरणांत Elizabeth अशा मथळ्याखालीं एका स्त्रीची जी हकीगत ग्रंथकर्त्यानं दिली होती ती वाचतां वाचतां वासंतीला वाटलं, ही आपलीच हकीकत नव्हे का ? ह्या हकीकतीच्या शेवटीं ग्रंथकर्त्यानं जी मानसशास्त्रीय मीमांसा केली होती ती मोठ्या उत्सुकतेनें वाचूं लागली.

"स्त्री व पुरुष यांच्यामधील परस्पराकर्षण निसर्गसिद्ध खरेंच; परंतु या आकर्षणाचा आविष्कार दोघांच्या ठिकाणीं निरनिराळ्या तऱ्हेनें होत असतो पुरुषांना सामान्यतः स्त्री-जातीविषयी जितकें आकर्षण वाटतें तितकीच एखाद्या प्रत्यक्ष अशा कोणत्याही स्त्रीच्या संगतीची आवड त्यांना वाटते. स्त्रीच्या अंतःकरणाच्या आधी तिच्या देहाचें आकर्षण पुरुषाच्या मनावर नेहमींच परिणाम करीत असतें. एखादी स्त्री दृष्टीस पडल्याबरोबर कामुक दृष्टीनें तिच्या अंगोपांगाची रचना किती विलोभनीय ठरेल याचा अदमास पुरुष–निदान स्त्रीसहवासाचा अनुभव ज्याला आहे असा पुरुष–घेत असतो. पुरुषाच्या ठिकाणीं निसर्गानेंच एकनिष्ठतेऐवजीं वैचित्र्याची आसक्ति ठेविली आहे त्याचा हा कदाचित् परिणाम असेल. परंतु तें कसेंही असलें तरी एवढें खरें कीं, स्त्रीविषयींच्या आकर्षणाचा पगडा कोणत्याही प्रत्यक्ष स्त्रीच्या बाबतींत पुरुषावर झटकन् बसतो; व तें आकर्षण शरीरधर्मांनीं प्रगट करण्याची त्याला उत्सुकता बरीचशी अनिर्बंध व तारतम्याचा विचार न करणारी असते.

पण हें परस्पराकर्षण स्त्रीच्या बाबतींत बऱ्याचशा निराळ्या तऱ्हेनें व्यक्त होत असतें. सामान्यतः पुरुषजातीविषयीं स्त्रीला मोह असतो हें खरें. परंतु

प्रत्यक्ष अशा एखाद्या पुरुषाविषयीं स्त्रीला विलोभन वाटण्यास अनेक गोष्टी घडाव्या लागतात जिला पुरुषाच्या सहवासाचा अनुभव आहे, अशी स्त्रीसुद्धां पुरुष दृष्टीस पडल्याबरोबर कामुक दृष्टीला पटण्यासारखें त्याचें जें सौंदर्य असेल तें सहसा शोधीत नाहीं. निसर्गानें स्त्रीच्या ठिकाणी जी एकनिष्ठा ठेविली आहे तिचाच हा परिणाम म्हणावा लागेल. एखाद्या पुरुषाविषयीं स्त्रीला आकर्षण वाटलें तरी तें शरीरचेष्टांच्या रूपानें प्रगट व्हावें असें तिला वाटत नाहीं. याचाच अर्थ असा कीं, स्त्रीच्या ठिकाणीं निसर्गतःच एक प्रकारचा थंडपणा ( Frigidity ) आहे. हा थंडपणा कांहीं स्त्रियांत विशेष अंशानें असल्याचें आढळून येतें. अशा स्त्रियांना पुरुषाचें चुंबनदेखील सुखदायक वाटत नाहीं, आणि मग त्यांच्या आयुष्यांत त्यांना अनेक वेळां दुःख व मनस्ताप भोगावा लागतो..."

वासंती अत्यंत आश्चर्यचकित झाली. अशोकच्या व चंद्रकांताच्या बाबतीत तिला स्वतःच्या मनःस्थितीचा जो अनुभव आला होता त्याची इतकी स्पष्ट व शास्त्रशुद्ध मीमांसा एकाद्या पुस्तकांत केली असेल अशी तिची कल्पना नव्हती. तिची जिज्ञासा फारच जागृत झाली व ती पुढें वाचूं लागली.

"अशा विशेष थंड प्रकृतीच्या ( Frigid ) स्त्रियांच्या बाबतींत कांहीं गोष्टी विशेष लक्षांत ठेवण्यासारख्या आहेत. याबद्दलचा जो सिद्धांत आम्ही पुढें मांडीत आहोंत तो वर संग्रहित केलेल्या एलिझाबेथसारख्या अनेक स्त्रियांच्या आत्मनिवेदनावरून आम्हीं बसविलेला आहे. अशा स्त्रियांची पुरुषांशीं मैत्री होत नाहीं असें नव्हे. त्या बुद्धीनें हुषार असल्या व रूपानें देखण्या असल्या म्हणजे साहजिकपणेंच पुरुष त्यांच्याकडे आकृष्ट होतात व त्यांच्याशीं त्यांची मैत्री जडूं लागते. हा स्नेह त्या स्त्रियांना हवासाही वाटतो. परंतु त्यांच्या त्या स्नेहभावाच्या मागणीचा भलता अर्थ करून पुरुष जर आपले वासनात्मक देहधर्म प्रगट करूं लागला तर त्यांची त्यांना किळस व भीति वाटते. अशा स्त्रियांपैकीं एखादीचें एखाद्या पुरुषावर जरी रूढार्थानें ज्याला प्रेम म्हणतात तें बसलें तरी त्याच्या शरीराचा निकट स्पर्श तिला हवासा वाटत नाहीं. पुरुषांना स्त्रियांविषयीं जें आकर्षण वाटतें त्यांत मनापेक्षां शरीराचा भाग अधिक असतो. स्त्रीच्या बाबतींत अगदीं विरुद्ध न्याय लागू समजला पाहिजे. तिला पुरुषाचें सौंदर्य पाहाण्याची दृष्टि नसते असें कसें म्हणावें? परंतु ही तिची दृष्टि पुष्कळशी तटस्थ असते. देहसौंदर्याचें दर्शन, निकट सहवास आणि उपभोग या तीन क्रिया पुरुष फार वेळ भिन्न भिन्न

ठेवू शकत नाहीं. स्त्री मात्र त्या भिन्न भिन्न समजते. आणि ज्या स्त्रियांच्या ठिकाणीं पराकाष्ठेचा थंडपणा आहे त्यांच्या ठिकाणीं निकट शरीरचेष्टां-विषयीं आसक्ति उत्पन्न व्हावयास फारच दीर्घावधि लागत असतो.

अशा स्त्रीला एकाद्या पुरुषाचा सहवास हवासा वाटला तरी त्याच्या शारीरिक निकटपणाची वांच्छा तिला नसते. तिचें ज्याच्यावर थोडें फार प्रेम आहे अशा पुरुषानेंसुद्धां चुंबनालिंगनादि प्रकार करतांच तिच्या वृत्तीला जबरदस्त धक्का बसण्याचा संभव असतो. त्या पुरुषाविषयींचें मानसिक आर्कषण अगदीं पराकाष्ठेनें वाढल्याखेरीज तिचें प्रीतिपुष्प पूर्ण विकसित होत नाहीं असें आपण वाटल्यास दृष्टांतानें म्हणूं या; व अशा अवस्थेंत सामान्यतः प्राथमिक समजल्या जाणाऱ्या प्रणयचेष्टादेखील तिला पीडादायक ठरतात..."

हा मजकूर एकीकडे वाचीत असतां वासंतीला आपल्या पूर्वजरित्रांतील एक प्रसंग आपल्या डोळ्यांपुढें पुन्हा घडत असल्यासारखा स्पष्ट दिसूं लागला होता...

अशोकनं जेव्हां एकांतांत तिला झटकन् आपल्या बाहुपाशांत घेतलं होतं तेव्हां तिच्या शरीराच्या रोमरोमांत तिरस्कार आणि संताप उसळला होता. किती तीव्रतेनं तिला त्याच्या शरीराचा तो निकट स्पर्श नकोसा वाटला होता व विवेक अगदीं अशक्य होऊन किती जोरानं तिनं त्याच्या कपोलावर प्रहार केला होता !....आणि मग तिनं स्वतःची व अशोकची कायमची ताटातूट करून टाकली होती...

हें असं कां झालं याचा उलगडा तिला पूर्वी कधीं करतां आला नव्हता...

परंतु आतां या पुस्तकांतल्या मीमांसेनं तो उलगडा होत आहेसं तिला वाटलं..

तिला अशोक आवडला होता. तो आपल्यावर प्रेम करतो हें तिला माहीत होतं. आपलं त्याच्यावर प्रेम जडत आहे अशीहि तिची कल्पना होती. परंतु त्याच्याविषयीं तिला वाटणारं मानसिक आकर्षण परकाष्ठेला पोंचलेलं नसावं...

होय, तसंच असलं पाहिजे. अशोकशीं व चंद्रकांताशीं तिला ज्या कठोर-तेनं वागावं लागलं होतं ती तिनं केवळ 'लहर' म्हणून पत्करली नव्हती. दुसऱ्या कोणत्या तऱ्हेनं वागणं तिला अशक्य वाटलं होतं म्हणून ती तसं वागली होती. आणि आतां या पुस्तकांतलं विवेचन...

तिला चटकन् जयंतांची आठवण झाली. त्यांच्याविषयी आपल्या भावना काय आहेत तें तपासून पाहण्याचा चाळा तिनं कांहीं वेळ केला; व मग दूर केलेलं पुस्तक तिनं पुन्हा दृष्टीसमोर धरलं अन् पान उलटून पुढचा भाग ती वाचूं लागली.

"अशा स्त्रियांना पुरुषाचा निकट स्पर्श सुखाचा वाटण्याचा संभवच नसतो असें नाहीं. आधीं मानसिक आकर्षण व मग शारीरिक मोह हा जो न्याय सर्वच स्त्रियांच्या बाबतींत सामान्यत: लागू समजला पाहिजे, त्याचा या स्त्रियांच्या बाबतींत प्रकर्ष झालेला असतो इतकेंच. एलिझाबेथ ही जरी सामान्य स्त्रीहून वेगळ्या--व इतक्याच अर्थानें विकृत--मनोवृत्तीची स्त्री असली तरी अशा पुष्कळ एलिझाबेथ्स् आपल्याला आढळतील. वर एलिझा-बेथ व तिच्यासारख्या तरुणींचीं जीं आत्मनिवेदनें दिलीं आहेत त्यावरून असा निष्कर्ष निघतो कीं, त्या स्त्रियांनाही पुरुषाचा निकट सहवास सुखाचा होऊं शकतो. एवढेंच कीं, तो तसा होण्यापूर्वी त्यांच्या मनांतील कोणत्या तरी विवक्षित पुरुषाविषयींची आवड पराकाष्ठेला पोंचलेली असली पाहिजे...."

आतां त्या विवेचनांत वासंतीला स्वत:चं प्रतिबिंब फारच स्पष्टपणें दिसू लागलं. अखेरचीं वाक्यं वाचतां वाचतां तिच्या मनांत जयंतांबद्दलचे विचार सारखे येत होते; व शेवटचे ते शब्द वाचतांना अगदीं मनांतलं रहस्य ओळखून कुणी तरी बोलावं तसं वाटून ती कांहींशी लज्जित झाली. हात पाहणारा सामुद्रिक आपल्या मनांत अगदीं लपवून ठेवलेली एखादी गोष्ट आतां सांगणार असं वाटतांच माणसानं आपला हात झट्कन झाकून काढून घ्यावा, त्याप्रमाणें तिनं तें पुस्तक मिटून दूर केलं.

तिनं दिवा मालविला, परंतु तिला लवकर झोप लागली नाहीं.

  

दुसऱ्या दिवशीं वासंती कामाच्या धांदलींत होती, परंतु रात्रीं झोप लागे-पर्यंत आणि पुन्हा सकाळीं जाग आल्यावर कांहीं वेळ अंथरुणांत पडून राहून आपण जयंतांविषयीं विचार करीत होतों याची आठवण तिला पुन: पुन्हा होत होती. ती आठवण तिला नकोशी वाटत होती; कारण ती झाली कीं, दर वेळीं तिला मनांतल्या मनांत लाजल्यासारखं होई.

निमंत्रित मंडळी येऊं लागली. जयंत केव्हां येतात, इकडे तिचं लक्ष होतं, परंतु ते येतील त्या वेळीं आपण त्यांच्या दृष्टीस जवळपास कुठं पडतां कामा नये असं तिला वाटे. त्यांच्या मोटारीचा आवाज झाला त्या वेळीं ओटीलगतच्या माजघराच्या दारांत उभं राहून ती बापूसाहेबांना कांहींसं विचारीत होती, ती झटकन् आंत झाली, व मग बराच वेळ कामासाठीं बाहेर जाणं भाग असतांहि तिकडे न जातां तिनं मालीकडून बापूसाहेबांना निरोप पाठवून तीं कामं करून घेतलीं. जयंतांशीं साधं शिष्टाचाराचं बोलणं करतांनाही, इतकंच नव्हे, तर त्यांच्याकडे पाहातांनाही आपली चर्या नेहमींसारखी राहणार नाहीं, आपण काल रात्रीं त्यांच्याविषयीं बराच वेळ विचार केला ही गुप्त गोष्ट आपल्या मुद्रेवर प्रगट झालेली त्यांना दिसेल अशी भीति तिला वाटत होती.

पंक्तींत वाढतांनाही तिनं शक्य तितकी त्यांची आपली दृष्टादृष्ट होऊं दिली नाहीं.

नंतर जेव्हां मंडळी निरोप घेऊं लागली आणि बापूसाहेबांनीं तिला बाहेर बोलावलं तेव्हां तें मानणं तिला भागच होतं. परंतु बाहेर ओटीवर आल्यावरही तिनं मंडळींच्या गप्पांत विशेष भाग घेतला नाहीं, आणि जयंतांच्यापासून ती जरी फारशा अंतरावर बसली नव्हती तरी त्यांची नजर ती प्रयत्नपूर्वक चुकवीतच होती. मात्र कांहीं वेळानं जयंत आपण होऊन आपल्याशीं एकीकडे एखादा शब्दसुद्धां कां बोलत नाहींत याचा तिला विस्मय वाटूं लागला, व नंतर हळूहळू तर रागही येऊं लागला. तिचा तो राग किती वाढला असता कुणास ठाऊक, परंतु बाकीची मंडळी जेव्हां बापूसाहेबांचा निरोप घेऊन उठली तेव्हां शर्टवरच्या कॉलरची गुंडी बसवीत जयंत तिच्याकडे पाहून म्हणाले,

"आम्हीही आतां निरोप घ्यावा काय ?"

तिनं क्षणभर त्यांच्या दृष्टीला दृष्टि दिली, लगेच मान फिरविली व मग पुन्हा त्यांच्याकडे पाहून म्हटलं, "थांबा कीं, एवढी घाई कसली ?"

"वा ! आतां जानबांच्या घरीं जाणार अन् तिथून पुण्यास कूच करणार कीं आम्ही !"

"म्हणजे ? आज जाणार ?"

"तर ! तुमच्या निंबोणीला प्रॅक्टिस करावयासाठीं कायमचा आलों असं समजतां कीं काय तु

"छे: ! आमच्या खेडेगांवांत कशाला येतील तुमच्यासारखे बडे डॉक्टर ? येवढं हिणवायला नको आमच्या गांवाला. आजचा दिवस रहा अन् उद्यां जा पुण्याला."

"तुम्ही केव्हां येणार ?"

"खरं म्हणजे परवां कॉलेज सुरू, तेव्हां मला उद्यां निघालंच पाहिजे. पण मीं अजून बापूंना विचारलं नाहीं, ते मला बहुधा आणखी दोन तीन दिवस राहून घेतील. सुटीभर मी राहिलें तरी तें त्यांना पुरेसं वाटत नाहीं. तुम्ही रहा ना आजच्या दिवस."

"एका अटीवर राहीन."

"कोणत्या ?"

"उद्यां तुम्ही माझ्याबरोबर येत असाल---"

त्यांचं वाक्य पुरं होण्याच्या आधींच वासंतीनं इतक्या झटकन् अन् जोरानं मान हलविली, कीं जणू ती गोष्ट अगदींच अशक्य होती. पण जयंत म्हणाले. "थांबा, मी बापूसाहेबांना विचारतों. त्यांना खात्रीनं माझी सूचना पटेल. दोन दिवसांनी भाड्याच्या बसमधून रखडत जाण्यापेक्षां उद्यां माझ्याबरोबर घरच्या गाडीत जाणं तुम्हांला अधिक सुखाचं होईल, एवढं त्यांना खचित कळेल."

तें ऐकतांच जणू आपल्याच तोंडून कांहीं वावगे शब्द गेले अशा आविर्भावानं वासंतीनं आपलं तोंड उजव्या हातानं झांकलं आणि डोळे मोठमोठे करून अर्धवट दटावल्याप्रमाणें व अर्धवट आर्जवं केल्याप्रमाणें ती हळूच पुटपुटली, "अंह, असलं कांहीं विचारायचं नाहीं हं बापूंना."

परंतु जयंतनीं तिचं म्हणणं ऐकलं नाहीं. त्यांनीं बापूसाहेबांना आपली कल्पना सांगितली; व आपली सूचना न ऐकतां त्यांनीं ती गोष्ट केल्याबद्दल वासंती त्यांच्याकडे चोरून रागाचा कटाक्ष टाकीत होती तोंच बापूसाहेब जयंतांना म्हणाले,

"तुमच्या गाडींत तिला आरामशीर जायला मिळत असतांना मी नको कशाला म्हणू ? आणखी दोन दिवस तिला ठेवून घ्यायचं मनांत होतं माझ्या. पण कालच कोल्हापुराहून निंबाळकरांचा निरोप आल्यामुळें उद्यां दुपारीं मला तिकडं जावं लागणारसं दिसतं. ताईला मी हें सांगणारच

होतों. तुम्ही विषय काढलात हें बरंच झालं. घेऊन जा उद्यां तिला तुम्ही आपल्याबरोबर."

वासंती चकित झाली. तिला आनंद झाला. जयंतांचं म्हणणं आपल्या वडिलांनीं किती चटकन् कबूल केलं या विचारानं तिला त्यांच्याविषयीं अभिमान वाटला. परंतु तिला किंचित् लाजल्यासारखंहि झालं. वास्तविक तिनं जयंतांसारख्या एकाद्या पुरुषाबरोबर मोटारींत बसून पुण्याचा प्रवास करावा यांत तिच्या वडिलांना वावगं वाटण्यासारखं कांहींच नव्हतं. परंतु मनुष्याच्या मनांत प्रेम उत्पन्न होऊन प्रिय व्यक्तीच्या सहवासाचं सुख तो शोधूं लागला कीं कांहींसा विचित्र संशयीपणा त्याच्या वृत्तींत येतो, व आपण मर्यादेबाहेर तर जात नाहीं ना, असा प्रश्न विचारून आपल्या प्रत्येक कृतीची छाननी तो करूं लागतो. वासंतीचं असंच झालं. तिची स्वताची जयंतांविषयींची वृत्ति बदलली होती. त्यांच्याबरोबर जाण्यांत तिला पूर्वीं कधीं न वाटलेलं सुख वाटणार होतं. आणि त्यामुळेंच तिला वाटत होतं, बापूंना कदाचित् आपलं जाणं आवडणार नाहीं.

या संशयामुळें उत्पन्न झालेला संकोच वासंतीच्या मनांतून अगदीं शेवट-पर्यंत गेला नाहीं. दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं ती मोटारींत चढून बसली तेव्हां बापूसाहेबांचा निरोप घेतांना अन् मालीचे पुनः पुन्हा मुके घेऊन तिची समजावणी करतांनासुद्धां तिला वाटत होतं, आपण जयंतांच्याबरोबर जायला मनांतून किती उत्सुक आहोंत हें बापूंनीं ओळखलं तर नसेल? आणि ओळखलं असलं तर ते आपल्यावर रागावणार तर नाहींत?... शेवटीं बापूसाहेबांना एक सिगारेट देऊन व आपल्या हातांनीं ती पेटवून जयंत जेव्हां सिगारेट ओढतां ओढतां बापूसाहेबांच्या हातांत हात देऊन म्हणाले, "येऊ आतां?" व गाडीच्या पुढच्या बाजूस हाकण्याच्या जागीं चढून तिच्या अगदीं जवळ बसले, तेव्हां तर वासंतीला फारच लाजल्या-सारखं झालं. तिनं गाडी सुरू होतांच "माले जातें ग, येईन हं लवकर" असं ओरडून म्हटलं, तें अगदीं गोंधळलेल्या मनःस्थितींत.

आपल्या मनाचा लज्जेनं असा गोंधळ कां उडावा याचं कारण तिला नीटसं कळेना; व त्यामुळें गाडी चांगली दोन अडीच मैल गेली तरी ती मनाशीं विचार करीत स्तब्धच राहिली होती.

"कसला विचार चाललाय् एवढा?" असं जयंत म्हणाले तेव्हां ती जराशी दचकली.

वाऱ्याच्या झोतानं उडणारे केस आवरून ती पुटपुटली, " कुठें ?"

" तरी पण ?"

" छे: कांहीं नाहीं. "

मनांतले विचार लपविण्याची तिची इच्छा होती हें आपण ओळखलं अशा अर्थानं जयंत हसले. रस्ता लांववर मोकळा दिसत होता म्हणून त्यांनीं कांहीं वेळ गाडी खूपच जोरांत सोडली आणि मग वेग आवरून चढणीवरचं एक वळण घेतल्यावर ते म्हणाले,

" तुम्हांला पाठवायसाठीं नाताळची भेट म्हणून मी एक वस्तु आणून ठेवली आहे. इकडे येतांना सगळीच घाई झाली अन् ती बरोबर आणायची राहिली."

यावर काय बोलावं तें चट्कन न सुचल्यामुळें वासंती गप्प राहिली; मात्र त्यांच्याकडे तिनं अशी कांहीं दृष्टि टाकली कीं तीवरून तिच्या मनांतलं समाधान व कृतज्ञता त्यांच्या लक्षांत यावी. त्यामुळें तेच पुढें म्हणाले,

" आतां पुण्यास गेल्यावर मी ती तुम्हांला देईन. ती तुम्हांला आवडेल असं वाटतं. माझ्या एका चित्रकार मित्राकडून मुद्दाम तयार करून घेतलेला वॉटर कलरमधला एक देखावा आहे तो. "

" होय ?"

जयंतनीं मान हलविली, व तसं करतांना त्यांच्या नेहमींच्या लकबीप्रमाणें त्यांनीं दोन्ही ओठ जुळविले.

मग ते कांहीं वेळ आपल्याला चित्रकलेची गोडी कशी लागली त्याची हकीगत सांगूं लागले व बोलतां बोलतां म्हणाले,..." आपल्याला निसर्गाचीं चित्रं कळत नाहींत याचं कारण आपण मूळ निसर्गाकडेच कधीं नीट लक्ष देऊन पाहत नाहीं. माझीच गम्मत सांगतों तुम्हांला. झाडाझुडपांच्या अन् डोंगरांच्या चित्राकडे पाहतांना मला पूर्वीं वाटत असे, चित्रकारानं इतका तांबडा रंग कसा ठिकठिकाणीं टाकला आहे ? पण मग जेव्हां मी प्रत्यक्ष निसर्गाकडे लक्षपूर्वक पाहूं लागलों तेव्हां मला कळून आलं कीं तें बरोबर आहे. गवताच्या अन् झाडाझुडपांच्या हिरव्या रंगांत तांबड्या, जांभळ्या अशा किती तरी रंगछटा निसर्गानं पेरलेल्या असतात. आपल्या उजव्या हाताचा तो देखावा पाहिलात ? मावळत्या सूर्याच्या प्रकाशांत त्या डोंगरावर आणि पायथ्याच्या झाडीवर तांबडे, जांभळे रंग कसे भरले आहेत पाहा..'

बोलतां बोलतां त्यांनीं गाडी उभी केली, आणि निसर्गाच्या त्या दृश्‍
वर्णन करीत ते किती तरी वेळ तिच्याशीं बोलत राहिले.

मग गाडी पुन्हा चालू झाल्यावर थोडचा वेळानं अंधेर पडला म्हणून त्यांनीं दिव्याचा स्विच् ओढला. परतु दिवे कांहीं केल्या लागेनात. त्यांनीं गाडी थांबविली, व उतरून दिव्यांशीं बरीच खटपट केली. " काय बिघडलं आहे ?" असं वासंतीनं विचारल, तेव्हां " कांहीं नाहीं. कॉन्टॅक्ट होत नाहीं " असं ते म्हणाले. बरीच खटपट केल्यावर दिवे लागले. आणि मग गाडींत परत बसून त्यांनीं ती वेगानें काढली.

कात्रजचा घाट ओलांडून पलीकडे जातांच पुण्याकडले विजेचे दिवे वरच्या आभाळांतल्या तारका-पुंजांसारखे ठिकठिकाणीं विखुरल्याप्रमाणें एकदम दृष्टिपथांत आलं.

" आहा, किती सुंदर !" वासंती उद्‌गारली, पण लगेच अर्धवट आपल्याशीं म्हणाली, " पण फार उशीर झाला, नाहीं ?"

" आतां काय पंधरा मिनिटांत पुणं. " जयंत म्हणाले. गाडी मोठचा ऐटीनं वळणं घेत घेत झपाटचानं उतरत होती त्या आनंदांत ते होते. त्यांना इतकी सुंदर शिटी घालतां येते याची वासंतीला कल्पना नव्हती.

ती त्याबद्दल विनोदानं कांहीं तरी बोलणार होती, पण तितक्यात गाडीचे दिवे भक्‌दिशीं गेले !–" आतां ? " असा भीतीचा उद्‌गार वासंतीच्या तोंडावाटे बाहेर पडला !–जयंतांनीं ब्रेक दाबले त्यांचा आवाज तिला ऐकूं आला ! परंतु दुसऱ्याच क्षणीं–

अंधारांत मोठ्या उतरणीला लागलेली गाडी किंचित् उजवीकडे जाऊन एका झाडावर आदळली, कलंडली, आणि वासंती गाडीबाहेर फेकली गेली !

तिच्या मांडीच्या हाडांत अशी कांहीं शिणीक उठली कीं ती असह्य होऊन तिनं मोठ्यांदा किंकाळी फोडली.

जयंत झटकन् आपल्या जवळ येतील अशी तिची कल्पना होती, पण ते आले नाहींत. तिनं जरा वेळ वाट पाहिली व व ती ओरडली, "जयंत !"

कुठून तरी लांबून आल्यासारखा त्यांचा आवाज आला,

" आलों..वासंती ! ..."

गाडी कलंडल्यामुळें बसल्या जागीं तें चिमटल्यासारखे झाले होते व त्यांच्या डोक्याला समोरची कांच लागली होती हें वासंतीला दिसण्यासारख

नव्हतं. परंतु त्यांच्या आवाजाच्या तऱ्हेवरूनच ती भ्याली व ओरडली " जयंत !..."

गाडी सरळ करण्यास जयंतांना बराच वेळ लागला. पण मग लगेच ते तिच्याकडे धांवले.

" फार लागलं काय ?"

" नाहीं." असं ती म्हणाली पण तितक्यांत उठण्याचा प्रयत्न करताच मांडींत शिणीक उठून ती ओरडली, " हाय.."

" गाडीपर्यंत चालवेल का तुम्हांला ?"

" हो," असं म्हणून ती अर्धवट उभी राहिली, पण लगेच "हाय" असं विव्हळून ती मट्कन खाली बसली.

जयंतांनीं मग तिला अधिक कांहीं विचारलं नाही. त्यांनी दोन्ही हात तिच्या अंगाखालीं घातले आणि तिला उचललं.

" किती थरथर कापतां आहां तुम्ही ? घाबरूं नका."

" नाहीं. "

तिचं शरीर थरथर कांपत होतं. पण तें भीतीनं नव्हे. अगदीं निराळ्या कारणानं.

गाडीच्या जवळ आल्यावर जयंत म्हणाले, " तुम्हीं आतां मागच्या बाजूला स्वस्थ पडून राहा. " त्यानीं तिला अलगद ठेवलं, झटकन आपल्या कपड्यांतलं पातळसं ब्लॅंकेट काढून तिच्या अंगावर घातलं व ते म्हणाले, " इथें बरं वाटेल तुम्हांल; भिऊं नका, आतां पुन्हा दिवे दुरुस्त करतों अन् मग आपण हां हां म्हणतां घरीं जाऊं. "

गाडी सुरू होणार तोंच वासंतीनं किंचित् उंच आवाज करून विचारलं, " तुमच्या कपाळावर उजव्या बाजूला रक्त आलं आहे, पाहिलंत का ?"

" कुठें ?" असं म्हणून जयंतांनीं डावा हात त्या जागीं फिरविला तों त्यांचीं चारीं बोटं लाल झालीं.

पण " Oh ! Nothing " असं म्हणून त्यांनीं त्या जागेवर रुमाल दाबून धरला व गाडी सोडली.

एंजिनचा सूं असा आवाज सारखा होत होता. वाऱ्याचा झोत वाहत होता त्याला रानवट दर्प येत होता. सडल्या जागेवरून वासंतीला मागें आणाऱ्या झाडांचे बुंध्याकडचे भाग तेवढे दिसत होते, आणि गाडीनं वळण

घेतलं किंवा पुरं केलं कीं जवळ जवळ येणारे व संख्येनें वाढल्यासारखे वाटणारे पुण्याकडचे दिवेही तिला दिसत होते. परतु या गोष्टींकडे पाहण्या-ऐवजीं ती पुन्हा पुन्हा आपली नजर जयंतांच्या पाठमोऱ्या आकृतीकडे लावून स्वस्थ पडत होती.

मधेंच मान वळवून ते तिला विचारीत, " ठीक आहे ना ?"

ती म्हणे, " ठीक आहे. " व तेवढ्या उत्तरानं तिचं स्वतःचं समाधान न झाल्यामुळें ती मनांतल्या मनांत म्हणे, " होय, जयंत, मी ठीक आहे !"

---

# १३

" बापूचं पत्र आलं ?" अंथरुणावर पडल्या पडल्या वासंतीनं विचारलं.

जयंत दवाखान्यांत जायच्या तयारींत होते. आपली छोटी बॅग भरून घेता घेतां त्यांनीं म्हटलं, " गेल्या पंधरा मिनिटात हा प्रश्न तुम्ही कितव्यांदा विचारलात तुम्हांला माहीत आहे काय ?"

" कितव्यांदा ?"

त्यांनीं बॅगचा चाप 'क्लिक'दिशी बंद केला व वळून तिच्याकडे येत ते हसत म्हणाले, " चवथ्यांदा !"

" कांही तरीच !"

" म्हणजे ? खोटं सांगतों की काय ? इतका अधीरपणा शोभत नाहीं."

" तुम्हांला काय ? बापूंच्या पत्राची मी किती वाट पाहत आहे त्याची तुम्हांला कुठून कल्पना ?"

या तिच्या प्रश्नांत जो अभिप्राय होता तो सगळा जयंताच्या लक्षांत येणं कठीण होतं.

तें किती कठीण होतं त्याबद्दलचेच विचार वासंतीच्या मनांत या क्षणीं येत होते. त्यांच्या दृष्टीला दृष्टि देण्याचं टाळायचं असल्यामुळें त्यांच्या शर्टच्या तिसऱ्या गुंडीच्या जरा खालीं शिवणीच्या चौकांत असलेल्या तांबड्या

'जे' या अक्षराकडे टक लावून पाहत ती त्यांना उद्देशून मनाशीं म्हणत होती, 'तुम्हांला वाटतं मी तुमच्या घरीं इथें सुखांत अन् उत्तम शुश्रूषेंत पडलें आहे. तेव्हां मी अगदीं निर्वेध चित्त असेन. पण एकीकडे अनपेक्षित सुखांत राहतांना संकोचानं माझा जीव कसा कासावीस होतो तें तुम्हांला काय ठाऊक ? माणसाला एकीकडे सुख मिळावं आणि हें सुख घेणं वावगं तर नाहीं अशी मनाची टोचणी असावी म्हणजे कशी विचित्र अवस्था होते तें तुम्हां पुरुषांना नाहीं कळायचं..'

आज चार दिवस झाले ती जयंतांच्या घरांतल्या एका खोलींत पडून होती. त्या दिवशींच्या अपघातांत तिची मांडी इतकी दुखावली होती कीं हिंडण फिरणंच नव्हे, तर प्रथम प्रथम उठून उभं रहाणं सुद्धां तिला अशक्य झालं होतं. अर्थात् जयंतांच्या घरीं तिला रहावं लागलं होतं. त्यांनीं दुसऱ्या दिवशीं तिच्या दुखावलेल्या मांडीचा 'एक्स-रे' फोटोग्राफ घेतला होता. हाडाला कसलीही इजा पोंचलेली नव्हती; परंतु कांहीं दिवस अगदीं हालचाल न करतां स्वस्थ पडून राहणं तिला भाग होतं. जयंतांनीं तिला वसतिगृहांत जाऊं न देतां आपल्याकडे ठेवून घेतलं, व त्या गोष्टीला नाहीं म्हणणं तिला अशक्य होऊन बसलं होतं. त्यांनीं तिची व्यवस्था अप्रतिम ठेवली होती. त्यांची आई तिच्यावर विलक्षण लोभ दाखवून तिच्याशी वागत होती. शिवाय सुशिला नांवाची नर्स जयंतांनीं मुद्दाम तिच्या परिचर्येसाठीं राहायलाच आणली होती. आणि या सर्वांहून अधिक मोलाचं वाटणारं जयंतांच्या सहवासाचं सौख्य तिला मिळत होतं. ते आपल्या रोजच्या कामाकडे बिलकुल दुर्लक्ष करीत नव्हते; परंतु आपल्या प्रत्येक लहानसहान कृतीनं व बोलण्या-चालण्यानं ते असं दाखवीत कीं, त्यांचं लक्ष रात्रंदिवस तिच्याकडे आहे. निदान वासंतीला त्यांच्या वागण्याचा तेवढाच अर्थ दिसत होता, व तो तिला अतीव सुखाचा वाटत होता. एखादे वेळी रात्रीच्या निजण्यापूर्वीच्या गप्पात ती त्यांच्याजवळ अगदीं गंभीर विषय काढी, व त्याबद्दल बोलतांना ते अगदीं गंभीर चर्येनं बोलत. परंतु अशा वेळचं त्यांचं भाषण ऐकतानाही वासंतीच्या मनांत सारखं येत राही, 'किती सुंदर यांची बोलण्याची तऱ्हा ! कोणती स्त्री यांच्यावर लुब्ध होणार नाहीं ?'

परवां रात्रीं ते सांगत होते, "माझ्या राजकीय मतांना अमुक एका पक्षाची चिठी लावायला मी तयार नाहीं. कारण प्रत्येक पक्षाच्या विचार-सरणींत मला थोडा सत्यांश दिसतो, पण कोणत्याच पक्षाचा कार्यक्रम मला

सर्वस्वी स्वीकारावासा वाटत नाहीं. गांधीवादांतला ग्राह्यांश दिसतो; परंतु गांधींच्या मागोमाग जावं असं वाटत नाहीं. हिंदुमहासभेचं संघटनेचं तत्त्व योग्य वाटतं; परंतु जातिविद्वेषाचा कार्यक्रम धोक्याचा वाटतो. कम्युनिस्टांची विचारसरणी तर्कशुद्ध दिसते, पण त्यांच्या सगळ्याच हालचाली प्रशंसनीय वाटत नाहींत. माझ्या या विचारसरणीला कोणत्या छापाची म्हणतां येईल कुणास ठाऊक! परवां पाश्चात्य तत्त्वज्ञानाच्या इतिहासाचं एक पुस्तक वाचीत होतों त्यांत 'Eclectic' असं एक नांव आढळलं तें बरं आहे. हंसक्षीरन्यायानं वागणारा 'विवेचक' या नांवाचा पंथ म्हणतां येईल माझा. अन् तुम्हांला सांगतों, राजकीय भांडणांत गुंतलेल्या कोणत्याच एका पक्षांत सामील न होता विवेचक वृत्तीनं तटस्थ राहण्याची इच्छा मला एकट्यालाच असेल असं नाहीं. माझ्यासारखी वृत्ति आज देशांतल्या हजारों माणसांची असेल असं मला वाटतं. सध्यांच्या मतामतांच्या गलबल्यामुळें समाजांतला बुद्धिवादी वर्ग भांबावल्यासारखा झाला असला तर नवल नाहीं. आम्ही सारे कम्यूनिझमच्या तत्त्वज्ञानाकडे वळत आहोंत; परंतु साशंकवृत्तीनं. भीतभीत अन् हलके हलके! ही आमची गति वाढायची असेल तर त्यासाठीं कॉंग्रेसच्या कार्यक्रमांत व धोरणांत फार मोठाले बदल झाले पाहिजेत..."

ते बोलतां बोलतां स्तब्ध झाले होते, वासंतीही कांहीं वेळ आपल्या मनाशीं विचार करीत पडली होती. पण मग तिनं जेव्हां विचारलं, "कोणते बदल व्हायला पाहिजेत?" त्व्हां "सांगतों" असं म्हणून ते पुढें बोलूं लागले होते :

"..केवळ निवडणुकीच्या वेळी शेतकरी-कामकऱ्यांची आठवण ठेवायची व नतर त्यांच्या हिताची काडीमात्र पर्वा करायची नाहीं हें धोरण कॉंग्रेसनं तावडतोब सोडून दिलं पाहिजे. त्याचप्रमाणें कॉंग्रेसच्या गाभाऱ्यात ज्यांनीं केवळ पैशाच्या बळानं स्वतःची स्थापना करून घेतली आहे त्यांचे हितसंबंध न दुखावतां करतां येईल तेवढं राजकारण करण्याची खोड गांधींनीं टाकली पाहिजे..."

त्यांचं तें विवेचन वासंतीला फारच विचारपूर्ण वाटलं व ती अगदीं लक्ष देऊन ऐकत होती. तिला जेव्हां कडाडून जांभई आली तेव्हां त्या गोष्टीचा तिला अगदीं राग आला. तिच्या मनांत आलं, आतां जयंतना वाटेल आपण कंटाळलों, अन् ते बोलणं

थांबवतील. जांभई येऊं नये म्हणून तिनं किती तरी वेळ खटपट केली होती, परंतु अखेर तिला ती दाबतां आली नाहीं.

तिची शंका खरी ठरली. जयंत लगेच म्हणाले, "पण तें जाऊं द्या, मग केव्हां तरी बोलूं आपण याबद्दल. आतां तुम्हांला झोप आलेली दिसते. तुम्ही दमून गेलां असाल अन् तुम्हांला विश्रांतीची..

"इश्श, मला दमायला काय झालंय ? मला खरंच झोप नाहीं आलेली. खरंच सांगतें..."

परंतु तिला पुन्हा अशी कडकडून एक जांभई आली, कीं तिला तें वाक्यही धड पुरं करतां आलं नाहीं.

जयंत मोठ्यानं हसले. वासंतीलाही हसू आलं. मात्र एकीकडे हसतांना दुसरीकडे ती स्वत:वर फार चिडली होती. जयंतांचं बोलणं तिला आणखी ऐकायचं होतं ; तिला झोप खरोखरच आलेली नव्हती; पण तरी त्या जांभया तिला आवरतां आल्या नव्हत्या ! मनुष्याचा आपल्या शरीरधर्मावर इतका कमी ताबा असावा याचा तिला विस्मय वाटला, रागही आला.

जयंत जेव्हां तिच्या जवळून उठून गेले तेव्हां मघाशी ते किती सुन्दर बोलत होते त्याच्या आठवणी ती मनाशी करीत राहिली.. आतां सकाळपर्यंत ते तिच्या डोळ्यांना दिसणार नव्हते.. उजाडलं म्हणजे मात्र ते आपल्या खोलींत येतील व हसून आपल्या तोंडाकडे पाहतील. खोलींत जिकडे तिकडे प्रसन्न प्रकाश भरल्याचं आपल्या लक्षांत येईल. ते विचारतील, "काय ? झोप उत्तम ?" आपण नुसतं हसूं ; तेही उलट हसतील..

परंतु अगदीं निद्रावश होण्यापूर्वी जे विचार तिच्या मनांत येत त्यांत किंचित् रुखरुख उत्पन्न करणारा एक असे. उद्यां तरी बापूंचं पत्र येतं कीं नाहीं कुणास ठाऊक ?..

अपघाताच्या दुसऱ्या दिवशीं सकाळीं ती जयंतांना म्हणाली होती, "बापूंना ल्याह्यला पाहिजे. मला तर उठून बसतांसुद्धां येत नाहीं !"

"तुम्ही सांगण्याच्या आधींच मीं लिहून ठेवलं आहे पत्र. तुमच्याऐवजी मीं बापूसाहेबांना लिहिलं तर कांहीं हरकत नाहींना ?"

"हरकत कसली ? बापूंना उलट फार आनंद होईल."

"मग हें वाचून पाहा. तुम्ही ठीक म्हणालात तर पोस्टांत पाठवून देईन."

वासंतीला त्यांचं तें पत्र ठीक वाटलं होतं व मग तें रवाना झालं होतं. त्याचं उत्तर लगेच येईल, कदाचित् बापू स्वतःच येतील अशी वासंतीची कल्पना होती. पण ते तर स्वतः आले नव्हतेच, आणि पत्रावांचून एकेक दिवस जाऊं लागला तसतशी वासंती मनांतल्या मनांत फार अस्वस्थ होऊं लागली होती.

म्हणूनच 'बापूंचं पत्र आलं का ?' हा प्रश्न पुनः पुन्हा विचारल्याबद्दल जयंतांनीं आज जेव्हां तिची थट्टा केली तेव्हां तिनं साहजिकच उत्तर केलं,

"बापूच्या पत्राची मी किती वाट पाहत आहे, त्याची तुम्हांला कुठून कल्पना ?"

जयंत हसले व म्हणाले, "नसेल मला कल्पना. पण मी तुम्हांला आशीर्वाद देतों कीं, आज बापूसाहेबांचं पत्र येईल अन् तुमची काळजी दूर होईल."

"आशीर्वाद ? म्हणजे डॉक्टर आहांत कीं साधु आहात ?"

"साधु शब्दावर श्लेष नाहीं ना ?" ते मनःपूर्वक हसले व जातां जातां वळून म्हणाले "बरं, मी जाऊं आतां दवाखान्यांत ? सुशिलाबाई आहेतच तुमच्या दिमतीला. तुम्हांला वाटलं तर व्हरांड्यापर्यंत चालत जाऊन तिथें आरामखुर्चीत पडायला माझी आज हरकत नाहीं. तितकं चालवेल कीं नाहीं ?

"हो. मी तर म्हणतें, उद्यां मी वसतिगृहांत जाईन."

"तें पाहूं आपण मग."

"असं काय ? ऐका तरी ?" तिनं हसत म्हटलं.

पण तिचं बोलणं ऐकायला ते थांबले नाहींत !

  

दुपारी बापूसाहेब स्वतःच येऊन दाखल झाले. ते कोल्हापुराहून पुढें बेळगावला गेले होते व त्यामुळें त्यांना परत निबोणीस यायला चार दिवस उशीर झाला होता. डॉ. जयंतांचं पत्र त्यांना काल रात्रीं मिळालं होतं, व लगेच आज सकाळी ते निबोणीहून निघाले होते.

डॉ. जयंतांनीं त्यांना कांहींसं थट्टेनं विचारलं, "तुम्ही वाटभर अगदीं काळजी करीत आला असाल ?"

बापूसाहेब म्हणाले, "काळजी ? ती कशाबद्दल ? तुमच्या देखरेखीखालीं ही आहे हें माहीत असल्यावर देखील मी काळजी केली तर मला तुम्ही वेड्यांतच काढाल. नाहीं का ?"

हें विचारतांना त्यांनीं ज्या तऱ्हेनं वासंतीकडे पाहिलं तीवरून तिच्या लक्षांत आलं कीं आपण इथें जयंताच्या घरीं राहिलों याबद्दल आपले वडील आपल्याला दोष देतील ही आपली कल्पना उगीचच होती. एका मोठ्या चिंतेचं ओझं मनावेगळं झाल्यासारखं तिला वाटलं ; आणि मग ती फार प्रसन्नतेनं संभाषणांत भाग घेऊं लागली. संध्याकाळीं निंबोणीस परत जायला निघतांना तर बापूसाहेबांनीं जयंतांच्या देखत तिला बजावलं कीं अगदीं चांगलं हिंडतां फिरतां येऊं लागल्यावांचून तिनं वसतिगृहांत जातां कामा नये. त्यांच्या त्या बोलण्यावर तिनं हसून मान हालविली. परंतु मग दोन दिवसांनीं ती वसतिगृहांत राहायला गेली. जयंत तिला जाऊं देत नव्हते, परंतु तिनं त्यांचा आग्रह मानला नाहीं.

शेवटीं ते इतकं सुद्धां म्हणाले, “तुम्ही इतक्या हट्टी असाल अशी नव्हती कल्पना.”

“मला असा हट्ट करावा लागेल अशी मला तरी कुठें कल्पना होती ?” असं उद्गारून हसण्यावारी तिनं तें बोलणं नेलं.

परंतु आपल्या खोलींत आल्यावर तिच्या मनांत पुन: पुन्हा येत होतं, आपण जयंतांना दुखविलं तर नाहीं ?

संध्याकाळीं सुशिला जेव्हां तिच्या खोलीवर आली तेव्हां तिला फार आश्चर्य वाटलं. सुशिला तिला सांगूं लागली, “तुमच्या मांडीला अजून कांहीं दिवस रोज दोन वेळां ‘मसाज’ केलं पाहिजे. जयंतांनीं मला रोज तुमच्याकडे यायला सांगितलेलं आहे.”

वासंतीला आश्चर्य वाटलं. जयंत किती उपकार करणार होते तिच्यावर ? किती चांगुलपणा दाखविणार होते ? आणि अशानं तिला आपलं मन आवरणं किती कठीण करून ठेवणार होते ? . .

सुशिला तिच्या खोलीवर रोज दोन वेळां येई. सुरंगा खोलींत असली तर तिघींच्या गप्पा चालत. पण ती नसली म्हणजे आपलं काम आटपलं असलं तरीसुद्धां मुद्दाम घटकाभर सुशिला वासंतीशीं बोलत राही. अशा वेळीं त्यांच्या भाषणांत अधिक मोकळेपणा असे. वासंती कॉलेजांतल्या गमती सांगे. सुशिला हॉस्पिटलमधल्या गोष्टी सांगे. त्या इतक्या मनोरंजक असूं शकतात याची वासंतीला कल्पना नव्हती. परंतु हे भिन्न विषय सोडले तरी एक विषय असा होता कीं त्याबद्दल गप्पा मारण्यांत व ऐकण्यांत दोघींची

स्पर्धा चालावी. हा विषय म्हणजे डॉ. जयंत. वासंतीची कल्पना होती कीं जयंतांच्याविषयीं बोलण्याची आवड आपल्याइतकी दुसऱ्या कुणाला नसेल परंतु सुशिलेनं तिची ती कल्पना खोटी ठरविली. ती संधि सापडली कीं जयंतांच्याविषयीं बोलूं लागे ; आणि तिच्या बोलण्यावरून पूर्वी माहीत नसलेल्या जयंतांबद्दलच्या किती तरी गोष्टी वासंतीला समजत.

उदाहरणार्थ, ससून हॉस्पिटलमध्यें ते विनावेतन एका महत्त्वाच्या जागीं काम करीत होते हें यापूर्वी तिला कुठें ठाऊक होतं ? त्याचप्रमाणें जयंतांची प्रॅक्टिस चांगली आहे अशी जरी तिची कल्पना होती तरी त्यांच्या मासिक उत्पनाचा तिनं कुठें अंदाज केला होता ?..

ती उद्गारली, " अय्या ! म्हणजे चांगलेच श्रीमंत आहेत कीं ! "

सुशिला मान हालवित म्हणाली, "कुठले आहेत श्रीमंत ? ते श्रीमंत झाले असते हें खरं ; पण त्यांच्या हातांत पैसा टिकेल तेव्हां ना ?"

भलत्याच शंकेनं वासंतीनं एकदम विचारलं, "फार चैन करतात वाटतं ?"

" इश्श, तसं नाहीं ; पण दुसऱ्याला किती पैसा द्यावा याचा त्यांच्याजवळ कांहीं हिशेब आहे का ? तोंडानं ते म्हणतात कीं, कुठलीच चळवळ पसत नाहीं आपल्याला ; पण कोणत्याही संस्थेचा अगर पक्षाचा इसम त्यांच्याकडे वर्गणी मागायला आला कीं, हे सढळ हातानं मदत करणार. कॉंग्रेस, हिंदुमहासभा, महाराष्ट्र व्यायाम मंडळ — सगळ्यांना त्यांच्याकडून सारखेच पैसे पोंचत असतात. तुम्हांला एक गोष्ट सांगू ? "

" काय ? "

" तीन महिन्यांपूर्वी इथें भांडीकामगारांचा जो संप झाला तो कुणाच्या पैशाच्या बळावर लढविला गेला ? मधें कम्यूनिष्ट मुलांनीं " आरोळी " नांवाचं जें पत्र काढलं होतं त्याला पैसे कुणी दिले होते.. ?

" अस्सं ! "

वासंतीच्या या उद्गारांत विस्मयापेक्षां कौतुक अन् आदरच जास्ती भरलेला होता.

आपल्या उद्गारांतला कौतुकाचा भाग सुशिलेच्या लक्षांत आला कीं काय म्हणून वासंतीनं तिच्याकडे चटकन् पाहिलं. परंतु तिच्या तोंडावरच्या मंद हास्यावरून कोणताच निश्चित तर्क करण्यासारखा नव्हता. ती मनाशीं म्हणाली, आलं हिच्या लक्षांत तर आलं..

  

भिन्नभिन्न कारणांचा एकच परिणाम कसा होतो तें पुष्कळदां पाहण्या-सारखं असतं.

पूर्वी जयंतांचा परिचय वाढू नये म्हणून वासंती त्यांच्या गांठीभेटीचे प्रसंग टाळीत होती. आतां त्यांचा सहवास तिला हवा होता, मनानं रोज ती त्यांच्या अधिकाधिक जवळ जात होती. पूर्वी कोणत्याही पुरुषाविषयीं तिला वाटली नव्हती तितकी अमर्याद आवड त्यांच्याविषयीं तिला वाटू लागली होती, या आकर्षणाचा परिणाम होऊन तिच्या ठिकाणचा आजपर्यंत सुप्त असलेला स्त्रीधर्महि जागृत होत होता. परंतु याचाही परिणाम असाच झाला कीं ती त्यांची गाठभेट टाळूं लागली. पूर्वी तिला भीति वाटे. आतां तिच्या मनांत एक विचित्र संकोच व लज्जा उत्पन्न झाली. जें सुख अंत:प्रवृत्तीनं अगदीं हवंसं वाटलं तें मिळणं सहज शक्य असतांही संकोच सोडून तें घेतां येऊं नये हा काय विचित्र धर्म निसर्गानं स्त्रीच्या ठिकाणीं ठेवला आहे असं ती आपल्या मनाशीं सतत आश्चर्य करी. परंतु त्या विचित्र पाशांतून ती स्वत:ची सुटका करूं शकत नसे. ती निंबोणीहून आल्यापासून दोन अडीच महिने झाले, पण पाय पुरता बरा झाल्यावरही ती फार तर चार पांच वेळांच जयंतांच्या घरीं गेली असेल.

तिची आपली भेट याहून अधिक वारंवार होऊ नये याबद्दल जयंत कधीं चेष्टेनं तर एकादे वेळीं उघड रागावून तिला दोष देत. पण तिला दरवेळीं हसून म्हणतां येत असे,

"आतां अभ्यास फार केला पाहिजे मला."

आजही तिनं हेंच उत्तर दिलं. तेव्हां विनोदाचा ध्वनि न सोडतां, परंतु किंचित् चिडून ते म्हणाले, "हो खरंच. आम्ही अशिक्षित माणसं, तेव्हां परीक्षेसाठीं अभ्यास किती करावा लागतो याची आम्हांला कोठून कल्पना ?"

"पहा बाई ! असा का माझ्या म्हणण्याचा अर्थ होतो ? पहिली टर्म टिवल्याबावल्या करण्यांत घालविली तेव्हां आतां मला झटून अभ्यास केला पाहिजे इतकंच माझं म्हणणं. परीक्षा अवघी दीड महिना राहिली आहे. आम्ही नापास झालों तर तुमचं काय जातंय ?"

तें शेवटचं वाक्य बोलतांना तिनं जो अभिनय केला तो फारच गोड होता. मग रागाच्या आणखी एखाद्या शब्दानं तिला दुखविणं जयंतांना शक्यच नव्हतं. ते म्हणाले,

"अभ्यास केला पाहिजे हें मला नाकबूल का आहे ? पण आठवड्यांतून दोन चार तास विश्रांतीचे म्हणून काढले तर कांहीं बिघडणार नाहीं. अन् तेवढा तुमचा वेळ मला मिळाला तर मला आनंद होईल. आजच पहा रविवार आहे अन् तरी तुमची सारखी जातें जातें म्हणून घाई चालली आहे. हें बरं का ?"

वासंतीला एकदम हसू आलं व ती म्हणाली, "बरं बाई, चुकलं आमचं. आतां तुम्हीं म्हणाल तितका वेळ थांबायला अन् म्हणाल तें करायला माझी तयारी आहे, मग तर झालं ?"

मग जयंतांनीं आपली गाडी काढली व त्यांच्याबरोबर ती फिरायला गेली.

वाटेनं बोलतां बोलतां तिनं मधेंच विचारलं, "आज तरी गाडीचे दिवे ठीक आहेत ना ?"

"म्हणजे ? दिवेलागणी होईपर्यंत हिंडायचा विचार आहे तर! बरं झालं. मीं न विचारतां मला कबुली मिळाली."

"वा ! हें बरं आहे कीं ?" तिनं एकदम म्हटलं.

त्यांनीं खवचटपणा करावा अशी आपल्या बोलण्यानंच आपण त्यांना संधि दिली हें पाहून ती फारच लाजली.

सात आठ मैल दूर गेल्यानंतर एका उंच टकडीच्या माथ्यावर जेव्हां तीं दोघं बसलीं तेव्हा प्रथम कांहीं वेळ दोघही स्तब्ध होतीं. पाशा लांब लांब उड्या टाकीत इतका दूर गेला कीं जणू तो आतां परत येणार नव्हता. उजव्या बाजूला विस्तीर्ण खोरं पसरलेलं होतं. प्रदेश डोंगराळच होता तरी आसमंतात् ठिकठिकाणीं गर्द झाडीच्या छोट्या छोट्या जागा होत्या. दूर अंतरावर शेतं होतीं. मधेंच एक दोन ठिकाणीं कौलारं दिसत होतीं. अगदीं दूरवर डोंगरांच्या कडाकडा विचित्र प्रकाशानं उजळल्या होत्या. क्षितिजापाशीं चौकट्या चौकट्या करून तरंगणारे ढग अगदीं भट्टींत तापलेल्या सोन्याच्या रंगाचे वाटत होते. ज्या ठिकाणीं सूर्यबिंब होतं तिथून एखाद्या सर्चलाइटमधून निघाल्याप्रमाणें किरणांचे दाट झोतच्या झोत बाहेर पडून वरच्या फिकट निळसर आकाशभागांत विलीन झाले होते. मधेंच पक्ष्यांचा थवाच्या थवा शीघ्र वेगानं पुढून गेलेला दिसे. आणि ज्या ठिकाणीं तीं दोघं स्वच्छ दगड पाहून बसलीं होतीं तिथें असलेल्या दोन छोट्याच झाडांवर

चिमण्यांसारख्या पण किंचित् अधिक भुरकट रंगाच्या लहान पक्ष्यांचा थवाच्या थवा दिसत होता.

दोघंहि त्या शांत, प्रसन्न, विस्तीर्ण दृश्याकडे पहात किती तरी वेळ स्तब्ध राहिलीं.

मग वासंती एकदम म्हणाली, " किती किलबिल यांची ? "

झाडावर बसायचं, थवाच्या थवा करून उडून छोटचा घिरटचा घालायच्या अन् पुन्हा वेगानं परत पर्णराजींत घुमायचं अशी त्या छोटचा छोटचा पक्ष्यांची गमतीची धांदल चालली होती. जयंतही त्या पक्ष्यांच्या किलबिलीचाच विचार करीत असावेत. कारण ते चटकन् म्हणाले,

" खरंच, एवढालासे जीव पण कोण ही किलबिल. मला वाटतं त्यांची दिवसभर पांगापांग झाली होती अन् आतां रात्रभर यांना स्वस्थ बसायचं आहे, तेव्हां साचलेलीं सारीं बोलणीं ते बोलून टाकीत असावेत ! "

वासंती हसत त्यांच्याकडे पाहत राहिली. किती सुंदर तुमची ही कल्पना, असं म्हणावंसं तिला वाटलं. पण तो अभिप्राय तिच्या फक्त नजरेंतच व्यक्त झाला. आणि मग कांहीं वेळानं जें आपण बोलणार तें योग्य होईल कीं नाहीं याचा निश्चय होण्यापूर्वींच ती म्हणून गेली.

" मला एक गोष्ट सांगा."

" विचारा."

" तसं नाहीं. गोष्ट म्हणजे गोष्ट; Story..."

जयंत हसले व त्यांनीं मान हलविली.

ती म्हणाली, " सांगितली पाहिजे. सांगा ना."

" आपल्याला नाहीं बुवा सांगतां येत."

" एवढे कादंबरीकार अन् म्हणे गोष्ट सांगतां येत नाहीं. सांगा."

" तात्पर्याची सांगूं कीं बिनतात्पर्याची ?"

" इश्श्; सांगा कीं !"

" बरं ऐका. एक होता डॉक्टर; त्याला होता शिकारीचा फार नाद; एकदां तो आपला कुत्रा घेऊन रानावनांत हिंडत असतांना..."

ते काय सांगणार तें वासंतीच्या लक्षांत येऊन तिला हसूं आलं. परंतु चर्येवर मोठी जिज्ञासा दाखवून ती म्हणाली, " हं ! "

आतां त्या लहान पक्षांची किलबिल बंद झाली होती. सूर्य क्षितिजाखालीं गेला होता. पाशा परत येऊन पुढचे दोन्ही पाय पसरून व त्यांवर आपला

जवडा ठेवून स्वस्थ पडला होता. मात्र त्याच्या तेजस्वी डोळयांची नजर आपल्या मालकाकडे अगदीं एकाग्रतेनं लागली होती. तोहि त्यांची गोष्ट ऐकत असावा, व मनाशीं तिचं तात्पर्य काढण्याचं त्यानं ठरविलं असावं.

त्या दिवशीं रात्रीं सुरंगाला झोप लागली अशी खात्री झाल्यावर वासंतीनं नोटपेपर काढला, व एक पत्र लिहिण्यास प्रारंभ केला.

" प्रिय जयंत—

आज तुम्हीं जी गोष्ट सांगितलीत तिच्यांतले कांहीं भाग तुम्हीं मुद्दाम गाळले असावेत. त्यामुळें माझ्या मनांत कांहीं शंका उरल्या आहेत. त्या तुम्हांला विचारल्या तर तुम्ही सरळ उत्तरं द्याल का?

पहिली शंका अशी कीं त्या खेड्यांत जी मुलगी तुम्हांला भेटली.."

लिहितां लिहितां वासंती मधेंच एकदां थांबली. तिला वाटलं, आपण कांहीं तरीच भरकटत चाललों आहोंत. असलं पत्र धाडण्यांत कांहीं अर्थ नाहीं. मग कांहीं वेळ ती स्वस्थच बसली. मधेंच एकदोन वेळां तिनं टिपकागदावर फुलांच्या आकृती काढल्या. त्यांकडे पाहतां मायन्याचीं 'प्रिय जयंत' हीं अक्षरं वरच्या बाजूस टिपलेलीं उलटीं दिसत होती तीं तिच्या दृष्टीस पडलीं. तिनं झटकन् तो टिपकागद फाडून टाकला. सुरंगाच्या दृष्टीस तो टिपकागद पडला असता तर....ती स्वस्थ बसली आणि मग क्षणापूर्वीं तिच्या मनात आलेली शंका एकदम विरून गेली. तिनं तें पत्र पुरं केलं.

शेवटीं सही करण्याच्या वेळेस मात्र ती पुन्हा थबकली. "तुमची वासंती" असं लिहिण्याचा तिला फार संकोच वाटला. इंग्रजीत सही करणं बरं असं तिच्या मनांत आलं, पण सबंध पत्र मराठींत होतं अन् त्याच्याखालीं इंग्रजी सही करायची? तिचा कांही निश्चय होईना. अखेर तिनं ठरविलं, उद्यां पत्र टाकण्यापूर्वीं सही करता येईल....

परंतु दुसऱ्या दिवशी तिला वाटलं पत्र इतक्यांत टाकूंच नये. सोमवारीं जयंत कलकत्त्यास जाणार होते ते तिकडे असतांना त्यांना आपलं हें पत्र मिळालं तर तेंच सगळ्यांत चांगलं होईल.

ज्या दिवशीं जयंत कलकत्त्यास गेले त्या दिवशीं सुशिलेनं फार आग्रह केला म्हणून ती तिच्या बिऱ्हाडीं गेली. सुशिलेशीं तिचा आतां पुष्कळच परिचय झाला होता. परंतु एखाद्याच्या राहत्या घरीं प्रथमच गेलं कीं माण-

साला साहजिकच जो संकोच वाटतो तो तिला वाटत होता. सुशिला तिला म्हणाली,

"असं काय परक्यासारखं करतां? नीट आरामशीर बसा कीं त्या खुर्चीत! हें घर तुमचंच आहे! तुमच्याबद्दल मला तरी अगदीं परकेपणा वाटत नाहीं. मग तुम्हांला काय वाटत असेल तें वाटो."

वासंती हसली व मग ती थोड्या अधिक मोकळेपणानं बोलायला लागली. भिंतीवर एके ठिकाणीं जयंतांचा फोटो होता त्याकडे तिची नजर पुनः पुन्हा जात होती. आपल्या नजरेचा तो चाळा सुशिलेच्या लक्षांत येता कामा नये असं तिला वाटलं; परंतु तिला तसं वाटण्यापूर्वीच सुशिलेच्या लक्षांत ती गोष्ट आली असावी. कारण तिनं विचारलं,

"कुणाचा फोटो तें ओळखलंत ना?"

"इश्श्, म्हणजे काय? परंतु या फोटोंत ते किंचित् निराळे दिसतात असं मला वाटतं."

"हं, जरासे. त्या वेळीं--"

"म्हणजे? हा केव्हांचा आहे फोटो?"

"हा ना?" सुशिलेनं बोटं मोजल्यासारखं करून म्हटलं, "चार वर्षं झालीं याला. नक्की सांगायचं झालं तर चार वर्षं आणि तीन महिने. त्या वेळीं डॉक्टरांच्या भावाचं नुकतंच लग्न झालं होतं."

सुशिलेच्या चर्येवरून असं दिसलं कीं, गतकालच्या गोष्टींचं ती स्मरण करीत असावी व त्या गोष्टी कांहींशा सुखाच्या तर कांहींशा दुःखाच्या असाव्यात.

वासंतीला वाटलं कसल्या आठवणी हिला होत असाव्यात. आपण त्याबद्दल प्रश्न करावा अशी हिची इच्छा असेल काय?

परंतु ती मनाशीं हा विचार करीत होती तोंच सुशिला बोलूं लागली. ज्या गोष्टी ती नंतर सांगत राहिली त्या वासंतीला सांगून टाकण्याची इच्छा आज कित्येक दिवस तिच्या मनांत असावी असं तिच्या बोलण्याच्या तऱ्हेवरून वाटलं आणि तिच्या बोलण्याकडे वासंतीचं लक्ष अधिकाधिक लागत गेलं.

सुशिला जन्मानं हिंदु नसून बाटलेल्या मुसलमान कुटुंबांतली होती हें ऐकतांच वासंतीला विस्मयाचा मोठा धक्का बसला. ती एकदम उद्गारली,

"काय सांगतां ?"

"होय; मी जन्मानं मुसलमान होतें. जयंतांच्यामुळेंच मी हिंदु झालें, इतकंच नाहीं तर त्यांच्यामुळेंच मी माणसांत आलें. त्यांची माझी भेट झाली नसती तर....तर काय झालं असतं माझ्या आयुष्याचं कुणास ठाऊक ? कदाचित् मीं आत्महत्याहि केली असती ! पण जयंतानीं मला इकडे पुण्याला आणलं, मला शुद्ध करून माझा हिंदुधर्म मला परत दिला, आपल्या खर्चानं माझं सारं शिक्षण करविलं आणि स्वतःच्या पायावर उभं राहण्याइतकं मला स्वतंत्र केलं. तुम्हांला खरं सांगू, आज जी सुशिला तुम्हांला दिसते आहे ती सर्वस्वी जयतांनीं निर्माण केलेली आहे...."

तिची चर्या गंभीर तर होतीच पण बरीचशी कष्टीही होती. तिच्या डोळयांच्या कडा ओलसर दिसू लागल्या होत्या. जें तिनं सांगितलं त्यापेक्षां पुष्कळ अधिक तिला सांगायच असावं, व तें तिनं आजपर्यंत कुणाशीं उघड न करतां अंतःकरणांत अधिक खोल लपविण्याचा यत्न केला असवा.

तिचं पुढचं बोलणं वासंती ऐकू लागली तेव्हां तिला समजून आलं की आपला तर्क खरा होता. बोलता बोलतां तिनं मधेंच वासंतीकडे अगदी आर्द्र दृष्टीनं पाहून म्हटलं,

".....मी आजपर्यंत कुणाजवळ बोललें नाही. तुम्ही मला फार फार आवडतां, तुमच्याजवळ अंतःकरण उघडावंसं वाटतं. मीं त्यांच्यावर फार प्रेम केलं. अजूनही करतें पण तें दुरून--आदरानं."

वासंती तिच्याकडे अगदीं न्याहाळून पाहत होती. चांगलीच देखणी होती ती. तिचा वर्ण रसरशीत होता. डोळे काळेभोर नव्हते परंतु फार आकर्षक होते. नाकाची व जिवणीची ठेवण मोहक होती. कपाळ अरुंद होतं, परंतु त्यामुळें तिचे दाट केस अधिकच भरगच्च वाटत होते. वासंतीच्या मनांत आलं, इतक्या सुंदर मुलीच्या प्रेमाचा स्वीकार जयंतांनी का बरं केला नाहीं ? हिच्या पूर्वचरित्रामुळें ? पण अशा गोष्टीला महत्त्व देणाऱ्यांपैकीं जयंत नव्हते. मग ? ही त्यांना बुद्धीनं अपरिपक्व वाटली असेल ? परंतु ही रूढार्थानं सुशिक्षित नसली तरी हिची बुद्धि सामान्यांहून पुष्कळ निराळी खास होती. मग जयंतांनीं तिच्या प्रेमाचा अव्हेर कां बरं केला असेल ?

सुशिला पुढें सांगू लागली, "ते माझे होतील अशी फार आशा मीं मनाशीं ठेवली होती. ते माझे उपकारकर्ते होते हें मला समजत

होतं. परंतु त्यामुळें त्यांच्यावर प्रेम करण्याची मनाई आहे हें मला पटत नव्हतं. उलट मला तर वाटे, कीं ज्या अर्थी त्यांनीं एक प्रकारें मला जिवत केलं त्या अर्थी त्यांची पत्नी म्हणून जन्मभर त्यांची सेवा करण्याचं मागण मीं त्यांच्याजवळ मागाव. पण माझ्या मनातला भाव मी ज्या दिवशीं त्यांना सांगितला आणि माझं बोलणं ऐकून कष्टी चेहरा करून त्यांनीं जेव्हां आपल्या मनांतली प्रतिज्ञा मला सांगितली– "

" प्रतिज्ञा ? "

" होय, ते मला म्हणाले, " सुशीला, तुझं एक प्रकारं लालन-पालन मीं केलं, तुझं संरक्षण केलं, अन् तितक्या अर्थानं मी तुला निरंतर माझीच समजणार आहे. पण तुझ्याशी विवाह करावा हें शक्य नाहीं. किंबहुना कोणत्याच स्त्रीशीं शक्य नाहीं. कारण लग्न न करता ब्रह्मचर्यानं आयुष्य घालविण्याचा प्रयोग करून पाहण्याची माझी इच्छा आहे– "

सुशीला बोलतां बोलतां एकदम गप्प झाली. जणू ज्या वेळीं जयंतांचं तें उत्तर तिनं प्रथम ऐकलं त्या वेळेस ज्या भावना तिच्या मनात आल्या होत्या त्यांचाच अनुभव ती आतां पुन्हां एकदा घेत होती; आणि मग थोडया वेळानं " त्यांचा असा कांही निश्चय असेल अशी मला अगदी कल्पना नव्हती " असं तिनं म्हटलं तेंसुद्धां अशा तऱ्हेनें की जणू पूर्वीच्या प्रसंगी जे शब्द तिनं मनांतल्या मनांत उच्चारले असले पाहिजेत तेच ती आता मोठ्यांदा उच्चारीत होती !

वासंतीही मनाशीं अगदीं बरोबर तेच उद्‌गार काढीत होती. " त्यांचा असा कांहीं निश्चय असेल अशी अगदीं कल्पना नव्हती ! "

सुशिला पुढं बोलत राहिली. परंतु तिच्या बोलण्याकडे आतां वासंतीचं लक्ष फार थोडं होतं. जयंतांच्या त्या उत्तरानं सुशिलेला निराशेचं केवढं दुःख सोसावं लागलं असेल याचाही विचार तिच्या मनांत विशेष येत नव्हता. तिचं अंतःकरण अगदींच निराळ्या विचारांनीं अस्वस्थ करून टाकलं होतं.

जयंतांचा तो पूर्वीचा निश्चय अजूनही कायम असेल काय ? आपल्या-विषयीं त्यांच्या मनांत प्रीति उत्पन्न झाली असावी हा आपला तर्क चुकीचा होता काय ? असेलही ! या आधुनिक काळांत सलगीच्या बोलण्याचालण्याचे अर्थ जरा बेतानंच केले पाहिजेत. जयंत आपल्याशीं ज्या तऱ्हेनं वागतात

तिच्या मुळाशीं आपल्याला वाटतं त्या स्वरूपाची प्रीति नसेल तर मग ज्या वृत्तीनं आपण त्यांच्याकडे आतांशा पाहूं लागलों आहोंत ती वेळींच सोडून द्यायला नको काय ? जें सुशिलेच्या वाट्याला आलं त्याचा अनुभव आपल्याला घ्यावयाचा आहे काय ?....

परंतु दुसरीकडे तिचं मन म्हणत होतं, छे, छे, सुशिलेची अन् तुझी गोष्ट सारखी नाहीं. ती त्यांच्यावर अनुरक्त झाली असेल ; परंतु ते झाले होते काय ? आपल्याशीं ते ज्या तऱ्हेनं वागतात त्या तऱ्हेनं तिच्याशीं ते वागले होते काय ?

..त्याचा काय नेम ? जयंतांचा निश्चय आतां बदलला असेलही. तो बदलला असला तर मग आपली आशा चुकीची कशी म्हणतां येईल ?...

तथापि तिला पुन्हा वाटे, नव्हेच तें. आपले हे सारे तर्क खोटे. आपण उगीच हवेंत किल्ले बांधीत आहोंत. आपल्या प्रीतीचा स्पष्ट उच्चार आपण जयंतांच्याजवळ केलेला नाहीं म्हणून ते आपला सहवास सुखाचा व सुरक्षित समजत असले पाहिजेत, आणि आपल्याशीं बोलण्याचालण्यांत सलगी दाखवीत असले पाहिजेत. त्यांच्या वागण्याचा आपल्यावर झालेला परिणाम त्यांच्या लक्षांत आला तर ते कदाचित् म्हणतीलही, " माफ करा. पण तुम्हीं असलं कांहीं मनांत आणतां कामा नये." आणि त्यांनीं असं उत्तर दिलं तर मग आपली केवढी निराशा होईल ? त्यापेक्षां...

वासंती सुशिलेचा निरोप घेऊन खोलीवर परत आली ती हा अखेरचा विचार करीतच.

जयंतांसाठीं लिहून ठेवलेलें तें मोठं पत्र दुसऱ्या दिवशी पोस्टांत टाकण्याऐवजीं तिनं फाडून नाहींसं केलं !

स्त्रीचं मन पुरुषावर लुब्ध झालं कीं, किती सुखकारक भावनांचे तरंग त्यांत उठूं लागतात हें वासंतीच्या आयुष्यांत तिला प्रथमच थोडया दिवसांपूर्वींपासून समजूं लागलं होतं. आतां प्रेमिकांच्या वाट्याला किती तीव्र निराशा येऊं शकते त्याचा अनुभव तिला घ्यावा लागणार होता. पण त्याला तिची तयारी होती. जयंतांच्या जवळ आपण आपलं मन उघडं करावं, व त्यांनीं नाहीं म्हणावं यांत निराशा तर होतीच, पण शिवाय अपमानाचं दुःखही होतं. त्यापेक्षां आपलं मन उघड न करतां आज घटकेची निराशा सहन करणं पुरवलं.

रात्रीच्या त्या शांत प्रहरीं पत्र फाडून त्याचे तुकडे नाहींसे करण्याचं विचित्र कृत्य करतांना सुरंगा जागी तर होणार नाहीं अशा भीतीनं वासंती वरचेवर चपापून तिच्याकडे पाहत होती; पण सुरंगाला शांत झोंप लागलेली होती. आपल्या आवडत्या मैत्रिणीच्या आयुष्यात किती प्रक्षोभक प्रसंग निर्माण झाला आहे त्याची तिला कल्पनाही नव्हती !

---

## १४

कॉलेजच्या लायब्ररीचा शिपाई आला तेव्हां वासंतीनं त्याच्याजवळ पांच-सहा पुस्तकं दिलीं व म्हटलं, "त्यातलं एक माझ्या नांवावर आहे. अन् बाकीचीं प्रिन्सिपलसाहेबांच्या नांवावर आहेत. लायब्रेरियनना म्हणावं नीट खोडून टाका सगळीं, नाहींतर करतील घोटाळा मी गेल्यावर."

बरोबर आणलेल्या रुमालात शिपायानं तीं पुस्तकं बांधून घेतलीं. तो जाऊं लागला तेव्हां वासंतीनं त्याला थांबायला लावून एक रुपया त्याच्या हातीं ठेवला तेव्हां त्यानं सलाम केला, व तो गेल्यावर तिनं दार लावून घेतलं.

सुरंगा तें सारं पहात होती. तिनं विचारलं, "म्हणजे काय ग ? तू खरोखरीच जाणार कीं काय आज ?"

वासंतीनं मान हालविली, व टेबलावरची पुस्तकं काढून तीं ट्रंकमध्यें बसवूं लागली.

सुरंगानं विचारलं, परीक्षेला नाहीं बसणार तूं ?"

"अं हं'

"मग इतके दिवस येवढा अभ्यास कशाला केलास ?"

"वेडी म्हणून." तिच्याकडे न पाहतां वासंती म्हणाली.

"तूं काल म्हणालीस उद्यां जाणार तेव्हां मला तें खरं वाटलं नाहीं. पण आतां पाहतें तों तूं खरोखरच आवराआवर करते आहेस."

"हूं. तिसऱ्या प्रहरच्या मोटारनं जाणार मी."

"प्रिन्सिपलना विचारलंस ? त्यांनीं परवानगी दिली ?"

"हुं. माझी हजेरी भरलेलीच आहे."

"म्हणजे तुझं अगदीं ठरलेलं दिसतं ?"

वासंतीनं ओठ जुळवून मान हालविली, व त्याच वेळीं तिची व सुरंगाची दृष्टादृष्ट झाली. सुरंगानं एकदम तिचे हात धरले व म्हटलं,

"कांहीं तरी बिघडलं आहे तुझं ?"

"माझं ? शी !"

"एरव्हीं परीक्षा टाकून गेली नसतीस. परवांपरवांपर्यंत बोलत नव्हतीस असं जाण्याबद्दल, अन् आतां एकदम कसा बेत झाला तुझा ?"

बापूंचं पत्र आलं एकदम निघून ये." वासंतीनं खोटं सांगितलं.

"परीक्षा टाकून ?"

"हं"

"खोटं"

"शपथ !" असं म्हणून वासंतीन ट्रंकमधल्या सामानावर टॉवेलची घडी ठेवली, व झाकण दाबून लावल.

सुरंगानं अगदीं वाईट तोंड करून म्हटलं, "मी मारे मनाशीं म्हणत होतें कीं आपण एकमेकींचा निरोप घेण्यापूर्वी एक दिवस सपाटून मजा करूं, कुठली तरी लहानशी ट्रिप काढूं, सिनेमाला जाऊं, अन् तूं आज अशी अकस्मात् निघालीस ! फार निराशा केलीस माझी. आतां सुटींत वेळ काढून आमच्या गांवीं यायचं कबूल केलं आहेस त्याप्रमाणें तरी ये म्हणजे मिळवली ! काय ? येणार ना ? कबूल केलं आहेस, लक्षांत ठेव."

"वा ! येणार तर."

सुरंगाच्या चर्येवर हर्ष दिसला, व तो पाहून वासंतीला मनांतल्या मनांत वाईट वाटलं. कारण सुरंगाच्या गांवीं ती जाणार नव्हती. मनाच्या वृत्तीच्या ज्या फरकामुळें ती पुण्याला एकदम कंटाळून घरीं निघाली होती त्याच फरकामुळें सुटींत दुसरीकडे कुठेंही न जाण्याचं तिनं ठरविलं होतं.

ज्या दिवशीं तिनं डॉ. जयंतांना लिहिलेलं तें लांबलचक पत्र फाडलं होतं, त्यानंतरचे आठदहा दिवस मोठ्या चमत्कारिक मनःस्थितींत तिनं घालविले होते. आपण केलेला निश्चय बरोबर आहे याविषयीं तिला जितकी खात्री वाटत होती, तितकीच तो पार पाडण्याची कठीणता तिला पटत होती. जयंतांचं सलगीचं बोलणं चालणं अगदीं निर्हेतुक असेल तर तिला तें आतां सुखकारक वाटण्यासारखं नव्हतं, व त्यामुळें त्यांची भेटही न घेतलेली

बरी असं तिच्या मनांत येऊं लागलं होतं. त्यांची गाठ घेतल्यावांचून तिनं आठ दहा दिवस कसेबसे काढले होते, आणि मग काल तिच्या एकदम मनांत आलं होतं आपण निंबोणीला निघून जावं हें सगळ्यांत चांगलं. त्याप्रमाणें तिनं ताबडतोब आवराआवर केली होती व आज ती जाणार होती.

दुपारीं अगदीं जायच्या घटकेला तिचं मन क्षणभर द्विधा झालं. तिला वाटलं आपण जयंतांना भेटल्यावांचून अशा जात आहोंत हें आपलं चुकत तर नसेल? समजा आपण त्यांची भेट घेतली आणि आपल्या भावना त्यांच्याजवळ...छे ! तसं करण्यांत काय फायदा होता ? लग्नावांचून राहण्याचा जयंतांचा जर निश्चयच असेल तर...

ती करीत होती तेंच बरोबर होतं. तिनं आपला निश्चय पार पाडला. ती दुपारच्या मोटारनं गेली.

तिला निरोप देऊन परत येऊन सुरंगा खोली न उघडतां पुढच्या गॅलरींत उभी होती तों एक इसम तिच्याजवळ आला. त्यानं दाराच्या कुलपाकडे पाहिलं, व म्हटलं,

" वासंती पटवर्धन याच खोलीत ना ? त्या बाहेर गेल्या आहेत काय ? डॉ. जयंतांनीं हें पत्र दिलं आहे त्यांना. तुम्ही देऊं शकाल त्या आल्यावर ?"

सुरंगा म्हणणार होती ती आत्तांच आपल्या गांवीं गेली. पण तिला काय वाटलं कुणास ठाऊक, त्या इसमानें तें पत्र पुढं केलं तेव्हां तिनं तें हातीं घेतलं व हुं म्हटल्याप्रमाणें मान हालवली. तो इसम गेला तेव्हां तिच्या मनांत आलं, हें काय भलतंच आपण केलं, आणि तें उघडून वाचण्याची तिला इच्छा झाली तेव्हां तर त्या विचारानं ती एकदम वचकली ! छे ! छे! असली भलतीच गोष्ट तिनं करतां कामा नये.

पण तिच्या मनांत आलं, समजा आपण हें पत्र वाचलं तरी आपण त्याचा दुरुपयोग थोडाच करणार आहोंत ? त्यांत कांहीं तातडीचा निरोप असला तर आपण वासंतीला तो कळवूं शकूं आणि त्यांत कांहीं खाजगी मजकूर असला तरी त्याचा संशय येतांच वाचणं बंद करतां येईल आपल्याला.....

तथापि तें पत्र वाचण्याची इच्छा कांहीं झालं तरी खाजगी आहे हें सुरंगाच्या मनाला नाकबूल करतां येईना.

पण मग ती त्या पत्राचं काय करणार होती ? तें जसंच्या तसं डॉ. जयंतांच्याकडे पोंचविणं तिला अशक्य नव्हतं. परंतु एका विचित्र जिज्ञासेच्या ताब्यांत गेलेल्या तिच्या मनाला ती कल्पना सुचली नाहीं. ती खोली उघ-

डून आंत गेली, व दार आंतून बंद करून ती तें पत्र वाचूं लागली. पत्राचा लिफाफा उघडतांना ती मनाशीं पुन्हां एकदां म्हणाली, आपण वाचूं नये असा कांहीं मजकूर दिसला तर आपण तें ताबडतोब पुन्हां पाकिटांत बंद करूं. पण हा तिचा निश्चय टिकला नाहीं. तिनं तें सबंध पत्र वाचलं -

" प्रिय वासंता,

हें आहे तरी काय ? रविवारीं तूं आली नाहींस आणि त्यानंतर आठ दिवस होत आले तरी तुझं दर्शन नाहीं. इतकी कशांत गढून गेली आहेस ? दोनदां तुला निरोप पाठविला तर उद्यां येतें म्हणून लिहिलंस पण आली नाहींस. मी तुझ्यासाठीं एक फार गमतीची गोष्ट आणून ठेवली आहे. ती तुला खचित् आवडेल. वहिनींकडून तिकडल्या प्रांतांतली मिठाई दोन दिवसांपूर्वीं आली. मीं ती अजून खाल्ली नाहीं. आई रोज तुझ्याबद्दल विचारते व मी सांगतों आज बहुतेक ती येईल. तुझ्या परीक्षेच्या तारखांवर मीं आपल्या कॅलेंडरमध्यें खुणा करून ठेवल्या आहेत, व त्यानंतरच्या दिवसाची मी किती उत्सुकतेनं वाट पाहत आहे. बापूसाहेबांचं मला परवां पत्र आलं आहे. त्यांत त्यांनीं निंबोणीस येण्याबद्दल आग्रहाचं आमंत्रण दिलं आहे. मी खचित् येणार. पाशालाही मी रोज सांगतों आहे कीं आतां आपण जाणार तें जानबा पाटलांच्या घरीं नव्हे--तर वासंतीच्या घरीं ! त्याबद्दल तुझ्याशीं पुष्कळ बोलायचं आहे मला. पण तूं तर येतच नाहींस. कांहीं कारणानं माझ्यावर रुसली तर नाहींस ? पण छे ! मला तें शक्य नाहीं वाटत. त्या दिवशीं थोडासा अंधार पडला तरी आपण टेकडीच्या माथ्यावर बोलत बसलों अन् मी तुझा हात हलकेच आपल्या हातीं घेतला तेव्हां तुझीं बोटं माझ्या बोटांवर किती घट्ट मिटलीं होतीं तें मला अजूनही आठवतं. तुला माझा राग आला असेल हें शक्यच वाटत नाहीं. तूं परीक्षेच्या अभ्यासांत अगदीं गढून गेली आहेस असंच मी समजतों. पण थोडंसं येऊन जायला काय हरकत आहे ? आज संध्याकाळीं जेवायलाच येशील काय ? मी पांच सहा अतिशय चांगलीं रेकॉर्डस् आणलीं आहेत तीं तुला ऐकवीन. बर्नार्ड शॉच्या भाषणाचं रेकॉर्ड निघालं आहे तुला माहीत आहे ? तें तुला फार आवडेल. त्यांतला कांहीं भाग खवचट अहंमन्यतेनं भरलेला आहे. परंतु

स्वारीचा आवाज कसा अगदीं मुरलेला, मधूर आणि मोहक वाटतो ! येच आज संध्याकाळीं. साडेसहा वाजतां मी वाट पाहीन. अन् आली नाहींस तर स्वत: गाडी घेऊन येऊन तुला पकडून आणीन. मग मुलींच्या वसतिगृहांत परवानगीवांचून शिरल्याबद्दल तुझ्या प्रिन्सिपलनीं मला दंड केला तरी चालेल.

तुझा
जयंत"

ज्या वेळीं भेदरलेल्या मनानं सुरंगा तें पत्र चोरून वाचीत होती त्या वेळीं ताशीं पस्तीस चाळीस मैल वेगान जाणाऱ्या मोटारींत पुढच्या सीटवर बसलेली वासंती मनाशीं विचार करीत होती, आपण निघून आलों म्हणून जयंतांना वाईट वाटेल ? वाटेलही कदाचित् ! परंतु त्यांच्या खेदाचं स्वरूप निराळं असेल तिच्या स्वत:च्या दु:खाचं स्वरूप फार वेगळं होतं. ती आतां घरीं परत जाऊन काय करणार होती ? कसे दिवस घालविणार होती ? आपल्या अंत:करणाची जखम कोणत्या उपायान बरी करणार होती ?...

असं काय विचित्र आयुष्य तिच्या वांट्याला आल होत ? वर्षापूर्वी अशोकचं तें प्रकरण संपवून ती घरीं परत आली होती. आणि आजहि निराळ्या कारणानं, निराळ्या वृत्तीनं परंतु अंत:करणावरचे प्रहार सहन करीतच ती घरीं चालली होती ! मुंबई नको म्हणून ती पुण्यास गेली होती. आणि आतां पुण्यालाही तिचं मन विटलं होतं ! आतां अभ्यासासाठीं ती दुसरीकडे कुठं जाणार होती ? का तिनं अभ्यासच अजिबात सोडावा ? काय हरकत आहे ? आपल्या गांवाभोंवतालच्या शेतकऱ्यांच्या उपयोगी पडण्यांत, त्यांना जागृत करण्यांत तिनं यापुढचे दिवस घालविले तर काय बिघडलं ? प्रेम म्हणजेच कांहीं जीवितांतलं सार नव्हे. पूर्वी तर तिला आत्यंतिक प्रीतीची धड ओळखही झाली नव्हती; आणि आतां ती झाली होती ती विस्तवाच्या स्पर्शाप्रमाणें सुखाची उब मिळायच्याऐवजीं तिला चटका मात्र बसला होता !... तरी प्रेम म्हणजे सर्वस्व नव्हे. शेतावरच्या आयुष्यांत समाजोपयोगी गोष्टी तिला करतां येतील, उद्योगांत मन गुंतवितां येईल, व मग कालांतरानं का होईना पण मनाची निराशा ती विसरूं शकेल. आणि जयंत तर तिला सहजसहजीं विसरतीलच..

ती घरीं पोंचली तेव्हां तिचे वडील घरांत नव्हते. ते रात्रीं आले तेव्हां तिला पाहतांच आश्चर्यानं व आनंदानं ते उद्गारले,

" अरे ! ताया, तूं केव्हां आलास ?"

तिला एखाद्या मुलाप्रमाणें अरे जारे म्हणण्याची व 'ताया' म्हणून हाक मारण्याची त्यांची जुनी हौस होती. ती मालीयेवढी होती तेव्हां कोट, विजार, जरीची टोपी चढवून तिला त्यांनीं कित्येकदां एका छोटया शिगरावर बसूं दिलं होत. पण ती मोठी झाल्यावर त्यांनीं तिला तशी हाक मारायचं सोडलं होत. कित्येक वर्षांनीं आजच ते एकदम तस कां बोलले कुणास ठाऊक ? परंतु ते लाडके शद्ब ऐकताच वासंतीला एकदम आपल्या बालपणचा काळ आठवला किती सुखांत होती तो लहानगी वासंती ! ती तशी लहान राहिली असती तर काय बिघडलं असत ? माणसानं वाढलच पाहिजे, सुखदुःखाचे अनुभव घेतलेच पाहिजेत, प्रेमामागं धावलंच पाहिजे, ठेंचा लागून सुस्कारे टाकलेच पाहिजेत, विकार आवरले पाहिजेत, विचार वाढविला पाहिजे, हा काय निसर्गाचा चमत्कारिक जुलूम ?..

" मला कळविल नाहींस ?" बापूसाहेब विचारीत होते.

" आले झालं एकदम " हसण्याचा प्रयत्न करीत वासंती म्हणाली.

" तब्येत ठीक ? बरी दिसते आहे. या वर्षात तुझी प्रकृति पुष्कळ सुधारली, नाहीं ? मुंबईहून परत आलीस तेव्हां मला मोठी काळजी वाटूं लागली होती. पण–पुण मानवल तुला !"

वासंती गप्पच राहिली.

मग बापूसाहेबांनी एकदम विचारलं,

" काय, डॉक्टरसाहेब काय म्हणतात ?"

या प्रश्नाची तिनं अपेक्षा केलीच होती, व तो झाल्यावर काय बोलायचं तेंहि ठरविलं होत.

" ठीक आहेत. "

" केव्हां भेटले होते ?"

" परवां....." ( परवां म्हणजे कोणताहि दिवस होऊ शकतो..! )

" माझ्या पत्राबद्दल कांही बोलले काय ?"

वासंती चपापली. पाठ करून ठेवलेल्या प्रश्नोत्तरांत हा प्रश्न नव्हता. तिनं चातुर्यानं म्हटल,

" त्यांची बोलायची तऱ्हा माहीतच आहे कीं तुम्हांला !"

" म्हणजे त्यानीं माझं लिहिणं विनोदावारीच नेलं होय ?"

ती टेबलाकडे वळली, व केसांतला आंकडा तिथें ठेवायचा होता अशी बतावणी तिनं केली. बापूंच्या प्रश्नाला तिनं कसं उत्तर द्यावें ? त्यांनीं जयंतांना काय लिहिलं होतं याची तिला कल्पना करतां येईना; आणि आतां संदिग्ध उत्तर देण्याचं तिचं चातुर्यही तिला मदत करीना. तिनं फक्त हास्य केलं, तें असं कीं त्याचा अर्थ प्रश्न विचारणारानं हवा तसा करावा.

बापूसाहेब म्हणाले, " तरी ते आल्यावांचून राहणार नाहींत. माझं आमंत्रण किती अगत्याचं होतं हें त्यांनीं खचित् ओळखल असलं पाहिजे. मला तर वाटलं होतं कीं कदाचित् तुझ्याबरोबरच ते येतील. केव्हां येतो कांहीं बोलले नाहींत तुझ्याजवळ ?"

अस्सं ! बापूंनीं त्यांना इकडे बोलावलं होतं तर ? ही शक्यता तिनं अगदींच विचारांत घेतली नव्हती. तिनं वेड्यासारखा हिशोब केला होता, कीं आपण निंबोणीला निघून आलों कीं मग जयंतांची व आपली भेट होणार नाहीं. पण बापूंनीं जर खरोखरीच त्यांना बोलावलं असेल तर बे येतीलही. आणि मग त्यांची भेट झाल्यावर तिच्यापुढें मोठाच प्रश्न उभा राहणार होता...

" हो, ते म्हणाले कीं–"

" काय ?"

" कीं येईन सवड सापडल्याबरोबर." असं उत्तर देऊन तिनं त्या वेळेपुरता आपला गोंधळ संपविला, व तितक्यांत खालीं ओटीवरून कुणी तरी हाक मारली म्हणून बापूसाहेब खालीं गेले तेव्हां तिला सुटल्यासारखं वाटलं. परंतु जयंत आतां खरोखरच आपल्या घरीं आले तर कसं व्हायचं हा प्रश्न तिच्या मनांत मग सारखा घोटाळू लागला.

दुसऱ्या दिवशीं महादू तिला विचारूं लागला,

" ताईसाहेब तुम्हीं येतांना डाक्तरसाहेबांना आपल्यासंगं कां न्हाई घेऊन णालां ? एकल्याच आलांत ?"

" म्हणजे माझं अन् त्यांचं काय लग्न लागलं आहे ?" असे शब्द तिच्या ओठाशीं आले तेव्हा त्या शद्बांचं तिचं तिलाच हसूं आलं ती गप्प राहिली.

महादूनं पुन्हां विचारलं, " पर आतां येतील नव्ह का त्ये लवकरच ?"

" तुला कशासाठीं रे त्यांची एवढी तहान लागली आहे ?"

" वा ! ह्ये काय इचारनं ! माझी रखू धा यळा त्यांची याद काढती, आम्ही सारीं तिला सांगतो आतां आपल्या ताईसाहेब त्येंना घेऊन लवकरच

येनार हायती. आमची गोष्ट सोडा, अवतीभांवतींच्या साऱ्या खेड्यांतलीं मानसं त्येंचं नांव काढत्यात."

त्याचे ते शब्द ऐकून वासंतीला जितकं सुख वाटलं तितकंच तिचं मन खिन्न झालं.

आणि सकाळीं व पुन्हा संध्याकाळीं ती आजूबाजूच्या खेड्यांत हिंडली व गांवकऱ्याना भेटली त्या वेळीं जिथें जिथें जावं तिथल्या माणसांनीं 'तुम्ही डॉक्टरसाहेबांना कां घेऊन आलां नाहीं ? आम्हाला त्यांची फार आठवण होते' असे उद्गार काढावेत. असा प्रकार झाला तेव्हां तिच्या मनातल्या त्या सुखाची जशी पुनरावृत्ति झाली त्याचप्रमाणें विषण्णतेचीही छटा दाट होत गेली. जयंत आपल्या मुलखांतल्या या साऱ्या लोकांच्या प्रीतीस व आदरास पात्र झाल्याचा एकेक प्रत्यय आला कीं तिला आनंद व्हावा, पण, लगेच तिच्या मनांत यावं, जयंत माझे होतील अशी मी केवढी आशा ठेविली होती, पण त्या आशेचा शेवट मला आतां केला पाहिजे ..ती तिन्ही सांजा घरीं परत आली तेव्हां दिवसभर प्रयत्नानं आवरलेला मनांतला कष्टीपणा एकदम प्रगट होऊन तिला तो असह्य वाटला. बापूसाहेब घरीं परत आले नव्हते. त्याचा एका शेतकऱ्याबरोबर निरोप आला होता, कदाचित् मला रात्र होईल, ताईला म्हणावं जेवून घे. माली महादू गड्याच्या मांडावरच झोपीं गेली होती. ती वर आपल्या खोलींत गेली व गड्यानं लावून ठेवलेल्या दिव्याची वात मोठी न करतां तशीच आपल्या पलंगावर पडली.

ती किती वेळ तशी पडून राहिली होती कुणास ठाऊक ? दिवसभरच्या श्रमानं तिचा अर्धवट डोळाही लागला होता. ती जागी झाली ती एकदम कसला तरी आवाज झाल्यामुळें. उशीवरच्या उशीवरच डोकं किंचित् हालवून तिनं लक्ष देऊन ऐकलं. पुन्हा तोच आवाज तिच्या कानीं पडला. तिच्या छातींत एकदम धस्स झालं.

होय, जयंतांच्या गाडीचाच हॉर्न वाजत होता खास !

तिनं झटकन् उठून दिवा मोठा केला तोंच महादू धावत वर आला व दारांतून घाईघाईनं म्हणाला, " ताईसाहेब, डाक्तर आलं जनू."

" आलेंच. " असं म्हणून खुर्चीवर मघाशीं सोडून ठेवलेल्या पातळाची झटकन् घडी करून तिनं दूर व्यवस्थित ठेवली, आरशांत डोकावून केस नीट केले व ती खोलीबाहेर पडली.

दिवाणखाना ओलांडून ती जिन्याकडे वळली तोंच, तेवढ्यांत वर चढून आलेल्या जयंतांची आकृति तिला दारांत उभी असलेली दिसली.

" पाहुण्याची सोय होईल काय ?" ते हसत विचारीत होते.

वासंती विलक्षण गोंधळून गेली होती. पण तिनं विचारलं, " इतका उशीर कसा झाला ?"

" कांहीं केल्या कामांतून सुटकाच होईना. पण मनाशी ठरविलं होत कीं निघायला जरी रात्रीचे आठ वाजले तरी आज यायचच. कारण पळून गेलेल्या गुन्हेगाराला पकडण्याच काम लांबणीवर टाकण्यांत धोका वाटायल लागला."

ती आपल्या खोलीकडे वळली होती व तिच्या मागोमाग ते पावलं टाकीत होते. तरी तो विनोद करतांना त्यांची चर्या कशी दिसत असेल तें वासतीला कळत होत आणि ती आपल्या मनाला बजावीत होती, यांच्या भाषणाच्या लाघवांत सापडून उपयोगी नाहीं.

ते खुर्चीवर बसले तेव्हा तिनं म्हटलं, बापूचा निरोप आला आहे, की कदाचित् त्यांना घरीं यायला उशीर लागेल. जेवण तयार आहे. एकदम जेवणार की चहा घेणार ?

" चहा हवा तर ! पण त्यासाठीं तू खाली जाणार असलीस तर नको. कारण तुझ्या अपराधाचा जाब मला तुझ्याकडून आधीं पाहिजे आहे."

वासंती किंचित् हसली. " अपराध कसला बाई माझा ?" असं म्हणून ती खालीं जाऊ लागली.

" इकडे ये ना म्हणजे सांगतों " अस ते म्हणाले, तरी ती खालीं गेलीच, व मग दहा पंधरा मिनिटांनीं चहा घेऊन वर आली.

चहा पितां पितां जयंत म्हणाले, " ह. तुझा अपराध कोणता तें सांगूं ना ?"

खालीं जाऊन वर येतांना वासतीनं मनाशी कांहीं गोष्टी ठरविल्या होत्या. ती गंभीर चर्या करून म्हणाली,

" नको. मला तसल कांहीं ऐकायच नाहीं."

तिच्या त्या चर्येचा जयतांना जरा चमत्कार वाटला. विनोद करीत करीत आपल्या मनांतला रुसवा तिला दाखविण्याचा त्यांचा विचार होता. परंतु

तिच्या चर्येवरून विनोदाचं बोलणं या वेळीं तिला रुचणार नाहीं हे त्यांना उघड दिसलं. ते कांहीं वेळ गप्प बसले. मग्रेच त्यांनीं तिच्याकडे नजर लावली तेव्हां ती दुसरीकडे पाहूं लागली. ते म्हणाले,

" हें सारं तुला शोभलं काय ? "

" काय ? "

" गेल्या दहा दिवसांत माझ्याकडे आली नाहींस. आणि मला न भेटतां खुशाल इकडे निघून आलीस. कालच तुला मीं एक पत्र पाठविलं तें तुझ्या मैत्रिणीनं परत धाडलं, तेव्हां मला कळलं कीं तू परीक्षेला न बसतांच इकडे आलीस. ही गोष्ट माझ्या मनाला किती लागली असेल याची तुला कल्पना नाहीं. मी तुझा कुणीच नव्हे काय ? "

वासंतीनं मान खालीं घातली होती ती उचलली नाहीं. तिला अगदीं जोराची इच्छा होत होती कीं त्यांना म्हणावं, हो, तुम्ही माझे कुणीच नाहीं अस समजण्याचा निश्चय करणं मला उचित वाटतं. मला ज्या तऱ्हेनं तुम्ही हवे आहांत ती जर तुम्हांला शक्यतेच्या पलीकडे ठेवायची असेल तर उगीच हें असं साध्या सलगीचं नातं तुम्ही कां वाढवतां ? त्यापासून तुम्हांला सुख होत असेल, पण मला नाही....

पण ती उघड कांहींच बोलली नाही.

" वासंती !" असं म्हणून जयंत बोलूं लागणार तोंच खालीं बापूसाहेब आल्याची चाहूल झाली.

जिना चढतां चढतां बापूसाहेब ओरडून म्हणाले, " वा, डॉक्टरसाहेब, ही काय येण्याची तऱ्हा ? "

जयंत चट्कन् उठून दिवाणखान्यांत गेले व म्हणाले, " तुमची तरी ही काय पाहुण्याचं स्वागत करण्याची तऱ्हा ? आम्ही आलों तों मालक घरांत आहेत कुठें ? "

दोघेहि हसले. बापूसाहेब म्हणाले, " पण ताई घरांत होती नां ? ..माझी तर कल्पना होती कीं पुण्याहून तुम्ही व ताई मिळूनच याल."

वासंतीला वाटलं आतां जयंत काय उत्तर देतात कुणास ठाऊक ? त्यांना न भेटतांच व परीक्षेला न बसतांच आपण निघून आलों असं त्यांनीं सांगितलं म्हणजे ? तिनं चट्कन त्यांच्याकडे पाहिलं. त्यांनींही पाहिलं. ते किंचित्

हसले, व बापूसाहेबांकडे वळून म्हणाले, " काल येणं अगदींच अशक्य होतं मला. आज तरी आलों म्हणजे काय, आलों झालं."

त्यांनीं तिच्याकडे नजर टाकली.

तिचे डोळे म्हणाले, मी तुमची फार आभारी आहे.

त्यांच्या ओठावर चोरटं हास्य दिसलं तेव्हां तीदेखील उलट गुप्त अभिप्रायानं हसली, पण तितक्यांत तिच्या मनानं तिला इशारा दिला, तुला हा सारा मोह दूर करायचा आहे ना, मग हें काय ?

पानं मांडलीं कीं नाहीं तें पाहण्याच्या निमित्तानं मग लगेच ती खालीं गेली तेव्हां ती स्वतःला बजावीत होती, आपल्याला जयंतांशीं फार निराळ्या तऱ्हेनं वागलं पाहिजे.

---

# १५

कितीती वाजले असतील याची वासंतीला कल्पना करतां येईना.

पायगतच्या खिडकींतून चंद्राचं मोठं बिंब दिसत होतं आणि वाऱ्याची गार झुळूक सुरू झाली होती. तेवढ्यावरून तिनं तर्क केला कीं भली पहाट झाली असावी.

तिनं पायागतचं रग पडल्या पडल्याच अंगावरच्या चादरीवरून ओढून घेतलं, आणि ती या कुशीवरून त्या कुशीवर वळली.

तितक्यांत घरांतल्या मोठ्या घड्याळाचे ठोके पडले.

चार वाजले होते तर ! इतक्यांत उठून ती काय करणार होती ? आतां तिला झोप येणं शक्य नव्हतं, कारण अगदीं भरपूर गाढ झोप मिळाल्यावर तृप्तीचा जो ताजेपणा शरिराच्या सर्व गात्रांवर व विशेषतः नेत्रांवर येतो त्याचा तिला स्पष्ट अनुभव येत होता. आणि या शारीरिक ताजेपणांत भर टाकणारी मानसिक प्रसन्नताही त्या क्षणीं तिला प्रतीत होत होती. इतक्या परिपूर्ण समाधानाची वृत्ति वासंतीला गेल्या किती तरी काळांत

लाभलेली नव्हती. वायूच्या मंद स्पर्शानं एखादी लहानच लहर ज्यावर क्वचित् मधूनच हालत आहे अशा शांत, स्वच्छ, निर्मल जलाशयाप्रमाणें चित्त असतांना उबदार पांघरूण अंगाभोंवतीं लपेटून साखरझोप घेण्याची मिजास किती निराळी ? वासंतीनं पांघरूण वर घेतलं तरी तें अशा बेतानं, कीं तें समोरच्या चंद्राच्या आड येऊं नये, आणि मधूनच डोळे मिटावेत मधूनच खालीं खालीं सरकणाऱ्या चंद्राकडे पाहावं अशा प्रकारें ती त्या प्रहरच्या नाजुक निद्रेशीं खेळूं लागली.

आणि तें करतांना ती आपल्या मनाशींही खेळत होती.

एखादं लहान मूल कांहीं हकीगती सांगूं लागलं कीं त्याचं कौतुक करण्यासाठीं " हं ? बरं, आणखी ? " असं त्याला आपण वरचेवर म्हणतों त्याप्रमाणें ती स्वतःच्या मनाला विचारूं लागली, " आणखी ? " आणि तिनं डोळे उघडे ठेवलेले असोत किंवा मिटलेले असोत, तिचं मन किती तरी लहान लहान आठवणी तिच्यापुढें आणून उभं करूं लागलं.

जयंत त्या रात्रीं अकस्मात् आले तेव्हां तिच्या मनांत मुख्यतः दोन विचार आले होते. एक असा, कीं ते आले नसते तर बरं झालं असतं. पण दुसरा असा, कीं ते आले हें एका अर्थी ठीक झालं. केव्हां तरी तिनं मनाशीं केलेला नवा निश्चय त्यांना कळायलाच पाहिजे होता. केव्हां तरी अखेरची भेट व्हायलाच हवी होती. त्यामुळें दुसऱ्या दिवशीं उजाडल्यापासून ती मनांतल्या मनांत योग्य संधीची वाटच पाहूं लागली होती. दिवसभर बापूसाहेब त्यांच्यांत मिसळले होते. एकीकडे तिला वाटत होतं कीं बापूंच्या सान्निध्यामुळें जयंतांना आपल्याशीं बोलण्यापुरता एकांत मिळत नाहीं हें एक प्रकारें बरं होत आहे. अशीच शिक्षा हवी त्यांना पण दुसरीकडे तिला मधून मधून असंही वाटे कीं एकदां हवी तशी वेळ येऊन आपल्याला जयंतांना जें कांहीं सांगायचं आहे तें सांगून टाकतां येईल तर फार बरं होईल मग तिच्या मनांत येई बापू जरा वेळ आपणां दोघांना एकटे सोडतील तर चांगलं होईल. ते उठत कां नाहींत ? त्यांना बोलायला कुणीच कसं येईना ?....मग ती मनाशीं खूप त्रासे.

परंतु चमत्कार असा कीं खरोखरच जेव्हां तिला व जयंतांना एकांत मिळाला तेव्हां तोही तिला सुखाचा वाटला नाहीं. ज्या व्यक्तीवर अतीव प्रेम जडलेलं असेल तिच्याशीं कलह करणं सोपं नसतं. तिचा राग आलेला असला तरी

शद्ब सुचत नाहींत. आणि शद्बांवांचून उत्पन्न झालेली स्तब्धताही मनाला विचित्र पीळ घालीत असते. वासंतीनं मनाशीं जीं बोलणीं योजून ठेवलीं होतीं तीं चट्कन् तिच्या तोंडांतून निघेनात. आठवणीनं ठेवलेली वस्तु आयत्या वेळीं सापडेनाशी व्हावी तसं तिच्या त्या बोलण्याचं झालं, आणि त्यामुळें जयंतांच्या लाघवी भाषणाचा ओघ कसा बंद करावा तें तर तिला मुळींच कळेना. तो एकांताचा प्रसंग तसाच गेला होता. वासंतीला पराभव कबूल करणं भाग पडलं होतं...

त्यानंतरच्या प्रसंगीं मात्र तिनं आपल्या मनांतला सारा निश्चय एकवटला होता.

जयंत जेव्हां तिला आपल्या नव्या कादंबरीचं कथानक सांगूं लागले तेव्हां ती मधेंच म्हणाली होती, " कथानक छान आहे, पण तुम्ही तें इतक्या उत्सुकतेनं मला कां सांगतां ? "

" म्हणजे काय ? माझ्या मूर्खपणाचंसुद्धां कौतुक तुझ्यावांचून दुसरं कोण करणार आहे ? मी जेव्हां एखादं ऑपरेशन विलक्षण चातुर्यानं, सफाईनं करतों त्या वेळेस कुणीही मनुष्य माझं कौतुक करील असं मला वाटतं, अन् तुझी आठवण झाली तरी ती जोरानं होत नाहीं; परंतु ज्या वेळीं एखादी अगदीं सामान्य गोष्ट माझ्या हातून घडते त्या वेळीं तुझी आठवण फार होते. कारण मला माहीत असतं कीं, त्या माझ्या कृतीचंसुद्धां कोडकौतुक करणारी एक व्यक्ति आहे..."

पाण्याचा मोठा लोंढा अकल्पितपणें अंगावर आला कीं, माणसाची सारी प्रतिकारशक्ति नष्ट होऊन तो गोंधळतो तसं वासंतीचं झालं. जयंतांच्या त्या बोलण्यांत आणि एखाद्या प्रेमिकाच्या भाषेंत काय अंतर होतं ?... आणि तरी सुशिलेनं सांगितलं त्याप्रमाणें लग्न न करण्याचा त्यांचा निश्चय होता ? तसा निश्चय मनांत बाळगून ते असलं भाषण करीत असले तर त्याला आतां तिनं बिलकुल उत्तेजन देतां कामा नये. परंतु त्यांच्या बोलण्यांत ज्या अर्थांचा संकेत स्पष्ट होता त्याच्या माधुर्यामुळें वासंती गडबडली. तिनं आपली प्रतिकारशक्ति मोठ्या प्रयत्नानं सावरली होती व म्हटलं होतं,

" तुम्हीं आपली कल्पना फारच स्वैर सोडलेली दिसते."

तिच्या त्या शद्बांतला खरा अभिप्राय जयंतांच्या ध्यानांत आला नसावा. कारण ते पुढें म्हणाले होते.

"वासंती, ही सारी माझी कल्पना असं कां म्हणतेस ? मला खरंच वाटतं—पण तें सांगण्यापेक्षां मी तुला एक प्रश्न विचारतों, त्याचं तू खरं काय तें उत्तर दे."

"पण त्याच्या आधीं मला एक प्रश्न तुम्हांला विचारायचा आहे. विचारूं ?"

"हं."

"सुशिलेचं तुमच्यावर प्रेम आहे काय ?"

"आतां आहे कीं नाहीं मला माहीत नाही."

"आहे." असं म्हणून वासंतीनं आपला खालचा ओठ अगदीं जोरानं दातांत धरला.

"असेल."

"मग तुमच्या सामान्य कृतींचसुद्धां कौतुक करणारी अशी जी व्यक्ति तुम्हांला कल्पावीशी वाटते तिची भूमिका तुम्ही सुशिलेकडेच कां सोपवीत नाहीं ?" असं विचारून तिनं अगदीं तिरस्काराची मुद्रा करून मान फिरविली.

"वासंती !"

"कां ? नाहीं तरी तुमच्यावर प्रेम करणारं माणूस केवळ कल्पनेचा खेळ खेळायसाठींच तुम्हांला हवं ना ? तुम्हांला जर कोणत्याच स्त्रीशीं लग्न करायचं नाहीं—तुमचा जर तसा निश्चय आहे—प्रतिज्ञा आहे, तर प्रेमाच्या या विचित्र आधुनिक चेष्टा स्त्रियांशीं कशाला करतां ? निदान माझ्याशीं तुम्हीं त्या करूं नयेत. कारण तुम्हीं त्यांत घटकेचं सुख घेत असाल, परंतु मला त्यांचं कायमचं दुःख होतं."

अखेर तिनं तें बोलून टाकलं होतं ! ते शब्द उच्चारतांना तिला इतका ताण पडला होता, की ऐन उन्हांत डोक्यावर ओझं वागवून चढणीच्या माथ्यावर आलेल्या माणसाप्रमाणें तिला जोराचा श्वास लागला होता. अखेरच्या वाक्याच्या वेळीं तर तिचा कंठ भरून आला होता. आणि बोलणं संपवितांना जेव्हां तिची नजर त्यांच्या नजरेला भिडली तेव्हां झटकन मान वळवून तिनं आपलं तोंड दोन्ही हातांनीं झाकून घेतलं होतं. आणि मग मोठा हुंदका देऊन ती रडूं लागली होती.

जयंतांनीं क्षणभर कांहींच उत्तर केलं नव्हतं. ज्या स्त्रीवर अंतःकरण पूर्णांशानं जडलेलं असतं तिचे दुःखाश्रु दृष्टीस पडतांना पुरुषाच्या अंतःकर-

णाला केवढ्या यातना होतात याचा अनुभव ते त्या क्षणीं प्रथमच घेत होते. परंतु एकीकडे अंत:करण व्यथित होत असतांना निराळंच एक सूक्ष्म सुख त्यांच्या प्रत्ययाला येत होतं. कारण 'तुझं माझ्यावर प्रेम आहे काय?' असा जो प्रश्न ते तिला विचारणार होते त्यांचं स्पष्ट उत्तर त्यांना पर्यायानं मिळालं होतं. त्यांच्या ओठांवर हास्य दिसूं लागलं तें वासंतीनं पाहिलं नाहीं. तोंड हातांनीं झाकून घेऊन ती मनाशीं म्हणत होती, संपलं ....सारं संपलं! ......आतां ते निरुत्तर झाल्यामुळें गप्प राहतील.....आणि पुन्हा कधीं.....

पण तितक्यांत त्यांनीं तिचे दोन्ही हात धरून तिच्या तोंडावरून दूर करून आपल्याजवळ घेण्याचा प्रयत्न केला होता.

तिनं मान जोरजोरानं हालविली, आणि हात ओढले, पण ते त्यांच्याच हातीं राहिले. कारण ते घट्ट धरून जयंत म्हणत होते,

"अस्सं! एकूण सुशिलेनं तुला सारं सांगितलं तर? मीच तुला तें केव्हां तरी सांगणार होतों पण—"

"काय सांगणार होतात? तुमचा निश्चयच ना?"

"नाहीं. सुशिलेला मीं काय उत्तर दिलं तें. वासंती, मनुष्य निरनिराळ्या वेळीं त्या त्या परिस्थितींतल्या वृत्तीनं जे निश्चय करतो ते काय त्याचे जन्मभराचे निश्चय असतात? एक तर सुशिलेविषयीं प्रीतीची कल्पना मला कधींसुद्धां शिवलेली नव्हती. पोरक्या पोराप्रमाणें ती मला सापडली, आणि एकाद्या आवडत्या अपत्याविषयी असतात तसल्याच तिच्याविषयींच्या भावना माझ्या मनांत अजूनही आहेत. शिवाय माझं मन सर्वतोपरी जिंकणारी स्त्री मला कधीं भेटेल असं मला वाटलं नव्हतं. आणि मग तात्त्विक दृष्ट्या आयुष्याचा विचार मी करीत असे तेव्हां मला वाटे कीं, लग्नावांचून एकटं राहण्यांत पुष्कळ सुख आहे. ज्याबद्दल आपल्याला महत्त्वाकांक्षा वाटते ते उद्योग निर्वेधपणानं करावेत, आपल्या धंद्यांत लक्ष घालावं, यश मिळवावं, वाचन करावं, ज्ञान वाढवावं—पुष्कळ झालं येवढं सौख्य! पण माझ्या आयुष्यांत तुझा प्रवेश झाला, आणि हलके हलके या साऱ्या कल्पना दुसऱ्या दारानं निघून गेल्या. एखाद्या व्यक्तीवरचं आपल्या मनांतलं अमर्याद प्रेम किती क्षुल्लक प्रसंगानं आपलं आपल्यालाच कळतं याची मला गंमत वाटते. तुला आठवतं, तूं कसल्याशा नोटिशीवर सही घेण्यासाठीं प्रिन्सिपलसाहेबांच्या बंगल्यावर आली होतीस? मी त्यांच्याशीं बोलत बोलत आंतून

आलों, त्यांनीं दार उघडलं, आणि तुझी माझी नजरानजर झाली. त्या वेळीं मीं तुला प्रथमच पाहिलं असं नव्हे; पण मला अगदीं स्पष्ट आठवतं कीं त्या क्षणींच प्रथम माझं मन मला कळलं. तूं नोटिशीवर प्रिन्सिपलसाहेबांची सही घेत होतीस आणि तुझ्या सुंदर मस्तकाकडे पहात पहात मी मनाशीं म्हणत होतों, ही कधीं माझी होईल काय ? ...."

मग ती आणि जयंत उघडचा शेत–जमिनींत किती वेळ तरी बोलत बसलीं होतीं, व परत येतांना त्यांनीं तिचा उजवा हात आपल्या डाव्या हातांत अगदी घट्ट धरून ठेवला होता. गांवाच्या सीमेपाशीं आल्यावर ती आपला हात सोडवूं लागली होती, पण त्यांनीं तो सोडण्याऐवजीं वर उचलून चट्‌कन आपले ओंठ त्यावर टेकले होते.

आणि घरीं परत आल्यावर बापूसाहेब बसले होते तिथें जवळच एका खुर्चीवर जयंत बसले होते पण ती तशीच पुढें झटकून वर आपल्या खोलींत गेली होती. आपल्या वडिलांची इतकी लाज तिला जन्मांत पूर्वीं कधीं वाटली नव्हती....आणि जयंत अगदीं कांहीं न घडल्याप्रमाणें बापूंशीं गप्पा मारीत खालीं बसले त्याचा तिला मोठा विस्मय वाटला होता. नेसण बदलतांना ती मनाशीं म्हणत होती, किती सहजपणानं हे पुरुष आपलीं गुप्त रहस्यं मनांतल्या मनांत लपवूं शकतात! पुरुष म्हणजे स्त्रीची मति कुंठित करणार गूढ खरंच ! ....

वासंतीनं डोळे उघडले व समोर पाहिलं. चंद्र पार खालीं सरकून दिसेनासा झाला होता. मघांशी त्याच्या वरच्या बाजूस असलेली मोठी चांदणी मात्र खिडकीच्या खालच्या कट्ट्याच्या रेषेंत दिसत होती. हवेंत गारवा होता, पण वाऱ्याची स्पष्ट झुळूक नव्हती. मागच्या अंगणालगत कुळवाड्याचं परसूं होतं तिथले कोंबडे कुणाचं आरवण अधिक मोठ्यांदा होतं तें पाहत होते. अंगणांतल्या झाडावर पक्ष्यांची किलबिल जोरानं चालली होती. कडूलिंबाचा सुगंध खोलींत भरला होता. आणि भागू मोलकरीण बापूला विचारीत होती, तुझ्या शेळीला काल करडं झालीं, खरं का रे ? ....

वासंतीला एकदां वाटलं आतां उठावं. पण ती उठली नाहीं. तिनं फक्त अंगाला आळोखे पिळोखे दिले अन् गुडघे दुमडून आणि डोकं उशीवरून खालीं सरकवून ती पुन्हा पांघरुणांत शिरली.

तिनं आपल्या मनाला विचारलं, आणखी कांहीं तरी सांग ना ? तिचं मन म्हणालं, आणखी काय सांगूं ? तुला आठवत नाहीं ?

होय, तिला आणखी किती तरी आठवत होतं.

काल संध्याकाळीं ती जयंतांच्याबरोबर बाहेर गेली तेव्हां सोसाट्याचा वारा सुटला होता व उन्हाळी ढग आभाळांत जमत होते. जयंतांनीं म्हटलं होतं, "वळवाचा पाऊस होण्याचं लक्षण दिसतंय्. बाहेर कशाला जायचं?" ती म्हणाली होती, "पाऊस पडण्याचीं लक्षणं दिसतात म्हणूनच जायचं. मला एक गंमत दाखवायची आहे तुम्हांला." त्यांना तिचा गूढार्थ कळला नव्हता; पण मग पाऊस झाला आणि टेकडीच्या माथ्यावरच्या त्या एकाच वृक्षाखालच्या तिच्या आवडत्या स्थळीं तीं दोघं बसलीं असतांना जेव्हां भव्य इन्द्रधनुष्य दिसूं लागलं होतं तेव्हां ती म्हणाली होती,

"पाह्यलंत? हेंच दाखवायचं होतं तुम्हांला."

ते थट्टेनं म्हणाले होते "हात्तिच्या, हेंच का?"

यावर ती म्हणाली होती, "या दृश्याचं मला विशेष वाटतं याला कारण आहे. तुम्हांला तें माहीत नाहीं. पण तुमची माझी पहिली भेट झाली ती आठवते तुम्हांला? एक वर्षापूर्वी. पावसाची मोठी सर पडून गेली होती; केवढं मोठं इन्द्रधनुष्य दिसूं लागलं होतं आणि विरून गेलं होतं. मी एकटीच इथें बसलें होतें माझ्या आयुष्याचा विचार करीत. मग एकदम कुत्र्याचं भुंकणं माझ्या कानांवर आलं होतं, आणि मीं वळून पाहिलं तों 'पाशा' 'पाशा' अशा हाका मारीत तुम्ही येत होतां ते माझ्या दृष्टीस पडलांत. ती तुमची माझी पहिली भेट......"

अशा आठवणींशीं खेळतां खेळतां वासंतीला झोप लागली असावी. ती पुन्हा जागी झाली तेव्हां उशागतच्या खिडकींतून शिरलेलं ऊन तिला स्पष्ट दिसलं. मग ती एकदम अंथरूण सोडून घाईनं उठली. कारण जयंत आज परत पुण्याला जाणार होते.

त्या दिवशीं हर्षनिर्भर अवस्थेंत असतांनाही मधेंच एकदम क्षणभर ती कष्टी होई. जयंत आज जाणार, आपण आज संध्याकाळीं एकट्याच फिरायला जाणार, त्या झाडाखालीं एकट्याच बसणार, आपण परत घरीं येऊं तेव्हां जयंत आपल्याबरोबर नसणार, अशा कल्पना तिच्या मनांत सारख्या येत, व त्या आल्या कीं, अंतःकरण एकाएकीं रितं झाल्यासारखं तिला वाटे. एखाद्या व्यक्तीबद्दलची लुब्धता पराकाष्ठेची वाढली कीं, तिच्या सहवासांत पडणाऱ्या अल्पकालीन अंतरानंही किती खोल व्यथा मनाला होते तें तिला प्रथमच कळत होतं.

हसतमुखानं बोलतां चालतांना तिला भीति वाटे कीं दुपारीं जयंत निरोप घेतील त्या वेळीं बापूंच्या देखत आपल्याला हुंदका तर येणार नाहीं? जयंतांचं सामान मोटारच्या मागच्या बाजूस गड्याकडून नीट बांधवून घेण्यांत बापूसाहेब गुंतले होते त्या वेळीं ती आपल्या खोलींत होती. अकल्पितपणें जयंत तिच्या खोलींत आले तेव्हां " हें काय ? " असा उद्‌गार तिच्या तोंडून बाहेर पडला. पण त्यांची चर्या पाहतांच तिनं त्यांचा हेतु ओळखला व तिचं अंतःकरण धडधडूं लागलं. मान हालवून ती घाबऱ्या स्वरानं म्हणाली, " अहं, उगीच काय ? " तथापि जयंतांनीं आपला हेतु पुरा केला. त्यांच्या त्या स्पर्शानं तिच्या शरीराला एकदम विलक्षण थकवा आला.

" जातों..." हे त्यांचे शब्द फार दुरून ऐकल्यासारखे तिला वाटले.

तिनं हास्य केलं व आपला घाबरटपणा लपविण्यासाठीं कांहीं तरी बोलायचं म्हणून ती म्हणाली, " आता पुन्हा याल तेव्हां मात्र पाशाला घेऊन या हं."

" होय ? "

" हो. त्याला सांगा मीं त्याला अगदीं मुद्दाम बोलावलं आहे. "

" बरं बरं. मी आतां त्याला सगळंच सांगणार आहे. "

" सगळं म्हणजे काय ? "

उत्तर करण्याऐवजीं त्यांनीं आपला हात पुन्हा तिच्या स्कंधाकडे नेला तेव्हां ती एकदम बाहेर पडली, व जिन्याच्या पायऱ्या उतरूं लागली.

जयंत मोटारींत बसले तेव्हां बापूसाहेबांनीं आतांपर्यंत दहा वेळां केलेला प्रश्न त्यांना पुन्हां केला.

" आतां पुन्हा केव्हां येणार ? "

" पाहूं या केव्हां सवड होते ती ! "

जयंतांची नजर हळूच वासंतीच्या नजरेशीं भिडली तेव्हां ती हसली. कारण येत्या रविवारींच पुन्हा येण्याचं जयंतांनीं तिच्याजवळ कबूल केलं होतं.

मोटार हालली तेव्हां वासंती मालीला हातीं धरून दारापुढच्या पायऱ्या चढली व ओटीवर येऊन एका खुर्चीत बसली. बापूसाहेब अजून दारांतच उभे होते. मालीनं तिला विचारलं,

" आपण केव्हां जायचं डॉक्टरांच्या घरीं ? "

तिला जवळ घेऊन वासंती म्हणाली,

" त्यांनीं कुठं बोलावलं आहे ? "

" वा ! बोलावलं आहे कीं. ते परवां मला म्हणाले, आतां लवकरच तुझ्या ताईला मी आपल्या घरीं नेणार आहे. मग तुलाही आलं पाहिजे. ते मला एक मोठा फोनोग्राफ दाखविणार आहेत. त्याला म्हणे रेकॉर्ड लागत नाहीं. नुसतं बटन फिरवलं कीं त्यांतून गाणीं ऐकूं येतात. होय ताई ? असला फोनोग्राफ निघाला आहे ? "

वासंतीनं तिला आणखी जवळ ओढलं व तिचा मुका घेतला.

तिच्या मनांत आलं, एव्हांना जयंतांची गाडी किती तरी दूर गेली असेल पण जाईना का ? आतां ते सर्वस्वीं तिचे होते...

त्या क्षणीं तिच्या अंतःकरणांत अमर्याद समाधान व प्रसन्नता भरलेली होती.

—समाप्त—

## लेखकानं

# एका पत्राला दिलेलं उत्तर

"....या कादंबरी संबंधीं मित्रमंडळींत चर्चा करतांना जे प्रश्न उत्पन्न झाले व ज्यांचीं उत्तरं माझ्याकडून मिळविण्याचं तूं त्यांना आश्वासन दिलंस ते खरोखरच सुचण्यासारखे असावेत. कारण 'इंद्रधनुष्य' कादंबरी 'कार' साप्ताहिकांत क्रमशः प्रसिद्ध होत असताना वाचकाकडून येणाऱ्या पत्रांत हे प्रश्न मला विचारण्यांत आले होते. तेव्हां, तुझ्या प्रश्नांची उत्तरं पुष्कळाना हवींशीं वाटतील अशा समजुतीनं ती थोडक्यांत देतो.

तुझा पहिला प्रश्न असा कीं ही कादंबरी लिहितांना माझा हेतु काय होता? याचं उत्तर असं की कांहीं एक विशिष्ट प्रकारच्या मानसिक ठेवणीच्या एक कल्पित तरुण मुलीची गोष्ट सांगण्यापलीकडे अधिक गंभीर असं कोणतेंही कार्य या कादंबरीत मला साधावयाचे नव्हतं. तिच्या विवक्षित मनोरचनेमुळें निरनिराळ्या तीन पुरुषांच्या प्रेमाची प्रतिक्रिया तिच्यावर कशी झाली व अखेर तिच्या ठिकाणच्या सुप्रवृत्ती कशा व कां जागृत झाल्या हे मला या कादंबरीत मुख्यतः सांगायचं होतं.

तुझा दुसरा प्रश्न असा की या कादंबरींत चालू राजकारणाला मी प्राधान्य कां दिलं नाही? या प्रश्नाचं उत्तर असं कीं सध्यां सरकारची वक्रदृष्टि ओढून न घेतां चालू राजकारणाबद्दल लिहिणें अशक्यप्राय आहे. कांहीं आक्षिप्त मजकूर कादंबरींत यावा व त्यामुळें झंकारवरच आरिष्ट ओढवावे हे मला इष्ट वाटत नव्हंत. म्हणून "प्रवासी" "समरभूमी" "उन्माद" या माझ्या कादंबऱ्याहून प्रस्तुत कादंबरी भिन्न स्वरूपाची ठेवली आहे. त्या कादबऱ्यांत राजकारणाची पार्श्वभूमि मी मुद्दाम वापरली होती. तशी पार्श्वभूमि या कथेला नाहीं. हिच्यांत कांहीं ठिकाणी राजकारणाचा उल्लेख आलेला आहे. परंतु देशांतल्या घडामोडींचं व प्रमुख विचारांचं प्रतिबिंब कादंबरींतील स्त्रीपुरुषांच्या ठिकाणीं पडलेलं दाखविण्यापलीकडे त्या उल्लेखाचे दुसरं कांहीं कार्य नाहीं. या कादंबरींतील नायिका कम्युनिस्ट असल्याचं मला मुख्यतः दर्शवायचं नाहीं. फक्त तिच्या निमित्तानं

आजच्या कॉलेजातल्या गभीर प्रकृतीच्या मुलांची विचार प्रवृत्ति मला सूचित करायची आहे. नायिकेच्या राजकारणी कृत्याची ही कथा नसून तिच्या अंत:करणाच्या विकसनाची एक आकर्षक कथा मी तयार केली आहे.

तुझा तिसरा प्रश्न. बाराव्या प्रकरणांत जे इंग्रजी पुस्तक वासंती वाचते त्याचा लेखक कोण व तें पुस्तक कुठें मिळेल? ही चौकशी अनेक लोकांनीं आपल्या पत्रांत माझ्याकडे केली. त्याचं खरं उत्तर वास्तविक मी देऊं नये कारण ग्रंथकर्त्यांची कांहीं रहस्यं अशी असतात कीं, ती उघड झाल्यास वाचकांचा एक प्रकारें अपेक्षाभग होतो. परंतु तूं विचारलंसच म्हणून व अपेक्षाभंगानं सुखकारक विनोद निर्माण होण्याचा सभवही असतो म्हणून मी येवढं रहस्य सांगतो. त्या पुस्तकाचा कुणीही कर्ता नाहीं, व तें कुठेंही मिळणार नाहीं. कारण तें पुस्तक अस्तित्वांत नाहीं. मीं तें कल्पिलेलं आहे. स्त्रीपुरुषांच्या स्वभावाबद्दल जें विस्तृत विवेचन त्या पुस्तकातल म्हणून दिलेल आहे तें माझं आहे. अर्थात त्याला मानसशास्त्रीय ग्रंथांचे आधार मला दाखवितां येतील. म्हणजे तें विवेचन शास्त्राला धरून आहे. परंतु कुठल्याही प्रत्यक्ष उपलब्ध पुस्तकांतून तें मी घेतलेलं नाहीं. या विषयावर स्वतंत्र निबंध लिहावयाचा असता तर मीं हे विचार पुढें मांडले असते इतके ते मला शास्त्रशुद्ध वाटतात.

तुझ्या बाकीच्या प्रश्नांचीं उत्तरं मीं स्पष्टपणें देण्याऐवजीं तुलाच थोडचाशा कल्पकतेनं काढण्यास मदत व्हावी म्हणून परवांच क्रिस्टोफर मोर्ले यांची "Human Being" ही कादंबरी वाचीत असतांना तिच्या प्रस्तावनेंत एक मार्मिक वाक्य आढळलं तें तुला सांगतों. या लेखकाच्या मतें ललित-लेखकाचं खरं उद्दिष्ट एकच, तें हें कीं, "To catch a human being in the very act of being human, and to set it down without chemical preservatives." मी नेहमीं याच मताचा पुरस्कार करीत आलों आहें हें तुला माहीत आहेच.... ! "

  

## प्रो. ना. सी. फडके

यांच्या खालील कादंबऱ्या आमचेकडे मिळतात

| | | रु. | आ. |
|---|---|---|---|
| १ | हांक | २ | ० |
| २ | जादूगार | २ | ० |
| ३ | निरंजन | २ | ० |
| ४ | कुलाब्याची दांडी | २ | ० |
| ५ | शिकार | ५ | ० |
| ६ | चाहूल | ५ | ० |
| ७ | सुषमा | ५ | ० |
| ८ | पतंग | ५ | ० |
| ९ | हसूं आणि आसूं (मुंबई बाहेरच्या ग्राहकांस) | ५ | ० |
| १० | खेळणीं | ५ | ० |
| ११ | उजाडलं! पण सूर्य कुठें आहे? | ५ | ० |
| १२ | माझा धर्म | ३ | ४ |
| १३ | उद्धार | ७ | ८ |
| १४ | अखेरचें बंड | ७ | ८ |
| १५ | जेहलम (मुंबई बाहेरच्या ग्राहकांस) | ६ | ० |
| १६ | अंजलि | ६ | ० |
| १७ | प्रवासी | ६ | ० |
| १८ | प्रवासी (संक्षिप्त) | १ | ४ |
| १९ | अल्ला हो अकबर! | ६ | ० |
| २० | बस नं. १२ | ३ | ० |

अंजलि प्रकाशन लिमिटेड

वेस्टर्न इंडिया हाऊस, मुंबई १

## आमचीं लोकप्रिय प्रकाशनें—

### विभाग ( १ )

| | | रु. आ. |
|---|---|---|
| १ | **प्रतिभासाधन** : प्रो. फडके | ५—० |
| २ | **लघुकथालेखन : मंत्र आणि तंत्र** : प्रो. फडके | ७—० |
| ३ | **माझ्या साहित्य–सेवेंतील स्मृती : भाग २** : प्रो फडके | ३ ० |
| 4 | India v/s. M. C. C. Tests 1951–52 Prof. Phadke | २—४ |
| ५ | **पॅरिसच्या परी** : ले. प्रो कर्वे | ३—० |
| ६ | **विमाविक्रीच्या सुरस सत्यकथा** : ले कोल्हटकर | २—० |
| ७ | **भरतीची लाट** ( कादंबरी ) : प्रो. फडके | ४—० |
| ८ | **शाकुंतल** (पूर्वी जप्त झालेली कादंबरी) प्रो. फडके | ४—० |
| ९ | **सरिता सागर** (कादबरी) प्रो. फडके | ४—० |
| १० | **सितारा मंझिल** (कादंबरी) प्रो. फडके | ४—० |
| ११ | **सोबत** ( कथासंग्रह ) | २—० |

### विभाग ( २ ) : शालेय

| | | |
|---|---|---|
| १ | **किशोर–कथा** (कथासंग्रह) : प्रो. फडके व सौ. कमला फडके | १—८ |
| २ | **महात्मा गांधी** (चरित्र) : प्रो. फडके | १—८ |
| ३ | **टेरेन्स मॅकस्विनी** (चरित्र) : प्रो. फडके | १—८ |
| ४ | **महात्मा गांधी** चरित्र ( हिंदी ) : प्रो. फडके | १—८ |

**अंजलि प्रकाशन लिमिटेड**

**वेस्टर्न इंडिया हाऊस, मुंबई १**